# भूदान-यज्ञ-समग्र-दर्शन

★

लेखक
चारुचंद्र भंडारी

• • •

परंधाम विद्यापीठ प्रकाशन, वर्धा

मूल्य एक रुपया

# अनुवादकाचें निवेदन



ता. १८ एप्रिल १९५१ या दिवशीं भूदान यज्ञ सुरू झाला त्याला आज पाच वर्षें पुरीं होतात. एवढ्या अवधींत भूदान-यज्ञाच्या पोचमपल्ली येथें लावलेल्या ल्हान रोपाचा महान् वृक्ष झाला आहे. बिहार आणि ओरिसामध्यें त्यानें क्रांतीचें रूप धारण केलें आहे. तेथल्या क्रांतीचे पडसाद कमीजास्ती प्रमाणात सर्व जगामध्यें उठू लागले आहेत. आणि त्यामुळें भीतिग्रस्त जगाला आशेचा किरण दिसू लागला आहे. महाराष्ट्र या क्रांती-पासून अलिप्त कसा राहील? येथें हि भूदान यज्ञाची हळूहळू प्रगति होत आहे. पण ती प्रगति मंद आहे. याचें मुख्य कारण भूदान यज्ञाविषयीं वाङ्मयप्रचार बरा च कमी प्रमाणात झाला आहे हें होय. बिहार ओरिसात भूदान-यज्ञाची होत असलेली दैनंदिन प्रगति पुणें येथें निघणाऱ्या 'भूदान यज्ञ' साप्ता-हिकात येत असते. पण त्याचे अवघे सुमारे तीन साडेतीन हजार ग्राहक आहेत. आणि भूदान-यज्ञासंबंधीं सर्व माहिती एकत्रित देणारें असें पुस्तक हि उपलब्ध नाहीं. गेल्या फेब्रुवारी महिन्यात पोचमपल्लीपासून हैदराबादपर्यंत पू. विनोबांच्या पदयात्रेंत डॉ. दातार याचेबरोबर सामील होण्याचा सुयोग मला लाभला. त्या वेळीं वर सांगितलेली उणीव डॉ. दातार यांनीं पू. विनोबांच्या नजरेस आणली. तेव्हा पू. विनोबांनीं आपल्याजवळचें श्री. चारुचंद्र भंडारी यांनीं बंगालीमध्यें लिहिलेलें 'भूदान-यज्ञ कि ओ केन' हें पुस्तक दिलें.

या पुस्तकात भूदान-यज्ञासंबंधीं सुसूत्र सविस्तर माहिती दिलेली आहे. झाडावरून फळ पडताना पाहून न्यूटनला गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धान्ताचा शोध लागला. दुसऱ्यांनीं असें फळ पडताना पाहिलें नव्हतें काय? त्याला च तो शोध लागण्याचें कारण न्यूटनचें त्याबर सतत चिंतन, मनन चालू होतें. एक दुवा जुळत नव्हता तेवढा या पडणाऱ्या फळानें जुळवून दिला. त्याप्रमाणें च पोचमपल्ली येथें एका गृहस्थानें शंभर एकर जमीन गरिबांना देण्याकरिता विनोबांना दिली आणि विनोबांना भूदानयज्ञाचें दर्शन झालें. यापूर्वीं अनेकांनीं अनेक कामाकरिता जमीन दिलेली होती. मग या दानावून विनोबांना

भूदान यज्ञ का स्फुरला ? कारण न्यूटनप्रमाणें एक समस्या सोडविण्याकरिता त्याचें सतत चिंतन चालू होतें, आणि पोचमपल्लीच्या त्या घटनेनें ती समस्या सोडविण्याच्या मार्गाकडे अंगुलिनिर्देश केला. तो त्यांना ईश्वराचा इशारा वाटला कोणत्या समस्येचें चिंतन ते करीत होते ?

गांधीजी ह्यात होते तोंपर्यंत विनोबा एकान्तसाधनेंत मग्न होते. वायकोम सत्याग्रह, वैयक्तिक सत्याग्रह वगैरेकरिता गांधीजींच्या आदेशावरून ते बाहेर आले, पण ते काम होतां च आपल्या साधनेला ते लागले. पण गांधीजी गेल्यावर त्यांनीं घालून दिलेल्या अहिंसामार्गाचें काय होणार ही चिंता त्यांच्या अंतःकरणाला लागून राहिली. त्याकरिता ते एकान्तसाधनेंतून बाहेर पडले, आणि गांधीजींच्या हातात त्यांच्या निधनाच्या वेळीं जें निर्वासिताचें कठीण काम होते त्यात ते पडले मेव लोकाच्या पुनर्वसनाचें कठीण काम त्यांनीं पार पाडलें. अजमीर, हैदराबाद वगैरे ठिकाणची अशांतता निवारण्यात ते यशस्वी झाले. हें रोगाला वरून मलमपट्टी लावण्यासारखें होतें, अशांतीचें मूळ त्यामुळें नाहींसें होण्यासारखें नव्हतें; म्हणून त्यांना या कामात समाधान नव्हतें. या च वेळीं ते काहींसे आजारी पडले आणि या कामातून निवृत्त झाले.

सध्याच्या अशांतीचें मूळ पैसा सार्वभौम झाला आहे यात आहे. पण त्याला तेथून पदभ्रष्ट कसा करायचा ? त्याकरिता त्यांनीं पवनार आश्रमात कांचनमुक्तीचा प्रयोग सुरू केला. एका ठिकाणीं लहान प्रमाणात तो यशस्वी झाला तर व्यापक प्रमाणात त्याची परीक्षा करायची, पण प्रयोग चालू असताना हि त्याचें चिंतन, मनन आणि निरीक्षण चालू होतें. त्यात तेलंगणातल्या अशांतीकडे त्यांचें लक्ष होतें. शिवरामपल्ली येथील संमेलनाकरिता त्या बाजूस त्यांना जावयाचें होतें. तेव्हा तेलंगणातील परिस्थिति समक्ष पहावयाचें त्यांनीं ठरविलें. अशा पार्श्वभूमींत त्यांना पोचमपल्ली येथें शंभर एकर जमीन मिळाली आणि त्यांच्या चिंतनशृंखलेंतला चुकणारा दुवा त्यांना सापडला आणि भूदान-यज्ञास सुरुवात झाली. वर्ध्याला परत जाईपर्यंत दोन महिन्यात त्यांना बारा हजार एकर जमीन मिळाली एवढ्या अनुभवावरून हि त्यांनीं तो कार्यक्रम हातीं घेतला नाहीं. प्लॅनिंग कमिशन बरोबर विचारविनिमय करण्याकरिता प. नेहरूंचें त्यांना आमंत्रण आलें

नसतें तर या आंदोलनानें काय रूप घेतलें असतें हें कोणीं सांगावें? पण ईश्वराच्या मनातून विनोबांच्या हातून ही क्रांति घडवून आणावयाची होती

ते दिल्लीला निघाले तेव्हा भूदान यज्ञाची खरी प्राणप्रतिष्ठा झाली तेथून उत्तरप्रदेश, बिहार ओरिसा येथें भूदानाचें एक एक पेव प्रकट होत गेलें. संपत्तिदान, साधनदान, जीवनदान वगैरे अनेक शाखा त्याला फुटल्या आणि ओरिसातल्या कोरापुट जिल्ह्यात आठशेंवर समग्र ग्रामदानें मिळून भूदान-यज्ञानें शिखर गाठलें

ही सर्व परिणति एका दिवसात घडून आलेली नाहीं क्रमाक्रमानें त्यांच्या पदयात्रेंतल्या अखंड चिंतनातून ते ते पैलू स्फुरत गेले आणि त्यांच्या रोजच्या भाषणात त्याचा एकेक भाग प्रकट होत गेला गांधीजी हयात असताना विनोबा शक्य तितके कमी बोलत आणि कमी चालत आज त्यांची अखंड परिक्रमा चालू आहे आणि रोज भाषण चालू आहे त्या भाषणाचा एक रत्नाकर च झाला आहे श्री. चारुचंद्र भंडारी यांनीं या रत्नाकराचें मंथन करून तीं रत्नें नीट जुळवून मांडण्याचें काम अत्यंत कौशल्यानें पार पाडलें आहे.

ही भूमिक्रांति केवळ भौतिक क्रांति नाहीं, ती वैचारिक क्रांति आहे, आणि त्या विचाराचें मूळ आपल्या भारतीय सनातन संस्कृतींत आहे 'ईशावास्यमिदं सर्वम्' हें सर्व जग ईश्वरानें वसविलेलें आहे. या मजबूत पायावर हें सर्व आंदोलन आधारलेलें आहे. भूदान-यज्ञाचा कसकसा विकास होत गेला, त्याला साधनदान, संपत्तिदान, जीवनदान वगैरे शाखा केव्हा फुटल्या आणि या आंदोलनाची परिणति रामराज्यात कशी होत जाणार याचें सांगोपांग विवेचन या पुस्तकात केलेलें आहे. कम्युनिझम् म्हणजे साम्यवाद आणि साम्ययोग यांच्यातलें साम्य आणि भेद उत्तम विशद केले आहेत स्वातंत्र्य मिळविण्याकरिता केलेल्या सत्याग्रहाला या आंदोलनात स्थान आहे कीं नाहीं या निमित्तानें उग्र सत्याग्रह आणि सौम्य सत्याग्रह यांची केलेली मीमांसा मौलिक आहे अशा प्रकारें भूदान यज्ञाच्या सर्व अंगोपांगाचें विवेचन पुस्तकात आहे 'पुस्तक सर्वांगपरिपूर्ण झालें आहे असें मला वाटतें' असा विनोबांनीं त्यावर अभिप्राय दिला त्यावरून पुस्तकाची योग्यता ध्यानात येणार आहे कार्यकर्त्यांनीं या पुस्तकाचा चांगला अभ्यास

केला तर लोकांच्या शंकाचें समाधान करणें सुलभ होणार आहे. बंगाल-मधील घरोघरीं हें पुस्तक जावें अशी विनोबांनीं आशा प्रगट केली आहे. हा त्याचा मराठी अनुवाद महाराष्ट्रातल्या घरोघरीं जावा अशी मी आशा करितो. तसें झाल्यास महाराष्ट्र हि ग्र आंदोलनात मागें राहणार नाहीं.

मला बंगाली समजतें म्हणून त्याचें रूपांतर करण्याचे काम मीं हौसेने अंगावर घेतलें आणि माझ्या कुवतीप्रमाणें तडीस नेलें. येत्या मे महिन्यात हायस्कूलचे विद्यार्थी भूदान यज्ञाच्या प्रचाराकरिता निघणार आहेत. तेव्हा पुस्तक तातडीनेच छापावयाचें ठरल्यामुळें भाषांतर अधिक तज्ज्ञ माणसाकडून तपासून घेतलें नाहीं. काहीं दोष राहिले असतील ते पुढील आवृत्तींत दुरुस्त केले जातील.

मूळ पुस्तकात बंगालमधील जमिनीचा तपशील दिलेला आहे त्याऐवजी प्रकरण २२ आणि २३ मध्यें महाराष्ट्रातील जमिनीची परिस्थिति दिली आहे. यापेरीज मूळ पुस्तकात काही बदल केलेला नाहीं.

पुणें,
१८।४।५६

वामन जनार्दन कुंटे

# भूदान-यज्ञ–समग्र-दर्शन



## ( १ ) भूदान-यज्ञ म्हणजे कसला यज्ञ ?

यज्ञ शब्दाशीं आपला परिचय आहे. यज्ञ म्हणजे काय हें आपल्या सर्वांना कमीजास्ती प्रमाणात माहीत आहे. यज्ञ ही एक प्रकारची पूजा-पद्धति च आहे. " यजति यजते विष्णु सुधी. पूजयतीत्यर्थः । " अश्वमेध, राजसूय इत्यादींच्या कथा आपण जाणतों. गीतेच्या चवथ्या अध्यायात द्रव्ययज्ञ, तपो यज्ञ, योगयज्ञ, ज्ञानयज्ञ इत्यादि यज्ञांचा उल्लेख आहे. शिवाय गारुड श्रौतसूत्र ब्रह्मयज्ञ, पितृयज्ञ, देवयज्ञ, नरमेध, महाव्रत, सर्वतोमुख, पौंडरिक, अभिजित्, विश्वजित, आंगिरस इत्यादि अनेक प्रकारच्या यज्ञांचा उल्लेख आणि वर्णन पुराणान्तरीं आहे. परंतु भूदान यज्ञाचा उल्लेख कोठें हि नाहीं. हा शब्द नवीन आहे आणि यज्ञ हि नवीन च आहे. हा नवीन शब्द आहे म्हणून आपल्या मनात शंका येण्याचे काहीं कारण नाहीं. कारण, क्रांतिकारी शब्दसृष्टीशीं बंगालीचा विशेष प्रकारें परिचय आहे. 'दरिद्र-नारायण' आणि 'वंदे मातरम्' या दोन्हीं शब्दांचे निर्माते दोन महान् बंगाली गृहस्थ च होते स्वामी विवेकानंद यांना दरिद्र-नारायण हा शब्द स्फुरला आणि त्या शब्दानें धर्म आणि समाजसेवा यांमध्ये क्रांति घडवून आणली. वंदे मातरम् हा शब्द बंकिमचंद्र यांनीं निर्मिला. भारताच्या राष्ट्रीयत्वाच्या जागृतीमध्यें आणि हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यसंग्रामाच्या इतिहासात या शब्दाचे स्थान केवढें मोठें आहे हें सर्वांना माहीत आहे. भूदान यज्ञ हा शब्द हि भारतामध्यें आर्थिक आणि सामाजिक समता स्थापन करण्याचे क्षेत्रात क्रांतिकारक होईल यात शंका नाहीं. आम्ही यापुढें त्याचें जसजसें वर्णन करीत जाऊं तसतसें भूदान-यज्ञाचें तात्पर्य आणि त्याचा उद्देश क्रमाक्रमानें स्पष्ट होत जाईल. तरी पण थोडक्यात भूदान-यज्ञाचा

अर्थ इतकाच कीं, जो कोणी भूमिहीन असेल, ज्याला शेती करण्याचें ज्ञान आहे आणि जो शेती करू इच्छितो परंतु ज्याला दुसऱ्याच्या शेतात काम करणें किंवा दुसऱ्याच्या शेतात मजुरी करणें याखेरीज दुसरें उपजीविकेचें साधन नाहीं, अशा लोकांकरिता भूमिदान मिळविणें; आणि त्या भूमिदानातून जमिनीवरची मालकी विसर्जन करणें आणि जमिनीच्या मालकीची कल्पना च नाहींशी करणें एवढा आहे. अर्थात् हवा, पाणी आणि प्रकाश यावर ज्याप्रमाणें परमेश्वराची च मालकी आहे त्याप्रमाणे भूमीचा हि मालक परमेश्वर च; म्हणून प्रत्येकाला आपल्या हातानें शेती करण्याचा समान अधिकार आहे. हा बोध अंतःकरणात जागृत झाल्यामुळें जमीन-मालकानें आपली मालकी सोडून देऊन आपली जमीन भूदानयज्ञात अर्पण करायची. त्यामुळें गावची जमीन गावच्या च मालकीची होईल. अर्थात् भूमीचें ग्रामीकरण सिद्ध होईल. याप्रमाणें भूदान-यज्ञाचा उद्देश जमिनीच्या ग्रामीकरणाच्या पायावर ग्रामोद्योगप्रधान अहिंसक समाजाची स्थापना करणें हा आहे.

प्राण्याच्या आणि मनुष्याच्या जीवनधारणाला आणि पोषणाला ज्या कांहीं आवश्यक गोष्टी आहेत त्या परमेश्वरानें सर्वांना सहजसाध्य करून दिल्या आहेत. त्या म्हणजे पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं पंचमहाभूतें. सर्वांना हवेची अत्यंत जरूरी आहे. तिच्यावर सर्वांचा सारखा च हक्क आहे. ती तर प्रत्येकाच्या नाकाशीं सर्वदा हजर आहे. सूर्याच्या प्रकाशावर हि सर्वांचा सारखा हक्क आहे. त्याचा आपल्या जरूरीप्रमाणें कोणाला हि उपभोग घेता येतो. तसा च पाण्यावर हि सर्वांचा समान अधिकार आहे. आकाशातून जेव्हा पाऊस पडतो तेव्हा तो उच्च-नीच अथवा श्रीमंत-दरिद्री असा भेद करीत नाहीं. नदीचें वाहतें पाणी कोणी हि घेऊन जाऊं शकतो. परमेश्वरानें सृष्टि अशा कुशलतेनें घडविली आहे कीं, मनुष्य अथवा इतर जीव याना ज्या वस्तूची जितकी जास्त आवश्यकता तितकी ती वस्तु सहज मिळावी. हवेशिवाय मनुष्य क्षणभर हि जगणार नाहीं, तेव्हां हवा सर्वांना सहज मिळेल अशी व्यवस्था केली आहे. ज्याप्रमाणें हवा, प्रकाश आणि पाणी यांवर सर्वांचा समान अधिकार त्या च प्रमाणें जमिनीवर हि ईश्वरानें समान अधिकार दिलेला आहे. ईश्वरानें निर्माण केलेल्या वस्तूंवर

एकाचा अधिकार असेल आणि दुसऱ्याचा असणार नाहीं अशी भगवताची योजना असणे शक्य नाहीं. यासंबंधीं विनोबा आपल्या अनुपम शब्दात सांगतात "सूर्य प्रत्येक घरीं प्रवेश करतो त्याचे किरण राजाला जितके मिळू शकतात तितके च भंग्याला हि मिळू शकतात भगवान् कधीं हि आपण निर्माण केलेल्या वस्तू कोणाला कमी कोणाला जास्ती अशा देत नाहीं. परमेश्वरानें हवा पाणी, प्रकाश आणि आकाश हीं देण्यामध्यें भेदभाव केलेला नाहीं. तेव्हा जमीन मात्र सर्वांना सारख्या च प्रमाणात न देता ती काहीं लोकांच्या हातात दिली असल हें कसें संभवनीय आहे ?" परंतु युगानुयुगें, शेंकडो वर्षें समाजामध्य आर्थिक अव्यवस्थेच्या योगान जमीन मात्र काहीं लोकांची व्यक्तिगत संपत्ति झाली आहे काहीं लोकांना आहे, काहीं लोकांना नाहीं. काहीं लोकांच्याजवळ त्यांच्या जरुरीपेक्षा खूप जास्ती आहे. काहीं लोकांना पुरेशी जमीन नाहीं आणि पुष्कळांच्याजवळ मुळींच नाहीं. त्यामुळें च देशात हाहा कार माजला. देशातल्या विषमतेचें मूळ या अस्वाभाविक अन्याय्य जमिनीच्या व्यवस्थेंत आहे ज्याना अंत करण आहे त्यांनी आपल्या मनात विचार करून पहावें म्हणजे दरिद्र भूमिहीनांचा व्याकुळ आक्रोश हिंदुस्थानात वर वर दिसणाऱ्या शांततेचा भेद करून वर आलेला त्याना दिसेल "आईच्या कुशींतून दूर झालेलें मूल आईकडे जाण्याकरिता जसें व्याकुळ होतें त्याप्रमाणें च भूमिहीन दरिद्री लोक आपल्या भूमातेकडे जाण्याकरिता व्याकुळतेनें वाट पहात आहेत एखादी मूल नसलेली स्त्री दुसऱ्याच्या मुलाचें लालनपालन करिते तरी स्वत च्या मुलाला खेळविण्याची तिची स्वाभाविक इच्छा तृप्त होत नाहीं, त्याप्रमाणें च दुसऱ्याच्या जमिनी वर शेती करून शेतकऱ्याचें समाधान होत नाहीं."

ग्रामसंघटनेचें काम यशस्वी का होत नाहीं ? लोकांना चरखे दिले, माग दिले, अनेक ग्रामोद्योग शिकविले, तरी अंत करणापासून ते गावकऱ्यांनी स्वीकारले नाहींत. यानीं त्यांची तृप्ति झाली नाहीं कारण त्याना प्रथम जमीन पाहिजे. जमीन स्वत ची झाल्याशिवाय त्यांना समाधान नाहीं हिंदुस्थान, तसें च आशियांतील दुसरे मोठे देश, ज्या ज्या ठिकाणीं अशांति दिसून आली तिचें मूळ कारण ही भूमिसमस्या च आहे. म्हणून या जमिनीच्या प्रश्नाचा शांततेनें उलगडा करण्यात च भारताचें कल्याण आहे.

आणि भूदान यज्ञ हें या प्रश्नाचें शांतिपूर्ण समाधान करण्याचें आणि हिंदुस्थानात सामाजिक आणि आर्थिक समता स्थापन करण्याचें पहिलें पाउल आहे.

ही भूमीची भूक इतकी तीव्र कशानें झाली आहे? वर सांगितलें त्यात च याच कारण आहे. सगळ्याना सारख्या रीतीनें परमेश्वरानें पंचभूतावर अधिकार दिलेला आहे. त्यात जमिनीवर हि दिलेला आहे. मनुष्याच्या जीवनधारणेकरिता पंचभूतातल्या प्रत्येकाची आवश्यकता अपरिहार्य आहे. माणसाला हिंडण्याफिरण्याकरिता आकाश, श्वासोच्छ्वासाकरिता हवा, पिण्याकरिता पाणी आणि उजेडाकरिता प्रकाशाची आवश्यकता आहे. या चार हि वस्तू जरूर तितक्या प्रमाणात सर्वांना मिळूं शकतात, परंतु केवळ जमीन मात्र मनुष्याला सारख्या च प्रमाणात मिळू शकत नाहीं. याशिवाय जीवधारणेकरिता अन्न, वस्त्र आणि घर याची जरूरी आहे. खाण्याकरिता अन्न, वापरण्याकरिता वस्त्र आणि राहण्याचे घराला लागणारें सर्व सामान उत्पन्न करण्याचें भूमि किंवा भूगर्भ हें एकमात्र साधन आहे. अर्थात् जमिनींतून किंवा जमिनीच्या गर्भांतून उत्पन्न होणाऱ्या वस्तूंवर मनुष्याच्या अन्न, वस्त्र, घर वगैरे सर्वांची व्यवस्था अवलंबून आहे. भूमि किंवा भूगर्भ यापेक्षा दुसऱ्या कोणत्या हि साधनानें या वस्तु उत्पन्न होण्याचा संभव नाहीं. मनुष्य हातानें किंवा यंत्रानें विन्येक वस्तू निर्माण करू शकतो, परंतु अन्नधान्य, भाजीपाला, फळफळावळ ही फक्त भूमींतून च उत्पन्न होऊं शकतात. आपल्या वापरावयाच्या कापडाकरिता कापूस आणि चरखा व माग याकरिता लाकूड जमिनींतून च येतें. मागाकरिता लागणारें लोखंड खाणींतून मिळतें. घराला लागणारी माती, विटा, दगड, वगैरे सर्व वस्तू याना जमीन किंवा तिच्या पोटातील खाण हें एकमात्र कारण आहे. अशा प्रकारें जर विचार केला तर समजून येईल कीं, आमची उपजीविका आणि सुख स्वास्थ्य याकरिता जी काहीं साधनसामुग्री लागते तिचें उत्पत्तिस्थान जमीन किंवा जमिनीच्या पोटातील खाण होय. हवा, प्रकाश, पाणी यापेक्षा जमिनीमध्यें एवढा च फरक आहे कीं, पहिल्या तीन सर्वांना समान तऱ्हेनें भोगता येतात आणि हवा, प्रकाश आणि पाणी याचा उपयोग करिताना त्याकरिता परिश्रम किंवा ते उत्पन्न करण्याला काहीं कष्ट लागत नाहींत.

परंतु अन्न, वस्त्र, घर मिळवायचें झालें तर श्रम करून, जमीनींतून धान्य काढल्याशिवाय ते उत्पन्न होत नाहींत. भगवंतानें मनुष्याला एक तोंड दिलें आहे त्याप्रमाणें स्वत:करितां अन्न निर्माण करायला दोन हात दिलेले आहेत. मनुष्याची उपजीविका करण्याचें मूळ क्षेत्र आणि अन्न, वस्त्र, घर उत्पादन करण्याचें मूळ साधन जमीन होय. म्हणून हवा, पाणी, प्रकाश याप्रमाणें च जमिनीवर हि मनुष्याचा समान अधिकार, समान हक्क निष्कटक ठेवला नाहीं तर मनुष्याचें जीवन दुसऱ्यावर अवलंबून राहील, आणि मनुष्य—विशेषतः जो माणूस—आपल्या दोन्ही हातांनीं भूमीची सेवा करून उपजीविका करूं इच्छितो त्याचें नाक दाबून श्वासोच्छ्वास बंद केल्याप्रमाणें त्याची अवस्था होईल. आज जर कांहीं कारणानीं मनुष्याला हवेवर नियंत्रण करतां येऊं लागलें तर हवा ही मनुष्याच्या व्यक्तिगत मालकीची वस्तु होऊं शकेल. अधिकांश हवा कांहीं थोड्या च व्यक्तींच्या हातांत जमा होईल. हवेचे जमीनदारी-इनामदारीसारखे हक्क स्थापित होतील आणि हवेला हि एकराला २०० रु. किंमत किंवा दहा रुपये खंड पडूं लागेल. अशी स्थिति झाली तर काय अवस्था होऊन जाईल ? त्याच्या-जवळ हवा नाहीं त्याला प्राण वांचविण्याकरितां हवेवर ज्याची सत्ता आहे अशा जमीनदार-इनामदार यांचे सेवावृत्ति करण्याची पाळी येईल. हवेचे जमीनदार, इनामदार यांच्या हातीं त्याच्या जीवनमरणाचा प्रश्न आहे असें त्यांना आढळून येईल. एखाद्याचें जीवन किंवा मरण एखाद्या राक्षसीच्या हातीं असतें असें आपण परींच्या गोष्टींमध्यें वाचतों, त्याप्रमाणें च एखाद्या मनुष्याला शेतीचें ज्ञान आहे, शेती करण्याची इच्छा आहे, शेती-शिवाय दुसरें उपजीविकेचें साधन नाहीं पण स्वत:ची जमीन नाहीं, त्याच्या अनुभवाला असें येईल कीं, त्याचें जीवन आणि मरण त्या परी-कथेंतल्या गोष्टींतील राक्षसीप्रमाणें जमीनदार-इनामदार यांचे हातांत आहे. कारण त्याच्या उपजीविकेला हवा, पाणी, प्रकाश यांशिवाय आणखी ज्या तीन वस्तू आवश्यक आहेत त्या अन्न, वस्त्र व घर या वस्तू निर्माण करण्याचें साधन जी भूमि ती त्याच्या हातीं नाहीं. ती जमीन मिळविण्याकरितां दुसऱ्याच्या मर्जीखुशीवर त्याला अवलंबून राहिलें पाहिजे. म्हणून च त्यांना श्वास बंद केलेल्या माणसासारखा, गुदमरून गेल्यासारखा अनुभव येतो.

त्याच्या अंतःकरणातल्या अगदीं खोल प्रदेशात ही अनुभूति सुप्त असते. ही त्याची अंतःकरणातली आकांक्षा आता हळूहळू त्याच्या मुखातून बाहेर पडू लागली आहे. भारतांत लौकरात लौकर आणि शांतीच्या मार्गानें जमिनीचें योग्य वाटप होणार नसेल तर भारताच्या प्रगतीचा मार्ग रुद्ध होईल आणि भारताला दुर्दैवाच्या फेऱ्यात पडावें लागेल.

या ठिकाणीं एक प्रासंगिक पण आवश्यक गोष्ट समजून घेतली पाहिजे. ज्याला श्वास करणें आवश्यक आहे त्याला हवा मिळते. हवा मिळण्याचा त्याला मूलभूत हक्क आहे. ज्याला तहान लागली आहे त्याला पाणी मिळू शकतें. पाणी मिळण्याचा त्याला मूलभूत हक्क आहे. त्याप्रमाणें च ज्याला भूक लागली आहे त्याला अन्न मिळण्याचा हि हक्क आहे खरा; परंतु जेव्हा तो परिश्रम करून अन्न उत्पन्न करील तेव्हा च तो हक्क सिद्ध होईल. असे श्रम जर तो करणार नाहीं तर अन्न मिळण्याचा त्याला नैतिक अधिकार नाहीं. कारण भूमीवर कष्ट केल्याशिवाय अन्नधान्य उत्पन्न होण्याचा संभव नाहीं. ह्या एक च कारणाकरिता जमीन मिळण्याचा हक्क एखाद्या व्यक्तीला तेव्हा च प्राप्त होईल जेव्हा तो आपल्या स्वतःच्या हातानें शेती करायला तयार होईल. नाहीं तर असा हक्क आपला आहे असें म्हणण्याचा त्याला नैतिक अधिकार नाहीं. ही भूमीची भूक कशी भागेल? साधारणपणें लोकांना असें वाटतें कीं, भूदान यज्ञाचे पायावर समाजरचना करण्याची जरुरी नाहीं. जमिनीचें समान वाटप तातडीनेच करणें आवश्यक आहे, आणि कायद्यानें च तें शक्य आहे, अशा प्रकारची मनोवृत्ति झाल्यामुळें स्वातंत्र्यप्राप्तीनंतर देशातल्या सर्व लोकांचे डोळे सरकारकडे लागून राहिले आहेत. परंतु वरील विवेचनावरून समजून येईल कीं, देशाच्या सध्याच्या परिस्थितींत कायद्याचे साहाय्यानें जमिनीचा प्रश्न समाधानकारक सुटण्याचा संभव नाहीं. आणखी कित्येकांना वाटतें कीं, हिंसामार्गानें म्हणजे बळजबरीनें जमिनीचा प्रश्न अधिक च लवकर सुटून जाईल; परंतु दुसऱ्या देशाचें निरीक्षण केलें तर आपणाला समजून येईल कीं, आपल्या देशाच्या वर्तमानस्थितींत तें हि शक्य नाहीं. शांतीचा आणि प्रेमाचा मार्ग हा च काय तो आपल्या देशातील जमिनीचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडविण्यास समर्थ होईल. भूदान-यज्ञ हा शांतीचा आणि प्रेमाचा मार्ग आहे. भारतातील

भूमीची भूक तृप्त करण्याचा तो देशव्यापी प्रयत्न आहे. सगळ्याच्या अंत-करणात भगवान् विराजमान आहे. भूदान यज्ञ-आंदोलन हें मनुष्याच्या अंत करणातल्या या भगवताची भक्तिपूर्ण आळवणी आहे. जमिनीवर सर्वांचा समान हक्क आहे. त्या अधिकारापासून जे वंचित झाले ते धुळाला मिळाले आहत, ते सर्वस्वीं नागवले गेले आहेत, ते भुकेच्या अग्नींत जळत आहेत, त्याना उपजीविका मिळवण्याचा दुसरा कोणता हि उपाय नाहीं. त्याचा तो गलेला हक्क पुन्हा परत द्या. त्याची हक्काची जमीन त्याना परत द्या. भूमीचा ईश्वर च काय तो मालक, भूमि सगळ्याची माता, सर्वजण भूमीचे संतान, भूमीचे बालक. आपण सर्वजण भूमीचे बालक, परतु तुम्ही आपणाला जमिनीचे मालक म्हणवता म्हणजे तुम्ही आईला आपली दासी बनवता आज या अन्यायाच्या प्रतिकार करण्याची वेळ आली आहे. जमिनीची मालकी विसर्जन करण्याची दीक्षा घ्या. बाळाला आपल्या भूमिमातेच्या कुशीपासून दूर केले आहे. त्या आईचे उष्ण, दीर्घ, श्वास आणि त्या बाळाचे अश्रू या दोहींनीं देशातील हवा तापून गेली आहे कोणाला हि शांति लाभत नाहीं म्हणून बाळाला आईच्या मांडीवर पुन्हा ठेवा. तेव्हा च पुन्हा शांतिस्थापना होईल, श्रीमंताचे कल्याण होईल, गरिबाचें कल्याण होईल आणि देशाचें हि कल्याण होईल. मनुष्याचे अंत करणात निद्रिस्त असणाऱ्या परमेश्वरा, तू जागा हो, प्रसन्न हो, जाणता अजाणता भूमिहीन गरिबावर जो युगानुयुगें अन्याय चालला आहे त्याचा प्रतिकार होऊ दे तो दूर होऊ दे. त्या गरिबाच्या हृदयातला भगवान् आज जागा झाला आहे.

## ( २ ) भूदान यज्ञाच्या यशाविषयीं शंका

अशा विनतीला मनुष्य साथ देईल का ? ज्या ठिकाणीं मनुष्य पाच हात जमीन हि दुसऱ्याला देत नाहीं, पाच हात जमिनीकरिता हि लोकामध्ये मारामाऱ्या होतात, हायकोर्ट सुप्रीम कोर्टापर्यंत लढे लढले जातात, त्या ठिकाणीं मनुष्य अशा तऱ्हेनें मागून स्वेच्छेनें जमीन देईल काय ? हिंदुस्थानात शेती करण्यायोग्य जमीन ३० कोटि एकर आहे. त्यातील $\frac{1}{6}$ अर्थात् ५ कोटि एकर जमीन ज्या लोकाच्या वाट्यास आहे त्याच्याकडून भूमिहीन

गरिबाना जेव्हा दिली जाईल तेव्हा हा जमिनीचा प्रश्न सुटेल. एवढ्या मोठ्या प्रश्नाचे—एवढ्या विराट समस्येचें—समाधान भूदानानें होण्याचा संभव आहे काय?

१९५२ सालच्या मे महिन्यात डायमड हार्बरजवळ हाटगंजो गावीं पश्चिम बंगालच्या भूदान यज्ञाचें संमेलन भरवून बंगालमध्यें भूदान-यज्ञाची चळवळ सुरू झाली. त्यानंतर भूदान यज्ञाचा प्रचार करण्याकरिता आणि भूदान प्राप्त करण्याकरिता डायमड हार्बर तालुक्यात चारुचंद्र भंडारी यांनीं गावोगाव पदयात्रा केली. एके दिवशीं सध्याकाळीं एका गावीं भूदान यज्ञावर व्याख्यान देण्याचे वेळीं सभेंत तेथील कित्येकजण उभे राहून म्हणू लागले, "हें पहा, ही चळवळ म्हणजे केवळ मूर्खपणा आहे जमीन मिळवावयाची असेल तर कायद्यान, नाहीं तर बळजबरीनें च घेतली पाहिजे. अशी मागून जमीन मिळेल अशी आशा करणें यासारखा मूर्खपणा दुसरा कोणता असणार? विनोबाजी एक मूर्ख आणि त्याच्यामागें तुमच्यासारखे काही पागल लोक जमले आहेत आपलें शास्त्र, आपलें महाभारत आपल्याला असें शिकवतें कीं, युद्धाशिवाय कोणी कोणाला जमीन देत नाहींत. हातानें कोणी जमीन परत देत नाहींत." श्रीयुत भंडारींनीं त्याना उत्तर दिलें, "परंतु आम्हाला त्या च महाभारतापासून वेगळें च शिक्षण मिळालें. पांडवाना त्याची न्याय्य जमीन कौरवानीं परत दिली नाहीं सुईच्या टोंका वर राहील इतकी जमीन दिली नाहीं, म्हणून लढाई झाली. त्या काळच्या भारतात जेवढे म्हणून राजे होते तेवढे पांडवाच्या बाजूला किंवा कौरवाच्या बाजूला उभे राहिले कौरव सर्व ठार झाले पांडवाची हि तशी च अवस्था झाली. घरामध्यें दिवा लावण्यापुरते काहीं लोक जिवंत राहिले येवढ च. इतका भयंकर परिणाम त्या युद्धाचा झाला. तेव्हा यासर्वीं महाभारता वरून जर काहीं शिकायचें असेल तर ते हें च कीं, ज्याची त्याची न्याय्य *जमीन त्याला त्याला परत केली च पाहिजे. नाहीं तर सर्वनाश अनिवार्य* आहे, चुकणार नाहीं"

परंतु एवढ्याने मनातला सदाय दूर झाला नाहीं. इतिहासात याला दुसरें उदाहरण नाहीं असें कोणी म्हणतात. यापूर्वी कधीं हि जे घडलें नाहीं तें पुढें तरी कसें घडेल? *अशा तऱ्हेची अडचण किंवा शका घेण्याचें काहीं*

कारण नाहीं. इतिहासांत कोणचा विषय लिहिला जातो ? जे पूर्वी कधीं घडले नाहीं ते जेव्हा घडून येतें तेव्हा च त्याला इतिहासांत स्थान मिळतें. जें घडून गेले आहे आणि जें रोज घडत आहे तो मुळीं इतिहास च नव्हे. फ्रेन राज्यक्रांति घडली त्यापूर्वी त्या इतिहासात तिचा काहीं दाखला होता का ? निःशस्त्र संग्राम करुन भारतानें स्वातंत्र्य मिळविलें अशी घटना पूर्वीच्या इतिहासांत कधीं घडली होती का ? म्हणून असा संशय बाळगण्याचें कारण नाहीं. तथापि संशय मात्र पूर्ण दूर झाला नाहीं. भूदान-यज्ञ चळवळीची उत्पत्ति, तिचा विकास आणि आजपर्यंतची तिची प्रगति यांचें निरीक्षण केले आणि भूदान-यज्ञात असलेले तत्त्व लक्षात घेतलें म्हणजे सर्व संशय दूर करता येतील अशी आशा वाटते.

## ( ३ ) कोण हे विनोबा ?

भूदान-यज्ञाचे प्रवर्तक विनोबा भावे. कोण हे विनोबा ? ते आजन्म सेवाव्रती सन्यासी, महात्मा गांधींचे परमशिष्य, गांधींच्या कल्पना अमलांत आणणारे, त्याना मूर्त स्वरूप देणारे श्रेष्ठ साधक. त्याना महात्मा गांधींचे आध्यात्मिक वारस म्हणता येईल. वडिलाकडून प्राप्त झालेली संपत्ति जो वाढवतो तो च योग्य वारस आणि गुरुनें दिलेली विद्या जो वाढवितो तो च खरा शिष्य. या अर्थानें विनोबा हे महात्मा गांधींचे योग्य आध्यात्मिक वारस आणि शिष्य आहेत. ते या युगांतले युगपुरुष आहेत. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारतांत रामराज्य म्हणजे च सर्वोदय स्थापन करण्याचें महात्मा गांधींचें ध्येय होतें. परंतु स्वातंत्र्यप्राप्तीनंतर थोड्या च दिवसात त्यांचें निर्याण झालें. त्याचें स्वप्न साकार करील असा कोणी महापुरुष लोकांच्या दृष्टीपुढे नव्हता. त्यामुळें देशांत निराशेचा अंधःकार पसरला. अनेक वर्षेपर्यंत विनोबा एकान्तसाधनेंत मग्न होते. तो एकान्तवास सोडून ते बाहेर आले आणि थोड्या च दिवसांत त्यांच्या प्रकाशकिरणांनी दिशा उजळूं लागल्या. थोड्या च दिवसांत देशांतल्या गांवोगावीं, शहरोशहरीं एक नवीन जागृति दिसूं लागली. आज सर्व भारत त्यांच्याकडे आशापूर्ण दृष्टीनें पहात आहे. सध्या सर्व जगाला शांतीची तहान आहे म्हणून जगांतल्या अनेक देशांतले लोक हि त्यांच्या तोंडांतुन निघालेले शांतीचे शब्द उत्कंठेनें ऐकत आहेत.

१९४० सालीं श्री. महादेव देसाई यानीं विनोबासबंधीं लिहिलें होतं, "लोकाना आज नाहीं पण काहीं वर्षांनीं विनोबाचा प्रभाव कळून येईल." ही त्याची भविष्यवाणी खरी ठरली आहे.

कुलाबा जिल्ह्यातल्या गागोदें या गावीं ११ सप्टेंबर १८९५ ह्या दिवशीं चित्पावन ब्राह्मणकुळात विनोबाचा जन्म झाला. त्याच्या वडिलाचें नाव नरहरी आणि आईचें नाव रुक्मिणीबाई. त्याना रखुमाई म्हणत. आजोबाचें नाव शंभूराव भावे.

विनोबाचे आजोबा मोठे उदार, धर्मपरायण आणि तेजस्वी पुरुष होते. त्या काळात हि ते अस्पृश्यता मानीत नसत. जातीय भावना हि त्याच्यामध्यें नव्हती. कोणाची हि पर्वा न करता एकदा त्यानीं एका मुसलमान गवयाला बोलावून आपल्या पार्टेश्वराचे मंदिरात भजन करविलें होतें ते चांद्रायण व्रत करीत असत. हें व्रत अतिशय कठीण आहे. शंभूरावाना तीन मुलगे नरहरी, गोपाळ आणि गोविंद असे होते. थोरले चिरंजीव नरहरपंत तीक्ष्ण बुद्धीचे आणि महत्त्वाकांक्षी होते. कॉलेजचें मामुली शिक्षण सोडून देऊन विणाई कला साध्य करण्याकरिता बडोद्याच्या एका कारखान्यात त्यानीं काम पत्करलें.

नरहरपंताचे पहिले चिरंजीव विनोबा. विनोबाचें पूर्ण नाव विनायक नरहर भावे. घरीं त्याना विन्या म्हणत. म. गांधींच्या आश्रमात आल्यावर गांधीजी त्याना विनोबा म्हणू लागले. विनोबाना तीन भाऊ. बाळकृष्ण, शिवाजी आणि दत्तात्रय. एक बहीण शांता. धाकटा भाऊ दत्तात्रय लहानपणीं च वारला. बहीण हि लग्न होऊन थोड्या च दिवसात मेली. विनोबा गांधींच्या साबरमती आश्रमात आल्यावर दोन्ही भाऊ वडील बंधूचें अनुकरण करून आश्रमात दाखल झाले. बाळकोबा सध्या महात्मा गांधींनीं स्थापन केलेल्या उरळीकांचन येथील निसर्गोपचार केंद्राचें काम पहात आहेत. शिवाजी एक उत्तम भाषातत्त्वविद् आणि संतसाहित्याचे खोल अभ्यासक आहेत. भारताच्या लिपि संशोधनाच्या कामात ते गढलेले आहेत.

विनोबाचें लहानपण गागोदें गावीं गेलें. त्याच्याभोंवतीं डोंगर, पहाड आहेत. आजोबाची धर्मनिष्ठा, भक्तिभाव आणि तेजस्विता याची

विनोबांच्या बालमनावर खोल छाप पडली होती. त्यांची आई मोठी धार्मिक आणि देवावर दृढ श्रद्धा असलेली स्त्री होती. तिचें अंतःकरण थोर आणि उदार होतें. आई च विनोबांची पहिली श्रेष्ठ गुरु. आईपासून आपल्याला फार मिळालें असें ते म्हणतात. आई दागिने वापरीत नसे. कितीहि थंडी पडली तरी पहाटे थंड पाण्यानें अंग धूत असे. तिनें आपल्या वडिलांकडून पुष्कळशीं मराठी भजनें ऐकून पाठ केलीं होतीं. स्वयंपाक करितांना हि ती तोंडानें भजन गुणगुणत असे आणि कित्येक वेळां त्यांत इतकी तन्मय होऊन जाई कीं, आमटी भाजीमध्यें दानदा मीठ घातलें कीं मुळींच घातलें नाहीं याची तिला आठवण रहात नसे. विनोबा तिचे हे अभंग ऐकण्यांत गढून जात. मुलांच्या मनांत धर्मनिष्ठा वाढावी म्हणून त्यांची आई मुलांना साधुसंतांच्या गोष्टी सांगत असे. त्यामुळें च विनोबांच्या मनांत धर्मग्रंथांविषयीं आवड उत्पन्न झाली. खाण्याच्या पूर्वी तुळशीला पाणी घातलें पाहिजे अशी आईची मुलांना शिकवण असे. दुसऱ्यांना खायला दिल्याशिवाय आपण खाऊं नये, तसें च झाडांना हि पाणी घातल्याशिवाय आपण खाऊं नये, असें ती सांगे. शंकराच्या देवळांत चाललेला अभिषेक ती मुलांना दाखवी आणि अभिषेकाचें थेंब थेंब पाणी निरंतर घालीत राहणें हें साधनेचें उदाहरण आहे, बालदीभर पाणी एकदम शंकराच्या पिंडीवर ओतल्यामुळें अभिषेकासारखी सतत साधना साधत नाहीं, हें शिकवी. अगदीं लहानपणापासून खाण्याकडे विनोबांचें विशेष लक्ष नसे. आपल्याला आणखी पाहिजे, आणखी पाहिजे, अशी इच्छा धरल्यानें मनाची तृप्ति होत नाहीं, संयमानें च खरें सुख मिळतें, असें त्यांना आई सांगे. आईनें एकदां त्यांना आज्ञा घेऊन खायला एक पैसा दिला होता. पण विनोबांना त्याची आठवण हि राहिली नाहीं. पैसा खिशांत च राहून गेला पण कांहीं दिवसांनीं खिशांत पैसा कोठून आला याची आठवण झाल्यावर त्यांनीं तो आईकडे परत दिला. आईचें मन मोठें उदार असे आणि ती सगळ्यांशीं सारख्या च प्रेमानें वागे. त्यांच्या घरीं एक आपळे आश्रित होते विनोबा वगैरे मुलें त्यांना आधळेकाका म्हणत. त्यांच्याशीं आईचें वागणें ते घरांतले कोणी आप्तस्वकीय आहेत असें असे. विनोबा वगैरे मुलांना ते कोणी परके आहेत हें माहीत हि नव्हतें. आधळेकाका वारले तेव्हां घरीं कोणी सुतक पाळलें

नाहीं तेव्हा त्यानीं आईला असें का म्हणून विचारलें, तेव्हा आधळेपाचा आपले कोणी आत नव्हते हें त्याना कळलें.

आईचा स्वभाव सेवापरायण होता. शेजाऱ्याचे घरीं कोणी आजारी असलें तर त्याच्या घरीं स्वयपाक वगैरे कामात ती मदत करी एकदा आपल्या घरातील स्वैंपाक आवरून नतर ती शेजाऱ्याकडे स्वैंपाकाला गेली. ती मागून शेजाऱ्याकडे का गेली, त्यात तिचा काहीं स्वार्थ होता का, अशी विनोबाच्या मनात शका येऊन त्यानीं तिला विचारलें. आईनें सागितलें कीं, त्याच्या घरीं मागून स्वयपाक केल्यामुळें त्याना गरम गरम पदार्थ मिळावे म्हणून मी मागाहून त्याच्याकडे गेलें. कोणी हि भिकारी दारात आला तर त्याला ती विन्मुख घालवीत नसे. चागल्या दणकट भिकाऱ्याला अशी भिक्षा घालणें योग्य नव्हे, यामुळें आळसाला उत्तेजन मिळतें, असें विनोबा तिला म्हणाले, पण आईनें त्याचें म्हणणें खोडून टाकलें आणि तिचा युक्तिवाद आजपर्यंत हि विनोबाना खोडून टाकता आलेला नाहीं. आईचें म्हणणें " जो दारात येतो तो देव च असतो तो पात्र कीं अपात्र हें ठरवणारे आपण कोण ? " आईचें हें थोर आचरण पाहून विनोबाच्या बालमनात समता आणि भक्ति याचें बीज पेरलें गेलें.

धर्मग्रथाचें वाचन आणि आईचें शुद्ध जीवन याचा विनोबाच्या मनावर परिणाम होऊन साधना करण्याकडे त्याचें मन वळलें. हळूहळू विनोबाचें वागणें कडक तपस्व्यासारखें होऊ लागलें. तें पाहून आई एके दिवशीं त्याना म्हणाली, " विन्या, गृहस्थाश्रमधर्माचें नीट पालन केलें तर एका पुरुषाचा उद्धार होतो, परतु उत्तम ब्रह्मचर्य पाळलें तर सात पिढ्याचा उद्धार होतो." ह्या आईच्या वचनामुळें हि ब्रह्मचर्य पाळण्याची त्यानीं प्रतिज्ञा केली. त्या वेळीं विनोबाचें वय फक्त दहा वर्षाचें होतें. त्यापूर्वी रामदास स्वामींचा दासबोध वाचून हि त्याचें मन ब्रह्मचर्याकडे वळलें होतें. आईचा आशीर्वाद घेऊन दहावे वर्षीं ब्रह्मचर्य पाळण्याचा त्यानीं संकल्प केला.

१९०५ सालीं अकराव्या वर्षीं विनोबा आईबरोबर बडोद्यात वडील नोकरीवर होते तिकडे गेले. तेथें त्याचें शालेय शिक्षण सुरू झालें. विनोबाची बुद्धि अगदीं लहानपणापासून तीक्ष्ण होती. स्मृति हि असामान्य. एके ठिकाणीं त्यानीं म्हटलें आहे कीं, आपण एकदा वीस पचवीस हजार

श्लोक मुखोद्गत केले होते. लहानपणापासून ते जात्या च अध्ययनशील होते. चौदा पधरा वर्षांचे वयात च त्यांनीं बडोद्याच्या सेंट्रल लायब्ररीमधील सर्व पुस्तकें वाचून टाकलीं होतीं. ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. कारण बडोद्यातील सेंट्रल लायब्ररी हिंदुस्थानातली एक मोठी लायब्ररी अशी तिची ख्याति होती जेव्हा वाचनालयात वाचायला पुस्तक उरलें नाहीं तेव्हा मित्राच्या सहकार्यानें विद्यार्थि मंडळ नावाची एक अध्ययनसंस्था त्यांनीं स्थापन केली. त्या संस्थेकरिता सुमारें १६०० पुस्तकाचा संग्रह केला होता. प्रत्येक पुस्तक त्या त्या विषयातलें उत्तमातलें उत्तम असे च मिळविलें जाई. विनोबाना फिरण्याची हि फार आवड होती. पाच सात मैल चालायनें त्याना काहीं च वाटत नसे. कित्येक वेळा बारा बारा मैल हि ते फिरायला जात. सोबती बरोबर जात, परतु त्याना विनोबाच्या बरोबर जाण्याची ओढ असे. कारण चालताना त्यांचें जें बोलणें चाले तें ऐकायची त्याना फार इच्छा असे. त्यांनीं बोलायला सुरुवात केली म्हणजे त्यांचें भाषण नदीच्या अखंड प्रवाहाप्रमाणें चालत असे कित्येक वेळा रस्त्यामधें हि मित्राच्या बरोबर त्यांचा वाद चाले तेव्हा त्याच्याभोंवतीं ऐकणाराची गर्दी जमत असे.

• वर्गामध्यें विनोबाचा पहिला नबर असे. मराठी भाषेवरील त्याच प्रभुत्व तर अद्वितीय होतें. संस्कृताचा त्यानीं घरीं अभ्यास केला. कारण वडिलाच्या सल्ल्याप्रमाणें त्यानीं शाळेंत दुसरी भाषा फ्रेंच घेतली होती. मॅट्रिक परीक्षेत त्याचा वर नबर येणें मुळीं च कठीण नव्हतें, पण तसा वर नबर मिळविण्याकरिता खटपट करणें त्याना आवडत नसे. स्वतत्र वाचना कडे च त्याचा कल असे. १९१४ सालीं मॅट्रिक पास होऊन ते कॉलेजात दाखल झाले. त्याचा गणित हा विषय आवडीचा होता. गणितातल्या प्रावीण्याबद्दल विद्यार्थिवर्गात त्याची ख्याति होती परतु हळूहळू असल्या शिक्षणावरून त्याचें मन उडून गेलें. गतानुगतिक जीवन घालविण्यात त्याना रस वाटेना. शाळेत त्याचें जीवन कडक होतें, त्यात कॉलेजमध्ये गेल्यावर हि फरक पडला नाहीं. शाळेंत असताना ते चटईवर झोंपत, तसें च कॉलेजमध्यें गेल्यावर हि झोंपत शिकत असताना च तेव्हाच्या राष्ट्रीय चळवळीनें हि त्यांचें लक्ष वेधून घेतलें होतें. स्वदेशी चळवळ आणि वगभगाचे आंदोलन याचा तो काल होता. कॉलेजमध्यें शिकताना च बगालमधल्या

क्रांतिकारकांच्या चळवळीकडे त्यांचें मन ओढलें गेलें होतें. या प्रकारें त्यांचें मन दोन बाजूंनीं ओढलें जात होतें. (१) आध्यात्मिक साधना आणि (२) स्वातंत्र्यसंग्राम. या दोन्हींमध्यें चित्त व्यग्र झाल्यामुळें त्यांनीं अभ्यास सोडून दिला आणि गृहत्याग करण्याचा निर्णय घेतला.

इंटरमीजिएट परीक्षेपूर्वीं ते एक दिवस चुलीपुढे शेकत बसले होते आणि त्यांना त्यापूर्वीं मिळालेलीं शिफारसपत्रें त्यांनीं चुलींत जाळून टाकलीं. हें काय करीत आहेस असें आईनें विचारलें तेव्हां " आतां शिकायचें नाहीं आणि नोकरी हि करायची नाहीं म्हणून हीं सर्टिफिकिटें जाळून टाकीत आहें " आई म्हणाली, " असलीं म्हणून काय झालें ? आतां नाहीं तरी पुढें केव्हां तरी उपयोगी पडतील." विनोबांनीं उत्तर दिलें, " तीं जर आतां सांभाळून ठेवलीं तर केव्हां तरी त्यांच्या बंधनात पडायला होईल, म्हणून त्याचा संभव च नाहींसा करून टाकीत आहें." मनात धरलेल्या कामात ते किती नेटानें पडत त्याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे. इंटरच्या परीक्षेकरिता ते मुंबईला निघाले होते. पण मुंबईला न जाता वाटेंत सुरतेला गाडी बदलून ते काशीला निघून गेले आणि आता पुन्हा घरीं येणार नाहीं असें त्यांनीं घरीं कळविलें.

काशीला त्यांनीं उत्तम प्रकारें संस्कृतचें अध्ययन केलें. तेथें सेंट्रल लायब्ररी म्हणून एक प्रसिद्ध वाचनालय आहे. तेथें धर्मग्रंथवाचनात ते गढून गेले. धर्मग्रंथाच्या वाचनाबरोबर च ते आसन, प्राणायाम वगैरे हि करीत. दोन तास विद्यार्थ्यांना शिकवणी करून दोन रुपये मिळवीत. तेवढ्या दोन रुपयात ते आपलें काम भागवीत. तीन दिवसांनीं एकदा जेवण करीत. त्यांचें मुख्य खाणें म्हणजे दहीं रताळीं. घर सोडलें तें दोन उद्देश मनात धरून. एक म्हणजे आत्मज्ञान प्राप्त करून घ्यायचें आणि दुसरें क्रांति कार्यांत पडायचें. क्रांतीकरिता ते बंगालकडे ओढले जात होते आणि आत्म-विवेकरिता हिमालयाकडे. काशींत बंगालचे कांहीं क्रांतिकारी त्यांना भेटले. त्यांच्याशीं झालेल्या संभाषणानें त्यांचें समाधान झालें नाहीं.

तें १९१६ साल होतें. हिंदुविश्वविद्यालयाच्या समारंभाकरितां म. गांधी काशीला आले होते. त्या समारंभात झालेलें त्यांचें भाषण विशेष प्रभावशाली झालें. वर्तमानपत्रात तें वाचल्यानंतर इतर अनेकांप्रमाणें त्यांचा विनोबांच्या

मनावर हि फार मोठा प्रभाव पडला. त्यांनीं पत्रानें पुष्कळशा प्रश्नावर त्यांचें मत विचारलें होतें. 'या प्रश्नांची उत्तरें पत्रद्वारें देता येण्यासारखीं नाहींत, तू आश्रमात ये' असें महात्मा गांधींनी त्याना कळविलें आणि विनोबा गांधींच्या आश्रमात दाखल झाले त्या वेळीं गांधींचा आश्रम साबरमतींत नव्हता. अहमदाबादजवळ कोचरब म्हणून गाव आहे तयें होता. विनोबा तेथें गेले आणि म. गांधींना भेटले आश्रमातील सरळ, पवित्र जीवनक्रम आणि वागण्यात अभेदभाव, देशभक्ति आणि त्याग, तपस्व्यासारखें जीवन पाहून विनोबाच्या मनावर फार मोठा परिणाम झाला. जे उद्देश मनात धरून त्यांनीं घर सोडलें होतें त शांति आणि अध्यात्म हे दोन्ही हि गांधींच्या जीवनात त्याना एकत्र लाभले. त्यामुळें त्यांच्या मनाचें समाधान होऊन म गांधींच्या आश्रमीय जीवनात त्यांनीं आपल्याला मिसळून टाकलें.

आश्रमीय जीवनात भाग घेतल्यामुळें विनोबानीं आपल्या जीवनाचें जें ध्येय मानलें होतें तिकडे जीवन नेण्याचा त्याना सुयोग प्राप्त झाला आणि म गांधींच्यासारखा नेता मिळाल्यामुळें त्याना आपण धन्य व कृतार्थ झालों असें वाटलें आश्रमातलें सर्व कठीण काम जडभरताप्रमाणें ते कोणाच्या विशेष लक्षात न यता करून टाकीत. पाणी ओढणें, सफाई, स्वयपाक, सूतकताई, विणाई वगैरे आश्रमात जी कामें चालत त्या सर्वांत ते भाग घेत. अतिशय श्रम घेतल्यामुळें त्यांची प्रकृति बिघडली तेव्हा प्रकृति सुधारण्या-करिता आणि सस्कृत धर्मग्रथाचा विशेष अभ्यास करण्याकरिता त्यांनीं एक वर्षाची सुट्टी घेतली आणि वाईसारख्या चांगल्या हवेच्या ठिकाणीं नारायण-शास्त्री मराठे यांच्यासारख्या आजन्म ब्रह्मचारी थोर विद्वानाजवळ त्यांनीं उपनिषदें, गीता, ब्रह्मसूत्र आणि शाकरभाष्य, मनुस्मृति, पातञ्जलयोगदर्शन, वैशेषिकदर्शन आणि याज्ञवल्क्यस्मृति वगैरे ग्रथाचा अभ्यास केला. त्याबरोबर च ते विद्यार्थ्यांना गीता, ज्ञानेश्वरी शिकवीत. अशा प्रकारें त्यांनीं सस्कृत आणि धर्म शास्त्र या दोन्हींमध्ये अगाध पाडित्य सपादन केलें. वाईला असताना हि आपण जणू आश्रमात आहों अशा च प्रकारें आश्रमातले नियम ते अगदीं कडकपणें पाळीत. वाईहून त्यांनीं म. गांधींना एक वेळ च मोठें पत्र लिहिलें आहे. त्यात त्यांनीं आपल्या कार्याचें विस्तृत वर्णन केलें आहे. आणि शेवटीं आपण मला पाहिजे तसें आहों असें लिहिलें होतें. हें पत्र वाचून म गांधींच्या मनात

आलें, पुत्रानें पित्याला मार्गे सारलें. ते आनंदानें उद्गारले, " हा म्हणजे भीम आहे." पर्व पुरे झालें. बरोबर त्या च दिवशीं ते आश्रमात दाखल झाले आणि चूपचाप तेथल्या कामात मग्न झाले. सत्यावर आणि नियम पाळण्यावर अशी त्यांची कठोर निष्ठा होती. नंतर काहीं दिवसांनीं आश्रमात पायखानासफाईचें काम सुरू झालें. विनोबा त्यात हि सर्वांच्या पुढें होते. अतिशय निष्ठापूर्वक आणि तन्मयतेनें त्यांनीं तीन महिने तें काम केलें. पुढें काहीं दिवस गुजरात विद्यापीठात शिकविण्याचें आणि आश्रमाच्या व्यवस्थापकाचें हि काम त्यांनीं केलें.

१९१८ सालीं इतर ठिकाणाप्रमाणें बडोद्याला हि इन्फ्लुएन्झानें कहर केला. त्या व्याधीनें विनोबाची आई आजारी पडली. ही बातमी कळल्यावर गांधीजींनीं विनोबाना आईच्या शुश्रूषेकरिता घरीं जाण्यास आज्ञा केली. मृत्युशय्येवर पडलेली आणि आपला प्रिय पुत्र चार दिवसांनीं भेटला तरी हि आई त्याना म्हणाली, " आपलें हातातलें काम सोडून इथं कशाला आलास ? " धन्य ती माता ! आईला मृत्यूनें ओढून नेलें. विनोबाना ब्राह्मणाकडून मंत्राग्नि देण्याची चाल पसत नव्हती. ते स्मशानात गेले नाहींत. ते आईच्या अंथरुणाजवळ गीता आणि उपनिषद् यांचा पाठ करीत बसले.

१९२१ सालीं शेठ जमनालाल बजाज यांच्या विनंतीवरून म. गांधींनीं सत्याग्रह आश्रम स्थापन करण्याकरिता विनोबाना वर्ध्याला पाठविलें. जमनालाल बजाज वरचेवर साबरमती आश्रमात जात असत. म. गांधींनीं वर्ध्याला आश्रम स्थापन करावा अशी त्यांची फार इच्छा. गांधी वर्ध्याला गेले नाहींत पण विनोबा लाभल्यामुळें त्याना धन्य वाटलें. विनोबांनीं तेथें आश्रम स्थापन केला. वर्ध्याला जें काहीं रचनात्मक कार्य सुरू झालें त्याचें विनोबा हे केंद्र बनले. साबरमती आश्रमात ते एक मूक साधक होते. वर्ध्याला ते आश्रमाचे चालक बनले. अहिंसेचें व्रत घेणारे, जीवन अर्पण करणारे देशसेवक निर्माण करणे हा आश्रमाचा उद्देश होता. आणि त्या दृष्टीनें आश्रमवासीयाचा शारीरिक, मानसिक आणि आत्मिक विकास होईल असें शिक्षण देणें जरूर होतें. आश्रमात गांधीजींचीं अकरा व्रतें आचरण्यात येत असत. त्यांनीं तीं दोन श्लोकात श्लोकबद्ध केलीं आहेत. आश्रमाच्या सकाळच्या व सध्याकाळच्या प्रार्थनेंत तीं म्हटलीं जाऊ लागलीं आणि

त्यांना अनुसरून आश्रमीय जीवन सजविण्याचा प्रयत्न केला जाऊं लागला. तीं एकादश व्रतें अशीं —

अहिंसा सत्य अस्तेय ब्रह्मचर्य असंग्रह
शरीर-श्रम अस्वाद सर्वत्र भय वर्जन
सर्व धर्मी समानत्व स्वदेशी स्पर्श भावना
ही एकादश सेवावीं नम्रत्वें व्रत निश्चयें

वर्ध्यामध्यें जमनालालजी आणि त्यांच्या कुटुंबातील मंडळी यांची विनोबांवर अत्यंत गाढ भक्ति बसली आणि त्यांचा विनोबांशीं फार घनिष्ठ संबंध आला. जमनालालजी विनोबांना आपले आध्यात्मिक गुरु मानूं लागले. विनोबांच्या आध्यात्मिक आणि नैतिक प्रभावामुळें जमनालालजींचें जीवन उत्तरोत्तर त्यागमय होत गेलें. त्यांचा मुलगा कमलनयन आणि मुलगी मदालसा यांचें शिक्षण व जीवनाची घडण करण्याचें काम विनोबांजींच्या च हातांत जमनालालजींनीं सुपूर्त केलें. या वेळची एक घटना विनोबांच्या जीवनातल्या अगदीं अंतस्थ भागावर प्रकाश पाडणारी आहे. विनोबा आपलीं पत्रें एकदा वाचून फाईलांत ठेवीत. वरीं च साधारणीं म्हणजे सगळ्याचीं उत्तरें पाठवीत आणि मग फाडून टाकीत. एके दिवशीं आलेलें एक पत्र मात्र त्यांनीं वाचतां च फाडून टाकलें. कमलनयनला याचें आश्चर्य वाटलें. त्यांनीं त्या फाडलेल्या पत्राचे तुकडे गोळा करून जोडून पाहिले. तें म. गांधींचें पत्र होतें. त्यांत लिहिलें होतें : "तुझ्यापेक्षा अधिक उच्च आत्मा माझ्या आढळांत नाहीं." महात्माजींच्याकडून एवढें प्रशस्तिपत्र मिळालें त्याची ही अवस्था ! कमलनयन यांनीं आश्चर्यानें विनोबांना विचारलें, "हें पत्र तुम्हीं फाडून का टाकलें ?" विनोबांनीं पुन्हा उत्तर दिलें, "हें माझ्या उपयोगाचें नाहीं म्हणून फाडून टाकलें." कमलनयन म्हणाले, ही तर सांभाळून ठेवण्यासारखी वस्तु आहे. विनोबांनीं उत्तर दिलं, "तें पुढें मागें केव्हां तरी उपयोगी पडेल म्हणून का राखून ठेवायच ? गांधींना असें वाटलें हा त्यांचा मोठेपणा. त्यांनीं माझे दोष कुठें पाहिले आहेत ?" असें म्हणून विनोबा हसूं लागले. विनोबा किती अंतर्मुख आहेत आणि त्यांचें अंतःकरण किती गंभीर आध्यात्मिक भावनेनें समृद्ध आहे याचें हें उदाहरण

आलें, पुत्रानें पित्याला मार्ग सारलें. ते आनदानें उद्गारले, "हा म्हणजे भीम आहे." वर्ष पुरें झालें. बरोबर त्या च दिवशीं ते आश्रमात दाखल झाले आणि चूपचाप तेथल्या कामात मग्न झाले. सत्यावर आणि नियम पाळण्यावर अशी त्याची कठोर निष्ठा होती. नतर काहीं दिवसानीं आश्रमात पायखानासफाईचें काम सुरु झालें. विनोबा त्यात हि सर्वांच्या पुढें होते. अतिशय निष्ठापूर्वक आणि तन्मयतेनें त्यानीं तीन महिने तें काम केलें. पुढें काहीं दिवस गुजराथ विद्यापीटात शिकविण्याचें आणि आश्रमाच्या व्यवस्थापकाचें हि काम त्यानीं केलें.

१९१८ सालीं इतर ठिकाणाप्रमाणें बडोद्याला हि इन्फ्लुएन्झानें कहर केला. त्या व्याधीनें विनोबाची आई आजारी पडली. ही बातमी कळल्यावर गाधीजींनीं विनोबाना आईच्या शुश्रूषेकरिता घरीं जाण्याच आज्ञा केली. मृत्युशय्येवर पडलेली आणि आपला प्रिय पुत्र फार दिवसानीं भेटला तरी हि आई त्याना म्हणाली, "आपलें हातातलें काम सोडून इथ कशाला आलास?" धन्य ती माता! आईला मृत्यूनें ओढून नेलें. विनोबाना ब्राह्मणाकडून मत्राग्नि देण्याची चाल पसत नव्हती. ते स्मशानात गेले नाहींत. ते आईच्या अथरुणाजवळ गीता आणि उपनिषद् याचा पाठ करीत बसले.

१९२१ सालीं शेठ जमनालाल बजाज याच्या विनतीवरुन म. गाधींनीं सत्याग्रह आश्रम स्थापन करण्याकरिता विनोबाना वर्ध्याला पाठविलें. जमनालाल बजाज वरचेवर साबरमती आश्रमात जात असत. म. गाधींनीं वर्ध्याला आश्रम स्थापन करावा अशी त्यांची फार इच्छा. गाधी वर्ध्याला गेले नाहींत पण विनोबा लाभल्यामुळें त्याना धन्य वाटलें. विनोबांनीं तेथें आश्रम स्थापन केला वर्ध्याला जें काहीं रचनात्मक कार्य सुरु झालें त्याचें विनोबा हे केंद्र बनले. साबरमती आश्रमात ते एक मूक साधक होते. वर्ध्याला ते आश्रमाचे चालक बनले अहिंसेचें व्रत घेणारे, जीवन अर्पण करणारे देशसेवक निर्माण करणे हा आश्रमाचा उद्देश होता. आणि त्या दृष्टीनें आश्रमवासीयाचा शारीरिक, मानसिक आणि आत्मिक विकास होईल असें शिक्षण देणें जरुर होतें. आश्रमात गाधीजींचीं अकरा व्रतें आचरण्यात येत असत. त्यानीं तीं दोन श्लोकात श्लोकबद्ध केलीं आहेत. आश्रमाच्या सकाळच्या व सध्याकाळच्या प्रार्थनेंत तीं म्हटलीं जाऊ लागलीं आणि

त्याना अनुसरून आश्रमीय जीवन सघटित करण्याचा प्रयत्न केला जाऊ लागला. तीं एकादश व्रतें अशीं:—

अहिंसा सत्य अस्तेय ब्रह्मचर्य असग्रह
शरीर-श्रम अस्वाद सर्वत्र भय-वर्जन
सर्व धर्मीं समानत्व स्वदेशी स्पर्श-भावना
हीं एकादश सेवावीं नम्रत्वें व्रत निश्चयें

वर्ध्यामध्यें जमनालालजी आणि त्याच्या कुटुबातील मडळी याची विनोबावर अत्यत गाढ भक्ति बसली आणि त्याचा विनोबाशीं फार घनिष्ठ सबध आला. जमनालालजी विनोबाना आपले आध्यात्मिक गुरु मानू लागले. विनोबाच्या आध्यात्मिक आणि नैतिक प्रभावामुळें जमनालालजींचें जीवन उत्तरोत्तर त्यागमय होत गेलें. त्याचा मुलगा कमलनयन आणि मुलगी मदालसा याचें शिक्षण व जीवनाची घडण करण्याचें काम विनोबाजींच्या च हातात जमनालालजींनीं सुपूर्त केलें. या वेळची एक घटना विनोबाच्या जीवनातल्या अगदीं अत:स्थ भागावर प्रकाश पाडणारी आहे. विनोबा आपलीं पत्रें एकदा वाचून फाईलात ठेवीत. वरीं च साचलीं म्हणजे सगळ्याचीं उत्तरें पाठवीत आणि मग फाडून टाकीत. एके दिवशीं आलेलें एक पत्र मात्र त्यानीं वाचता च फाडून टाकलें. कमलनयनला याचें आश्चर्य वाटलें. त्यानीं त्या फाडलेल्या पत्राचे तुकडे गोळा करून जोडून पाहिले. तें म. गाधींचें पत्र होतें. त्यात लिहिलें होतें : "तुझ्यापेक्षा अधिक उच्च आत्मा माझ्या आढळात नाहीं." महात्माजींच्याकडून एवढें प्रशस्तिपत्र मिळालें त्याची ही अवस्था! कमलनयन यानीं आश्चर्यानें विनोबाना विचारलें, "हें पत्र तुम्हीं फाडून का टाकलें?" विनोबानीं पुन्हा उत्तर दिलें, "हें माझ्या उपयोगाचें नाहीं म्हणून फाडून टाकलें." कमलनयन म्हणाले, ही तर साभाळून ठेवण्यासारखी वस्तु आहे. विनोबानीं उत्तर दिलें, "तें पुढें मागें केव्हा तरी उपयोगी पडेल म्हणून का राखून ठेवायचें? गाधींना असें वाटलें हा त्याचा मोठेपणा. त्यानीं माझे दोष कुठें पाहिले आहेत?" असें म्हणून विनोबा हसू लागले. विनोबा किती अतर्मुख आहेत आणि त्याचें अत:करण किती गभीर आध्यात्मिक भावनेनें समृद्ध आहे याचें हें उदाहरण

आहे. विनोबा किती उच्च प्रकारचे अपरिग्रही आहेत याचा एका उदाहरणाचा या वेळा उल्लेख करणें अप्रासंगिक होणार नाही. पूर्वी नवीन पुस्तक घेतले कीं त्यावर ते आपलें नाव लिहीत. "पुस्तकावर आपलें नाव काय म्हणून लिहावें? पुस्तक ही हि एक संपत्ति आहे. पुस्तक वाचून झाल्यावर ते सांभाळून आपल्याजवळ ठेवणें हा हि परिग्रह च आहे. आपलें पुस्तक वाचून झाल्यावर तें दुसऱ्या कोणीं मागितलें तर त्यानें आपला बोजा दूर केला म्हणून त्याचे उपकार च मानले पाहिजेत." असें हें मनात येतां च पुस्तकावर आपलें नाव लिहायचें त्यांनी सोडून दिलें. १९१८ सालीं आपलें सामान डोक्यावर घेऊन ते एका गावाहून दुसऱ्या गावाला जात. वाटेंत केव्हा नवीन पुस्तक घेणें आवश्यक वाटलें तर आपल्याजवळच्या पुस्तकांतलें जुनें पुस्तक दुसऱ्याला देऊन टाकून आपला बोजा हलका करीत.

१९२३ सालीं विनोबांनी नागपूरच्या झेंडा सत्याग्रहात भाग घेतला तेव्हा त्यांना कांही महिन्यांची तुरुंगवासाची शिक्षा झाली. जेलमधून बाहेर आल्यावर १९२४ सालच्या प्रारंभीं गांधीजींच्या आदेशावरून त्यांनी केरळमधल्या 'वायकोम' येथील सत्याग्रहाचा पुढाकार घेतला. तेथले सनातनी ब्राह्मण देवळाच्या भोंवतीच्या रस्त्यावरून हरिजनांना जाऊं देत नसत. कांहीं दिवस सत्याग्रह झाल्यानंतर सरकार आणि सनातनी हिंदू नमले आणि हरिजनांना त्या रस्त्यावरून जाण्याची मुभा मिळाली. विनोबा आश्रमात परत आले आणि त्यांचा नेहमीचा कार्यक्रम सुरू झाला. १९३० सालीं मिठाचा सत्याग्रह झाला तव्हा वर्ध्याकडे जंगलसत्याग्रह सुरू झाला. त्यात विनोबांनीं शेंदीचीं झाडें कापलीं. १९३२ सालच्या चळवळींत त्यांनी धुळें वगैरे ठिकाणीं भाषणें केलीं तेव्हा त्यांना पकडून तुरुंगात टाकण्यात आलें. त्या वेळीं धुळ्याच्या तुरुंगात जमनालालजी बजाज, प्यारेलाल वगैरे लोक त्यांच्याबरोबर तुरुंगात होते. ते सर्व सामुदायिकरीत्या सूत कातीत, मिळून एकत्र दळण दळीत, एकत्र बसून अनेक विषयांवर चर्चा करीत. तुरुंगाचें जणूं आश्रमात च परिवर्तन झालें. धुळ्याच्या तुरुंगात विनोबांनी गीतेवर प्रवचनें दिलीं. हें त्यांचें काम अत्यंत मौल्यवान् आहे. दर रविवारीं एक याप्रमाणें अठरा रविवारीं गीतेच्या अठरा अध्यायांचे

त्यांनीं अतिशय सुंदर रीतीनें गीतेचें मर्म विशद करून सांगितलें. हीं च व्याख्यानें पुढें पुस्तकरूपानें 'गीता प्रवचनें' या नावानें सर्व हिंदुस्थानात प्रसिद्ध आहेत. या वेळीं विनोबांचें वय अवघें सदतीस वर्षांचें होतें. या वयात हि त्यांची आध्यात्मिक साधना किती उच्च पातळीवर चढली होती हें गीता-प्रवचनें वाचल्यावर समजून येईल. मूळ मराठीवरून माय. सर्व भारतीय भाषामध्ये त्याचा अनुवाद झाला आहे आणि त्याच्या लक्षावधि प्रति विकल्या गेल्या आहेत. गीता-प्रवचनें हा एक अपूर्व ग्रंथ आहे. त्या ग्रंथात गीतेच्या आधारें एक पूर्ण जीवन दर्शन लोकांपुढें मांडलें आहे. जो कोणी श्रद्धेनें या पुस्तकाचा अभ्यास करील त्याचें जीवन सेवा, त्याग आणि परमेश्वर यांच्याकडे वळल्याशिवाय राहणार नाहीं. भूदान यज्ञ आरंभ होण्यापूर्वीं वीस वर्षें हीं प्रवचनें दिलीं आहेत. तरी हि तीं वाचून भूदान-यज्ञामागील भूमिका सहज पटते आणि त्यात भाग घेण्याची प्रेरणा स्फोटरूपानं मिळते.

गागोदें येथें असताना त्यांच्या आईला गीता समजावून घेण्याची फार इच्छा होती. तोंपर्यंत प्रसिद्ध झालेले गद्य वा पद्य अनुवाद विनोबांनीं तिला आणून दिले होते. पण तिला ते समजले नाहींत आणि तिचें समाधान झालें नाहीं. तेव्हा तिनें सहजपणें च "मला समजेल असें सोपें भाषान्तर तू च करून दे ना" असें विनोबांना सांगितलें. आईचा विनोबांच्या कर्तृत्वा-वर केवढा विश्वास होता ! या आईच्या विश्वासाचा विनोबांच्या जीवना वर फार मोठा प्रभाव पडला आहे. परंतु आई जिवंत असताना आईची इच्छा विनोबा पूर्ण करू शकले नाहींत. ती इच्छा त्यांनीं १९३० सालीं गीतेचें समश्लोकी रूपान्तर करून पुरी केली. हें भाषान्तर 'गीताई' या नावानें प्रसिद्ध आहे विनोबांच्या जीवनाची गीता ही एकमेव मार्गदर्शक आहे. गीतेच्या शिकवणीप्रमाणे त्यांनीं आपलें जीवन घालविलें आहे. त्यांना गीता आपल्या आईचे ठिकाणीं वाटते. विचारपोथी या पुस्तकात त्यांनीं लिहिलें आहे,

"गीतेचा अर्थ समजू लागल्यावर थोडया च दिवसात माझी आई वारली. तेव्हा गीतामातेच्या मांडीवर मला देऊन ती गेली असें मला वाटलें. हे गीतामाई, मी आज तुझ्या दुधावर च वाढत आहें आणि पुढें हि तुझा च

आधार मला राहणार आहे." गीताई महाराष्ट्रात अतिशय लोकप्रिय झाली आहे. तिच्या लक्षावधि प्रति खपल्या आहेत.

धुळ्याच्या तुरुगात असताना विनोबानी ग्रामसघटना करण्याच्या कामाचा सकल्प केला. तुरुगातून बाहेर येता च खेड्यात भिन्न खेड्यातल्या लोकाना सूत काढणें, सफाई वगैरे काम ते शिकवू लागले. सत्याग्रहाश्रम स्थापन झाला तो प्रथम वर्धा येथील भगनवाडीमध्यें. नतर बजाजवाडीतल्या जमनालालजींचा 'घासाचा बगला' या नावाचा बगला आहे त्यामध्यें हालविला. तेथे हि आश्रमाला योग्य अशी व्यवस्था होण्याचा सभव दिसेना तेव्हा १९३३ साली वर्ध्यापासून दोन मैलावर नालवाडी नावाचें गाव होतें त्या ठिकाणीं आश्रम नेला आणि तेथें ग्रामसेवामडळ स्थापन केलें आणि त्याच्या वतीनें ग्रामसेवेचें काम व्यवस्थितपणें सुरु केलें. वर्धा जिल्ह्यातला दोन लक्ष वस्तीचा भाग या कामाकरिता त्यानीं निवडला. त्याचे सहा भाग करून प्रत्येक भागाची जबाबदारी आश्रमाच्या एक एक कार्यकर्त्यावर सोंपविली. कार्यकर्ते दोन आठवडे खेडोपाडीं फिरत, नतर केंद्राला परत येत, तेथें आपआपल्या कामासबधीं परस्परामध्ये विचारविनिमय करीत आणि पुन्हा आपआपल्या कामावर निघून जात. सूत कातण्याचें कामात विनोबानीं पुष्कळ च सशोधन चालविलें होतें. कातण्याच्या कामात ते प्रवीण आहेत. तकलीवर सूत कातण्याची त्यानीं नवीन पद्धति बसविली, आणि तिचा प्रयोग सर्व हिंदुस्थानात होऊ लागला. ते आपण च सरकी काढून आपण च पिजत हि असत. सूत कातून कापड विणण्यापर्यंत सर्व क्रिया ते स्वत करीत. या कामाकरिता ते रोज आठ आठ तास वेळ देत असत. कताईचें आर्थिक मूल्य ठरविण्याकरिता त्यानीं सहा महिने आठ आठ तास सूत कातून त्यातून मिळणाऱ्या मजुरींतून उपजीविका करिता येईल कीं नाहीं याचे प्रयोग केले. या सर्व कामात त्यानीं इतकें पूर्ण प्रावीण्य प्राप्त करून घेतलें आहे कीं त्याच्या तोडीचा दुसरा माणूस हिंदुस्थानात नाहीं. 'मूलोद्योग – कातणें' या नावाचें एक मौलिक पुस्तक त्यानीं लिहिलें आहे.

पुढील काळीं जे सर्वोदयाचे द्रष्टे होणार होते त्याचा पिंड कशा प्रकारें घडला होता ही गोष्ट त्याच्या तरुणपणातल्या घटनेवरून समजून येणार आहे. १९२८ सालची गोष्ट आहे. ते या वेळीं वर्धा आश्रमात होते. आश्रमाचा

मोसम होता. एके दिवशीं ते बाजारात गेले ते सहा आण्याला एक पाटीभर आंबे खरेदी करून आले. दोन दिवसानीं ते पुन्हा जेव्हा बाजारात गेले त्या दिवशीं पूर्वी ज्या बाईपासून त्यानीं आंबे विकत घेतले होते ती बाई त्या दिवशीं हि आंबे विकत असलेली दिसली. त्या दिवशीं ती बाई पावाइतके आंबे दोन आण्याला द्यायला तयार झाली इतके स्वस्त आंबे कसे देतेस ? म्हणून त्यानीं तिला विचारलें. बाईनें उत्तर दिले, परवा वादळाचे वारे सुटले होते. त्यामुळें आंबे पुष्कळ पडले आणि बाजारात खूप आंबे आले आणि विकत घेणारे विशेष नाहींत त्यामुळे किंमत कमी आहे. विनोबानीं तिला विचारलें, परवा आंबे जमा करायला तुला जितकी मेहनत पडली तितकी न आज हि पडली आहे ना ? बाईनें उत्तर दिले, हो. तेव्हा विनोबा म्हणाले, मग कमी किंमत कां घेतेस ? असें म्हणून त्यानीं त्या बाईला पाटीभर आंब्याचे सहा आणे देऊन टाकले.

१९३६ सालीं म. गांधी वर्ध्याजवळ सेवाग्रामला रहायला आले. त्या वेळीं ग्रामोद्योग संघाची स्थापना झाली, आणि खादीशिवाय इतर ग्रामोद्योग हिं त्या ठिकाणीं सुरू झाले तेव्हा विनोबानीं आपल्या नालवाडीच्या आश्रमात हि ग्रामोद्योगाना चालना दिली. साबरमती आश्रमातल्या स्त्रिया वर्ध्याला आल्यावर त्यांच्याकरिता वर्ध्याला एक महिलाश्रम स्थापन करण्यात आला. या आश्रमाचा भार महात्माजींनी विनोबाच्यावर सोंपविला. विनोबाच्या देखरेखीखालीं आश्रमाची खूप प्रगति झाली. १९३६ सालापासून १९४१ सालापर्यंत दरवर्षी वर्धा जिल्ह्यातल्या कार्यकर्त्यांचें संमेलन भरून विधायक कार्यासंबंधीं तेथें चर्चा होई. ती चर्चा मोठी उद्बोधक होत असे. विनोबानीं या संमेलनाला ' खादी यात्रा ' असें नाव दिलें होतें. इतर धर्मांबद्दल त्याना सारखा च आदर असे. त्याकरिता मूळ अरबींतून कुराणशरीफचा खोल अभ्यास करणेकरिता ते अरबी भाषा हि शिकले. कुराणाचें त्याचें ज्ञान फार खोल आहे. म. गांधींनीं सुरू केलेले मूलोद्योगी शिक्षण अथवा नई तालीम सुरू करण्याच्या कामात विनोबाचें त्याना फार साहाय्य झालें. महारोग्याची सेवा करण्याकडे हि त्याचें लक्ष होतें. आपल्या एका कार्यकर्त्याला या कामाकरिता देऊन त्यानीं महारोग्याच्या सेवेला हि चालना दिली.

नालवाडीच्या आश्रमात अतिश्रमामुळें विनोबाची प्रकृति बिघडली. कोठें तरी हवेच्या ठिकाणीं तब्येत सुधारण्याकरिता विनोबानीं जावें असें म. गांधींनीं सुचविलें. परंतु विनोबानीं तें मान्य केलें नाहीं. मात्र नालवाडीहून चार मैलावर पवनार येथें नदीतीरावर जमनालालजींचा एक बंगला होता, तिथें रहावयाला जाण्याचें कबूल केलें. त्या ठिकाणीं धाम आणि पवनार या नद्यांचा संगम आहे. बंगला धाम नदीच्या पलीकडे असल्यामुळें आपल्या आश्रमाला 'परधाम' असें त्यानीं नांव दिलें.

महायुद्धांत सरकारला पैशाची वा सैनिकांची लोकानीं मदत करूं नये याकरिता १९४० सालच्या अखेरीस म. गांधींजींनीं व्यक्तिगत सत्याग्रहाची चळवळ करण्याचें योजिलें. त्यातले पहिले सत्याग्रही म्हणून विनोबाना निवडलें. हें ऐकून सर्वांना फार आश्चर्य वाटलें. पण तेव्हांपासून विनोबाचें नांव सर्वत्र झालें. व्यक्तिगत सत्याग्रहाकरिता त्याना प्रथम तीन महिन्याची शिक्षा झाली. त्यातून सुटल्यावर त्यानीं पुन्हा सत्याग्रह केला तेव्हा पुन्हा शिक्षा झाली. अशा प्रकारें या चळवळीच्या दीड वर्षांत त्याना तीन वेळेला पकडून शिक्षा देण्यात आली.

१९४२ च्या 'भारत छोडो' या चळवळींत इतर पुढाऱ्यांबरोबर विनोबाना हि पकडण्यात आलें व अज्ञात स्थळीं स्थानबद्ध केलें. त्याचे आश्रम हि जप्त केले गेले. एक वर्ष मद्रासच्या वेलोर तुरुंगामध्यें त्याना ठेवण्यात आलें होतें. पुढें मध्यप्रदेशातल्या शिवणी जेलमधें हालविलें. वेलोर जेलमधें असताना ते तेलगु, कानडी, तामीळ, मल्याळम् वगैरे दक्षिणेकडच्या भाषा शिकले. वेगवेगळ्या भाषांचा तुलनात्मक अभ्यास करण्याचा त्याना लहानपणापासून च छंद होता, त्यामुळें कुठली हि भाषा ते सहजीं शिकू शकतात. भारतातल्या बहुतेक सर्व भाषा त्याना अवगत आहेत.

नौखालीमध्यें जे जातीय दंगे झाले, तेथल्या परिस्थितींत सुधारणा करण्याकरिता म. गांधींनीं जेव्हा तेथें पायीं यात्रा सुरु केली तेव्हा विनोबा आपल्या पवनार आश्रमात ग्रामसेवेच्या कामात मग्न होते. पुष्कळानीं विनोबाना नौखालींत जाण्याबद्दल आग्रह केला. परंतु गांधीजींच्या आदेशिवाय तिकडे जाण्याचें त्यानीं नाकारलें. आपल्या वागण्यात ते इतके काटेकोर आहेत

१९४८ सालच्या ३० जानेवारी या दिवशीं म. गांधींचें निर्याण झालें. त्यानंतर दीड महिन्यानें सेवाग्राम येथें साऱ्या भारतातल्या गांधीजींच्या अनुयायांचें आणि कार्यकर्त्यांचें एक संमेलन झालें. गांधीजींचें सर्वोदयाचें स्वप्न साकार करण्याकरिता ' सर्वोदयसमाज आणि सर्वसेवासंघ ' याची स्थापना झाली आणि गांधी करीत असलेल्या सर्व कामाचा भार विनोबाजींच्यावर पडला. अतिनम्रतापूर्वक तो त्यांनीं स्वीकारला आणि आश्रमातल्या एकान्त शान्त जीवनातून बाह्य जगतात पदार्पण केलें.

म. गांधी करीत असलेलें हिंदु मुसलमानात शान्ति स्थापन करण्याचें काम अजून पूर्ण झालें नव्हतें निर्वासिताचा प्रश्न हि अतिशय कठीण झाला होता. म्हणून निर्वासिताची सेवा करण्यासाटीं ते प्रथम दिल्लीला गेले. निर्वासिताच्याकरिता स्थापन केलेल्या शिबिरा शिबिरामध्यें निर्वासिताना आश्वासन देत आणि स्वावलंबन शिकवीत ते फिरू लागले. तेथें त्यांनीं चरखे सुरू केले. पिठाकरिता हातचक्क्या सुरू केल्या. मेओ लोकाचा प्रश्न फार च कठीण होता. हे लोक दिल्ली, अलवार वगैरे ठिकाणचे मुसलमान शेतकरी. पाकिस्तान होता च पहिल्या उत्साहाचे भरात ते पाकिस्तानात गेले, परतु तेथें त्याची कांहीं सोय न झाल्यामुळें त्याना परत फिरावें लागलें. या काळात त्याचीं घरें-दारें, जमीनजुमला पाकिस्तानातून आलेल्या हिंदु निर्वासितानीं ताब्यात घेऊन टाकला होता. त्यामुळें या ' मेओ ' लोकाची व्यवस्था करणें फार कठीण होऊन गेलें. विनोबानीं हें कठीण काम अतिशय परिश्रम करून तडीस नेलें. कित्येकाना त्याचीं घरें-दारें, जमीनजुमला परत मिळवून दिला. उरलेल्याना दुसऱ्या ठिकाणीं जमिनी मिळवून देऊन त्या ठिकाणीं त्याना स्थायिक केलें. हिंदु मुसलमानात सलोखा निर्माण व्हावा म्हणून त्यांनीं बिकानेर, अजमीर, हैदराबाद वगैरे ठिकाणास भेटी दिल्या आणि त्या त्या ठिकाणीं त्याच्या प्रभावानें शान्तीची हवा निर्माण झाली. एवढें झाल्यावर ते परत आपल्या परधाम आश्रमात आले आणि आपल्या मौन साधनेंत मग्न झाले. सर्वोदयस्थापनेचें शरीर-श्रम आणि स्वावलंबन हें मूळ आहे. स्वतःच्या व्यक्तिगत जीवनात हा आदर्श सिद्ध केल्याशिवाय सामान्य लोकामध्यें सर्वोदयाचा प्रसार करणें ही एक विडंबना च होईल असें वाटून विनोबा आणि आश्रमांतले त्याचे

सहकारी यानीं परधाम आश्रमांत कांचन मुक्तीचा प्रयोग करण्याचें ठरविलें. कांचन मुक्ति-योग ही काय चीज आहे ?

## ( ४ ) कांचन-मुक्ति-योग

पैसा आणि श्रम या दोन शक्तींचा जगावर परिणाम होत असतो. उत्पादक श्रम सोडून लोक अधिकाधिक पैशाचा च आधार घेऊं लागल्यामुळें जगांत आज अनर्थ माजला आहे. पूर्वकालीं सर्वजण कोणाचा द्वेष न करता स्वत. श्रम करून आपल्याला जरूर त्या वस्तू उत्पादन करून घेत असत आणि एकमेकाशीं प्रेमानें रहात, अशा एखाद्या समाजाची आपल्याला कल्पना करिता येईल. त्या वेळीं कोणी अत्यंत दरिद्री नाहीं आणि कोणी अत्यंत श्रीमंत नाहीं. सर्व जण अगदीं समान नसले तरी त्यांच्यामध्यें विशेष विषमता नव्हती. परंतु पुष्कळ लोकांनीं उत्पादक श्रम करायचें सोडल्यामुळें विषमता निर्माण होऊं लागली. एखाद्या मनुष्यावर संकट किंवा आपत्ति आली तर त्याला त्या संकटांत मदत करण्याऐवजीं या संधीचा फायदा घेऊन आपण करायचे श्रम त्याच्यावर टाकून आपण चैन करावी असा मोह लोकांना होऊं लागला. त्यामुळें अशा लोकांच्या हातांत जमीन व उत्पादनाचीं यंत्रादि दुसरीं साधनें केंद्रीभूत होऊं लागलीं. याप्रमाणें क्रमाक्रमानें विषमता वाढू लागली. ती आता सार्वत्रिक आणि गंभीर झाली आहे. पैशाच्या मदतीनें दुसऱ्याचे श्रम विकत घेऊन त्यांना पाहिजे त्या कामाला लावण्याची सोय झाली आहे. पैसे देऊन दुसऱ्याच्या श्रमानें उत्पन्न झालेल्या वस्तु खरेदी करिता येतात म्हणून पैसा हें विषमता उत्पन्न होण्याचें व वाढण्याचें मुख्य कारण आहे. म्हणून श्रमातून सुटका व्हावी म्हणून लोक पैसे मिळविण्याच्या कामांत आणि ते साठविण्यात व्यग्र असतात. थोड्या च अनुत्पादक वर्गाच्या हातीं जमीन आणि उत्पादनाचीं साधनें केंद्रीभूत होत आहेत त्याचें मूळ कारण पैसा आहे. म्हणून वर्तमान युगांत श्रमाची आणि श्रमिकाची म्हणजे मजुराची प्रतिष्ठा नाहींशी होऊन गेली आहे आणि पैशाला निष्कारण महत्त्व प्राप्त झालें आहे. उत्पादक श्रमाला त्याच्या मोठ्या सन्मानाच्या आसनावर पुन्हा स्थापित केल्याशिवाय श्रीमंत आणि गरीब यांच्यातली विषमता दूर करणें आणि सर्वांचें कल्याण

करणें शक्य नाहीं. विनोबा म्हणतात, " सध्याच्या विकारग्रस्त समाजव्यवस्थेमध्ये प्रत्येक वस्तूचें मूल्य पैशानें ठरत असतें. आणि त्यामुळें वस्तूची खरी किंमत नजरेस येत नाहीं " असें म्हटलें जातें कीं, या ठिकाणीं जमीन फार महाग आहे. वस्तुत तिची उत्पादनशक्ति त्यामुळें काहीं जास्ती झालेली असते असें नाहीं. परवाच्या बक्सार गॅझेटमध्यें वाचलें कीं, दीडशें वर्षांपूर्वी त्या ठिकाणीं एक शेर गहू एक पैशाला विकला जात होता. आज त्या ठिकाणीं एक शेर गव्हाला दहा आणे पडतात. परतु त्या वेळीं एक शेर गव्हानें जेवढें पोट भरे आणि त्यात जेवढी पौष्टिकता असे तेवढी च आज हि आहे. परतु पैशाच्या मायाजालात पडल्यामुळें उजाड माळाला सुदर सरोवर मानलें जात आहे. ते पुढे म्हणतात, " लोकांचें अत करण शुद्ध आहे. जर काहीं बिघडलें असेल तर ती समाजाची आर्थिक व्यवस्था. उत्पादनाशीं आणि शरीरपरिश्रमाशीं पैशाचा निश्चित सबध राहू शकत नाहीं. पैसा स्वत.च्या किंमतींत नेहमीं फेरफार करीत असतो. केव्हा तो शेराला एक रुपया म्हणतो, केव्हा दोन म्हणतो, तर केव्हा चार. पैसा बदमाश, लबाड आहे. अशाला आपण आपला कारभारी केलें आहे. अशा बदमाशाच्या हातात आमच्या तिजोरीची चावी आम्हीं दिली आहे." म्हणून विनोबांनीं काहीं दिवस उपवासात चिंतन करून सकल्प केला कीं, आता यापुढें आपण पैसा घेणार नाहीं. परधाम आश्रमात आपल्या स्वत.च्या श्रमानें च आपल्याला लागणाऱ्या वस्तु उत्पन्न करण्याचें विनोबांनीं आणि परधाम आश्रमातले सहकारी यांनीं ठरविलें. आता आश्रमाला मिळणारी पैशाची मदत त्यांनीं सोडून दिली. कोणी मदत देऊ इच्छीत असेल तर त्यानें आपल्या श्रमाची द्यावी, पैशाची नाहीं. सर्वोदयाचें ध्येय साध्य करायला या मार्गाचें अनुसरण करणें अत्यत आवश्यक होतें याला च त्यांनीं 'काचन मुक्ति योग' नाव दिलें. सर्वोदयाच्या स्थापनेला काचन मुक्तियोगाशिवाय गत्यतर नाहीं.

## (५) सर्वोदयदर्शन आणि सर्वोदयसमाजाची स्थापना

देश स्वतत्र करण्याची चळवळ अहिंसेच्या मार्गानें चालली होती. स्वातत्र्य प्राप्त झाल्यानवर शोषणमुक्त वर्गहीन अहिंसक समाज स्थापन

करण्याची कल्पना म. गांधींनीं त्या च वेळीं केली होती आणि ती कल्पना सिद्ध करण्याकरिता त्यांनीं अठरा कलमी विधायक कार्यांची योजना केली होती. स्यात यचळवळीबरोबर च त्याच्याशीं अविभाज्य आणि अभिन्नपणें हें विधायक कार्य करण्याची खटपट त्यांनीं देशातल्या अनेक ठिकाणीं कमीअधिक प्रमाणात चालविली होती. हीं विधायक कार्में पुढें दिल्या-प्रमाणें:—(१) हिंदु मुसल्मान ऐक्य किंवा जातीजातींमध्यें सलोखा. (२) अस्पृश्यतानिवारण. (३) दारूबंदी. (४) खादी. (५) दुसरे ग्रामो-द्योग. (६) खेड्यातील आरोग्य. (७) नई तालीम म्हणजे च मूलोद्योगी शिक्षण. (८) प्रौढ साक्षरता. (९) स्त्रियांची उन्नति. (१०) आरोग्यासंबंधीं शिक्षण. (११) राष्ट्रभाषाप्रचार. (१२) मातृभाषेचा विकास. (१३) आर्थिक साम्य स्थापना. (१४) कॉंग्रेससंघटन. (१५) शेतीविकास. (१६) मजूरसंघटना. (१७) विद्यार्थीसंघटना. (१८) कुष्ठरोग सेवा आणि कुष्ठरोगाचा प्रतिकार. परिस्थितीप्रमाणें आणि जरूरीप्रमाणें ह्या यादींत आणखी वाढ करता येण्यासारखी आहे.

रस्किनच्या ' Unto This Last ' या पुस्तकाचा म. गांधींनीं अनुवाद केला होता. त्याला 'सर्वोदय' असें नाव दिलें होतें. त्याच्या प्रस्तावनेंत ते लिहितात, " आधुनिक संस्कृति आणि तीवर आधारलेली समाजव्यवस्था याचा सिद्धान्त असा आहे कीं, लोकांना शक्य तेवढें अधिकात अधिक सुख मिळवून द्यायचें. ह्या मुख्य सिद्धान्तापासून सहज च असा उपसिद्धान्त निघतो कीं, अधिकात अधिक लोकांची अशी व्यवस्था करताना जे काहीं लोक राहतील त्यांना दुःख, कष्ट सोसावे लागले तर हरकत नाहीं. दहा जणातल्या नऊ जणांच्या सुखाची व्यवस्था केल्यानंतर उरलेल्या एका व्यक्तीची चिंता करणेंची जरूरी नाहीं. इतकें च नाहीं तर त्याचें काहीं अनिष्ट झालें व नाश झाला तरी करायला हरकत नाहीं. या सिद्धान्ताच्या पायावर स्थापन झालेल्या समाजव्यवस्थेमध्यें विरोध, झगडे आणि शेवटीं नाश हा अपरिहार्य आहे. यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीं नाहीं. कारण समाजात जो कोणी बलिष्ठ असेल त्याला वाटेल कीं दुर्बळाचा नाश झाला तरी हरकत नाही, आणि तो तसा नाश करायला प्रवृत्त हि होईल. परंतु दुर्बळाला असें वाटत नाहीं. बलिष्ठाच्या स्वार्थाकरिता आपला नाश व्हावा हें त्याला

रुचणार नाहीं. दुर्बळ असलों म्हणून काय झालें? आपण मेलों तरी हरकत नाहीं असें मानणारे या जगात कोणी हि असत नाहीं. प्रत्येकाला वाटतें कीं, आपण जगलें पाहिजे. कारण आपण असणें म्हणजे आपल्या अस्तित्वामध्यें मनुष्याला एक प्रकारचा आनंद व सुख अनुभवाला येतें. म्हणून सर्वांचें हित सर्वनाश याचा प्रतिकार करून समाजात सर्वांना शांति आणि संतोष लाभावा अशा समाजाची रचना करावयाची असेल तर हें स्पष्ट च आहे. 'शक्य तोंवर अधिकात अधिक लोकांचें अधिकात अधिक सुख' या नीतीऐवजीं 'सगळ्यांचें सर्व प्रकारें कल्याण साधणें' या सिद्धान्ताच्या आधारावर समाजजीवन असणें आवश्यक आहे. 'सगळ्याचें हित साधणें' हें जीवनाचें तत्त्वज्ञान असलें पाहिजे." हें तत्त्वज्ञान अहिंसक समाजरचनेचें मूळ आहे म्हणून म. गांधींनीं कल्पिलेल्या अहिंसक समाजव्यवस्थेचें नाव 'सर्वोदय' हें ठेविलें आहे. भारतातले प्राचीन मुनि, ऋषि समाजव्यवस्थेच्या या च आदर्शाचे पुरस्कर्ते होते. आणि तें त्यानीं एका च वाक्यात सांगून ठेवलें आहे– 'सर्वे सुखिनः सन्तु' (सगळेजण सुखी असावेत).

रस्किनच्या वर सांगितलेल्या Unto This Last या पुस्तकाला बायबलात वर्णन केलेल्या एका गोष्टीचा आधार आहे (St. Mathews ch 20). त्यामध्यें एक नीतिपर गोष्ट आहे. ती अशी : एका मनुष्यानें आपल्या द्राक्षाच्या बागेंत काम करण्याकरिता प्रत्येकीं एक पेनी देण्याच्या करारावर काहीं मजूर कामाला लावले. त्या काळीं मजुराची रोजची मजुरी एक पेनी होती. तो माणूस दुपारीं मजुराच्या अड्ड्यावर गेला. त्याला तेथें काहीं लोक बेकार आढळले. त्यानें त्याना आपल्या बागेंत कामाला पाठविलें आणि पूर्ण मजुरी देण्याचें आश्वासन दिलें. तिसरे प्रहरीं तो तेथें गेला तेव्हा हि काहीं बेकार मजूर त्याला तेथें आढळले. त्याना हि त्यानें आपल्या शेतात कामाला पाठविलें. संध्याकाळीं पुन्हा तो तेथें गेला तेव्हा आणखी काहीं बेकार लोक त्याला दिसले. त्यानें त्याना विचारलें, 'तुम्ही असे बेकार का बसला आहात?' मजुरानीं उत्तर दिलें, 'आम्हाला काहीं काम मिळालें नाहीं म्हणून!' तेव्हा तो माणूस म्हणाला, 'तुम्ही हि माझ्या द्राक्षाच्या मळ्यात काम करायला चला, तुम्हाला पुरी मजुरी मिळेल.' रात्र झाली तेव्हा

शेताच्या मालकाने आपल्या दिवाणजीला सांगितलें, ' साऱ्या मजुरांना बोलावून त्यांना पुरी मजुरी देऊन टाक. सर्वांत शेवटीं जे आलेले आहेत त्यांच्यापासून सुरवात कर.' सगळ्यांत जे शेवटीं आले होते त्यांना जेव्हा एक पेनी मजुरी मिळाली तेव्हा सुरवातीपासून जे कामावर होते त्यांना वाटलें कीं त्यांच्यापेक्षा कांहीं अधिक मजुरी मिळेल. परंतु त्यांना हि जेव्हा एक एक पेनी च दिली गेली तेव्हा त्यांनीं तक्रार करण्यास सुरवात केली. ते मालकाला म्हणाले, " हे शेवटीं आले. त्यांनीं फक्त एक तास काम केलें आहे आणि आम्हीं सर्व दिवस उन्हांत रापून काम केलें आहे. तरी आम्हाला हि त्यांच्यांतर्फे च मजुरी दिली हें बरोबर आहे का ? "

शेताचा मालक म्हणाला, " मीं तुमच्यावर कोणत्या हि तऱ्हेनें अन्याय केलेला नाहीं. तुम्हाला एक पेनी देण्याचा आपला करार होता त्या करारप्रमाणें मीं तुम्हाला एक पेनी दिली आहे. तेव्हा तुम्हीं घरीं जावें. *तुम्हाला जितकें दिलें तितकें च जे मागून आले त्यांना हि मी देणार आहें.* " (Friend, I do thee no wrong Didst not thou agree with me for a penny ? Take that thine is And go thy way I will give unto this last even as unto thee ) ' प्रत्येकाकडून त्याच्या सामर्थ्याप्रमाणें घ्यायचें आणि प्रत्येकाला त्याच्या आवश्यकतेनुरूप द्यायचें ' (*From each according to his capacity and to* each according to his need ) हा सिद्धान्त वरील गोष्टीच्या मुळाशीं आहे. हा आर्थिक आणि सामाजिक समतेचा, साम्याचा सिद्धान्त आहे. या नीतीच्या पायावर च रस्किनने लिहिलेला Unto This Last हा अमूल्य ग्रंथ वाचून म गांधींच्या अंत करणात सर्वोदयाची प्रथम प्रेरणा उत्पन्न झाली आणि त्यामुळें त्यांच्यांत क्रांतिकारक परिवर्तन झालें.

म. गांधींच्या प्रयाणानंतर १९४८ सालच्या मार्च महिन्यात साऱ्या भारतातून विधायक कार्यकर्ते सेवाग्राममध्यें जमले आणि सर्वोदयाचें कार्य सफलतेनें पुढें जावें याकरिता विनोबांच्या प्रेरणेनें सर्वोदय समाजाची स्थापना त्यांनीं केली. दरवर्षी वेगवेगळ्या प्रांतात सर्वोदय समाजाचें वार्षिक संमेलन होत असतें. १९५१ सालीं एप्रिल महिन्यामध्ये हैदराबादजवळील शिवरामपल्ली या गांवीं सर्वोदय संमेलनाचें तिसरें वार्षिक संमेलन भरलें होतें.

## (६) तेलंगणांतील परिस्थिति आणि विनोबांची तेलंगण यात्रा

ह्या वेळीं हैदराबादमधल्या तेलंगण भागात जमिनीच्या प्रश्नानें उग्र रूप धारण केलें होतें. कम्युनिस्टांकडून बरेच जमीन मालक मारले गेले होते. त्यांच्याकडील जमीन काढून घेऊन शेती करणाऱ्यांना वाटून देण्यात आली होती. दुसऱ्या पक्षीं त्यांच्यावर अधिक जुल्म करून यांच्याकडून जमीन परत हिरावून घेतली जात होती.

सरकार सशस्त्र उपायानें हे दंगेधोपे थांबविण्याचे प्रयत्न करीत होतें. दोन्ही पक्षाकडून एकमेकांची मारामारी कापाकापी चालली होती. त्यामुळें तेथले लोक भयग्रस्त होते. केव्हा कोण मारलें जाईल, केव्हा आग लागेल, याचा नेम नाहीं. दोघांच्या हि चरकख्यासालीं सामान्य जनता पिसून निघत होती. दिवसा सशस्त्र पोलिसांचा जुल्म—ते कम्युनिस्ट किंवा कम्युनिस्टांना मदत करणारे या संशयानें पोलिस त्यांना छळीत—रात्रीं जमीनदारांचें समर्थन करणारे आणि पोलिसांना साहाय्य करणारे ते आहेत अशा संशयानें कम्युनिस्ट त्यांच्यावर अत्याचार करीत. या दोन्ही अत्याचारामुळें लोक वेडे होऊन गेले होते.

विनोबांची तब्येत बरी नव्हती म्हणून शिवरामपल्ली सर्वोदय संमेलनाला जाण्याचा त्यांचा बेत नव्हता. गेल्या वर्षी अनगुळ येथें सर्वोदय संमेलन भरलें होतें त्याला ते गेले नव्हते. श्री. शंकरराव देव त्यांना म्हणाले, " आपण संमेलनाला येणार नसाल तर बाकीच्यांनीं तेथें जाऊन आपला वेळ घाल-विण्यांत काहीं अर्थ नाहीं." तब्येत बरी नव्हती तरी विनोबांनीं शिवराम-पल्लीला जाण्याचें कबूल केलें आणि पायीं च जाण्याचें ठरविलें. ८ मार्चला रवाना होऊन ३०० मैल अंतर तोडून ते शिवरामपल्लीस पोहोंचले. शिवरामपल्ली सर्वोदय संमेलनांत जमलेल्या सर्वोदयाच्या ध्येयावर विश्वास असणाऱ्या कार्यकर्त्यांच्या मनांत तेलंगणांतील घटनांनीं फार चिंता उत्पन्न केली होती. अहिंसेवर विश्वास असणाऱ्या लोकांना तेलंगणातली परिस्थिति एक आव्हान च होतें. शांतीच्या आणि प्रेमाच्या मार्गानें देशातला जमिनीचा प्रश्न आणि सामाजिक समस्या जर सोडविता आल्या नाहींत तर अहिंसेच्या गप्पा मारणें व्यर्थ आहे.

म. गांधी गेल्यानंतर आर्थिक आणि सामाजिक प्रश्न अहिंसेनें कसे सुटतील याच संशोधन विनोबा करीत होते. एक शांतिसैनिक या नात्यानें तेलंगणात प्रवास करण्याचें त्यांनीं ठरविलें. ते म्हणाले, "मी सर्वोदय समाजाचा सेवक आहे. सर्वोदयाचें नाव मला परमेश्वराचे ठिकाणीं आहे. सर्वोदयात सर्व च लोक आहेत म्हणून कम्युनिस्ट लोक हि आमच्याहून वेगळ नाहीत." म्हणून हैदराबादच्या तुरुंगात त्यांनीं कम्युनिस्ट कैद्याची भेट घेतली आणि त्यांच्याबरोबर दोन तीन तास चर्चा करून कम्युनिस्टाचें काय म्हणणें आहे हें समजून घेतलें. नंतर १६ एप्रिल रोजीं तेलंगणात फिरण्याकरिता थोडे लोक बरोबर घेऊन ते परत पायीं रवाना झाले. तेलंगण यात्रेचा संकल्प केल्यानंतर तेथें पायीं प्रवास करण्यात त्यांच्या मनात कोणता विचार होता यासंबंधीं १९५१ सालच्या २५ मे च्या 'वारंगळ' या नावाच्या गावीं त्यांनीं प्रवचनात सांगितलें, "गांधीजी गेल्यानंतर माझ्या मनात विचार चालला होता कीं आता आमचें कोणचें कर्तव्य आहे. प्रथम निर्वासिताच्या सेवेला गेलों परंतु तेलंगणातल्या परिस्थितीची हि मला चिंता वाटत होती. तेथें होत असलेल्या खून वगैरे घटना माझ्या कानीं येत होत्या. तरी देखील माझ्या मनात तेथें निरुत्साह वाटला नाहीं. ज्या ज्या वेळीं मानवजीवनाला नवीन संस्कृति लाभते त्या त्या वेळीं कांहीं तरी संघर्ष झाल्याशिवाय राहत नाहीं. रक्तपात हि घडून येतो. म्हणून निरुत्साही न होता शांतपणे विचार करून हे प्रश्न शांतीच्या मार्गानें च कसे सोडवायचे याचा शोध केला पाहिजे.

"त्या ठिकाणीं शांति स्थापन करण्याकरिता सरकारनें पोलीस पाठविले होते. पोलीस हे विचारक नाहींत. पोलिसाच्या हातात शस्त्र असतें आणि तेवढा च त्यांना उपाय ठाऊक असतो. म्हणून जंगलातल्या वाघाचा उपद्रव नाहींसा करण्याकरिता पोलिसांना पाठवणं योग्य आहे. पोलीस-वाघाची शिकार करून वाघापासून आपलें रक्षण करू शकतात. परंतु कम्युनिस्टाचा उपद्रव म्हणजे वाघाचा उपद्रव नव्हता, *माणसाचा* होता. त्याचा मार्ग कितीं हि चुकीचा असो, कितीं हि भ्रांत असो, त्यांच्या डोक्यांत कांहीं ना कांहीं विचारधारा असणार च. अशा ठिकाणीं केवळ पोलीस पाठवून त्याचा प्रतिकार होण्याचा संभव नाहीं. ही गोष्ट सरकारच्या

लक्षात आली नाहीं तरी हि आपलें कर्तव्य म्हणून सरकारनें पोलिस पाठविले त्याबद्दल मी सरकारला दोष देत नाहीं

"या प्रश्नाबद्दल अशा तऱ्हेचा विचार माझ्या मनात चालू होता. त्यामुळें आपण च त्या भागात फिरावें असें मला वाटलें. परंतु फिरायचं म्हटलें तरी कसें फिरावें? मोटार वगैरेसारखीं वाहनें विचार शोधक नाहींत. तीं समय-साधक आहेत. लवकर जायला तीं उपयोगी आहेत. अंतर तोडायला मात्र त्याचा उपयोग. ज्या ठिकाणीं मनाचें परिवर्तन करायाचें त्या ठिकाणीं शांतिपूर्ण उपाय च अवलंबणें अवश्य आहे. पूर्वी जलदी जाण्याकरिता उंट, घोडे वापरीत लोक त्याचा उपयोग करून एका रात्रींत दोन दोनशें मैल जात. परंतु शंकराचार्य, महावीर, बुद्ध, कबीर, नामदेव वगैरे संतानीं भारतात प्रवास केला तो वाहनानं नाहीं, पायानीं केला. जलद जाणारीं वाहनें त्यानीं वापरलीं नाहींत, कारण त्याना विचार सांगावयाचा होता विचार प्रचार करायचा उत्तम उपाय पायीं याना. सध्याच्या काळीं पायीं प्रवास करणें कोणाला च पसंत नाहीं. परंतु शांतिपूर्ण चिंतन करायचें असेल तर पायीं च प्रवास करणें योग्य आहे ही गोष्ट लक्षात येईल.

## (७) भूदान-यज्ञाचा उगम

दोन दिवसानंतर १८ एप्रिल रोजीं नलगुंडा जिल्ह्यातल्या पोचमपल्ली गावीं विनोबांचा मुक्काम होता तेथून दंडकारण्याला सुरुवात होते. गावच्या लोकानीं त्याचें मोठ्या आदरानें आणि समारंभानें स्वागत केलें. नलगुंडा आणि वारंगळ हे दोन जिल्हे कम्युनिस्टांच्या उपद्रवाबद्दल प्रसिद्ध होते, आणि पोचमपल्ली तर कम्युनिस्टांचें केंद्र समजलें जात होतें. त्या भागात गेल्या दोन वर्षांत वीस खून झाले होते. या गावीं दहा बारा कम्युनिस्ट राहत असत गावची वस्ती अदमासें तीन हजार आणि शेती करायला योग्य अशी अडीच हजार एकर जमीन होती पण या तीन हजारातले दोन हजार लोक भूमिहीन होते तेथें पोचल्यावर दोन तासानीं विनोबा गावात फिरण्याकरिता बाहेर पडले हरिजन वस्ती पहायला गेले. हरिजनाची अवस्था अत्यंत कठीण होती. त्याना जमीन तर नव्हतीच, पण पोट भरायला दुसरें कसलें हि मजुरीचें काम हि मिळू शकत नव्हतें.

दुसऱ्याच्या जमिनीमध्ये ते राबत आणि त्याबद्दल त्याना धान्यातला विसावा भाग, एक घोंगडे आणि एक जोड वहाणा मिळत. विनोबाना पाहून त्याना वाटलें हा कोणी म. गांधींसारखा महापुरुष च आला आहे. त्याच्याजवळ आपल्या दारिद्र्याची कथा सांगितली तर ते ती दूर करण्याचा उपाय सांगतील या आशेनें त्यानीं विनोबाजवळ आपल्याला जमीन मिळवून देण्याची याचना केली. तुम्हाला किती जमीन पाहिजे म्हणून विनोबानीं विचारले. चाळीस एकर बरड आणि चाळीस एकर उत्तम अशी एकूण ऐंशी एकर जमीन मिळेल तर आमचें काम भागेल असें त्यानीं सांगितलें. जमीन मिळाल्यास सगळे मिळून एकत्र शेती कराल कीं वेगवेगळी ? असें विनोबानीं त्याना विचारलें आपआपसात थोडा वेळ विचार करून त्याच्या पुढाऱ्यानं उत्तर दिलें कीं आम्ही एकत्र शेती करू. तेव्हा त्याप्रमाणें अर्ज लिहून देण्याला विनोबाजींनीं त्याना सांगितलें. अर्ज सरकारकडे पाठवून सरकारकडून त्याना जमीन मिळवून देण्याची खटपट करण्याचा त्यांचा विचार होता. इतक्यात गावातले बरेच लोक त्या ठिकाणीं जमले. विनोबानीं त्याना विचारलें, सरकारकडून जमीन मिळाली नाहीं किंवा ती मिळण्यास विलंब लागला तर या आपल्या गावातल्या गरिबांकरिता गावातले च कोणी सज्जन जमीन देऊं शकणार नाहींत का ? जमलेल्या लोकामध्यें श्री रामचंद्र रेड्डी या नावाचे गृहस्थ होते त्यानीं आपण स्वत व त्याचे पाच भाऊ याच्या वतीनें पन्नास एकर बरड आणि पन्नास एकर चांगली अशी एकूण शभर एकर जमीन या गरीब बांधवाच्याकरिता द्यायला तयार आहों असें सांगितलें. त्या दिवशीं सध्याकाळच्या प्रार्थनासभेत या दानाची विनोबानीं घोषणा केली. त्यानीं ही जमीन घेऊन त्या गरीब हरिजनाना वाटून दिली. हरिजनाच्या आनंदाला पार राहिला नाहीं

या घटनेनें विनोबाच्या मनात विचारचक्र सुरु झालें ज्या ठिकाणीं तीन हात जमिनीकरिता माणसांत तंटे होतात त्या ठिकाणीं शभर एकर जमीन कशी मिळाली ! आपल्याला किती जमीन पाहिजे हें हि त्यानीं सांगितलें नव्हतें त्याना ऐंशी एकर जमीन पाहिजे होती आणि मिळाली शभर. हिंदुस्थानातील जमिनीचा प्रश्न सोडविण्याच्या मार्गाकडे श्री रामचंद्र रेड्डी याच्याकडून परमेश्वरानें बोट दाखविलें काय ? म. गांधींचा आत्मा

श्री रामचंद्र रेड्डींच्यात प्रवेश करून जमिनीचा प्रश्न सोडविण्याचा शांतिपूर्ण मार्ग आपल्यास दारात आहे काय, असे वाटून अशा तऱ्हेनें पायीं यात्रा करीत जमीन मिळवीत गेलों तर जमिनीचा प्रश्न सुटेल अशी कल्पना त्यांच्या मनात उदय पावली. या जमिनी मिळविण्याच्या कामाला त्यांनीं 'भूदान-यज्ञ' असे नाव दिलें. याप्रमाणे भूदान यज्ञाच्या गंगोत्रीचा उगम झाला. हिंसेन पीडलेल्या, रक्तानें न्हालेल्या तेलंगणातल्या घरोघर फिरून भूदान-यज्ञाचा संदेश सांगण्याचा त्यांनीं संकल्प केला. पण क्षणभर त्यांच्या मनात त्याविषयीं शंका हि उत्पन्न झाली. त्यासंबंधीं एका प्रार्थनोत्तर भाषणात ते म्हणतात, "ज्या दिवशीं मला पहिलें दान मिळालें त्या दिवशीं रात्रीं माझ्या मनात विचार आला कीं याप्रमाणें जमीन मागून हिंदुस्थानातल्या सर्व दरिद्री भूमिहीनांचा प्रश्न मी सोडवू शकेन का? मी हें साहस तर करीत नाहीं ना? कारण इतिहासात याप्रमाणें कधीं घडल्याचें दिसत नाहीं. परंतु आतून प्रेरणा मिळाली. आतून उत्तर मिळालें, "भिऊ नको, जमीन मागत जा." तेव्हा माझ्या मनात आलें, "ज्या अर्थीं परमेश्वर जमीन मागायला मला प्रेरणा देत आहे त्या अर्थीं खचित च दुसऱ्यांना जमीन द्यायला तो प्रेरणा देईल च. कारण तो कोणतें हि काम अर्धवट करीत नाहीं." ८ ऑगस्ट १९५५ या दिवशीं आंध्र प्रदेशातील श्रीकाकुलम् जिल्ह्यातल्या पार्वतीपुरम् या गांवीं विनोबांचा मुक्काम होता. प्रार्थनोत्तर भाषणात ते म्हणाले, "ज्या दिवशीं मला पहिलें दान मिळालें त्या दिवशीं मी विचार करू लागलों– या घटनेचा अर्थ काय असावा? माझ्या मनात आलें कीं मनुष्य केवळ आपल्या च विचारानें काम करीत नसतो. जगामध्यें त्याच्याकरिता कांहीं विचार तयार होऊन राहिलेला असतो. आज जगामध्यें एक हवा तयार होऊन राहिली आहे मी केवळ निमित्तमात्र आहे. मी आणखी हि विचार करू लागलों कीं हें काम करायला माझ्या अंगात शक्ति आहे का? तेव्हा उत्तर मिळालें कीं मी शक्तिशून्य आहें परंतु शक्तिशून्य असलों तरी विश्वासशून्य नाहीं. म्हणून मी जर अभिमान सोडून दिला तर ज्याप्रमाणें राम अवतारात परमेश्वरानें वानरांच्याकडून हि काम करून घेतलें त्याप्रमाणें तो माझ्या हातून हि हें काम करून घेईल. दुसऱ्या दिवशीं मी

दुसऱ्या गावाला गेलों. तेथें 'आपल्याला जर चार मुलगे असतील तर मी पाचवा आहे; मला पाचवा हिस्सा द्या' असें सांगू लागलों. अशा प्रकारें कोणी माणूस मागणी करील अशी तयल्या लोकांची कल्पना नव्हती. परंतु हिरोशिमावर ॲटम बॉंब पडल्यावर तेथल्या लोकांची जी अवस्था झाली ती च अवस्था त्या गावातल्या लोकांची झाली. या वैचारिक भावनेनें ते स्तिमित होऊन गेले. तरी पण पचवीस एकर जमीन मला मिळाली. याप्रमाणें भूदान-यज्ञ सुरु झाला." याप्रमाणें अतिशय नम्र होऊन अत्यंत भक्ति-भावानें भूमिदान मागत मागत ते पुढें चालले. जून महिन्याच्या मध्यापर्यंत दोन महिने ते तेलंगणातल्या दारोदारीं जमीन मागत फिरले. या दोन महिन्यात दरिद्रनारायणाकरिता लोकांनीं बारा हजार एकर जमीन दिली. पावसाळा आला होता. परंधाम आश्रमात तेव्हा चालविलेल्या कांचन-मुक्तीच्या प्रयोगात ते पुन्हा मग्न झाले.

अनेकांचे डोळे उघडले. भारताच्या आर्थिक स्वराज्य मंदिराचें द्वार खुलें झालें. भारताची भूमिसमस्या शान्ततेनें सोडविण्याचा मार्ग सापडला. परंतु कित्येकांच्या मनात असा संशय आला कीं, तेलंगणात जमीनदार लोक कम्युनिस्टांच्या अत्याचारानें त्रासले होते त्यामुळें तेथें थाहीं थोडी जमीन मिळाली. सामान्य स्थितींत अशा तऱ्हेनें जमीन मिळण्याचा संभव नाहीं. विनोबाजी याचा विचार करूं लागले. जमीन तर केवळ जमीनदाराच्या कडून च मिळालेली नाहीं. पुष्कळशी जमीन सामान्य शेतकऱ्याकडून हि मिळाली होती. मग असा संशय का यावा? संशय प्रकट करणाराच्या म्हणण्याचा अर्थ असा होतो कीं, प्रेमानें, अहिंसेनें काम करून घ्यायचें असलें तर प्रथम हिंसेचा प्रयोग आवश्यक आहे. हा अहिंसेचा मार्ग नाहीं. पण त्याकरिता तेलंगणातल्यासारखी ज्या ठिकाणीं हिंसात्मक चळवळ झालेली नाहीं अशा दुसऱ्या ठिकाणीं भूदान-यज्ञाची परीक्षा करणें जरूर होतें.

## (८) भूदान-यज्ञाचा क्रमविकास

अशा सुयोग परमेश्वरानें त्याना दिला. अहिंसक समाजरचनेसंबंधीं त्यांचे विचार प्लॅनिंग कमिशनपुढें (राष्ट्रीय योजना समितीपुढें) मांडण्याकरिता पंडित जवाहरलालजींनीं विनोबाना दिल्लीस येण्याचें आमंत्रण दिलें.

विनोबांनीं तें आमंत्रण स्वीकारलें पण पायीं जाण्याचें निश्चित केलें. त्याच्या वाढदिवसाच्या दुसरे दिवशीं, १२ सप्टेंबर १९५१ रोजीं, ते मध्यप्रदेशांतून उत्तर हिंदुस्थानाकडे दिल्लीला रवाना झाले. वाटेंत भूदान यज्ञाचा प्रचार करीत, भूमिदान मागत, दोन महिन्यांत ५५० मैल मार्ग चालून ते दिल्लीला पोहोंचले. या दोन महिन्यांत १८ हजार एकर जमीन मिळाली. ते ज्या भागांतून गेले त्या ठिकाणीं कसल्या हि प्रकारची कधीं हि हिंसात्मक चळवळ झालेली नव्हती कसला हि हिंसावादी पक्ष त्या ठिकाणीं काम करीत नव्हता. तरी पण जेथें तेलंगणांत दोन महिन्यांत बारा हजार एकर जमीन मिळाली तर ह्या अगदीं शांत असलेल्या दोन महिन्यांत अठरा हजार एकर मिळाली. ज्यांना संशय वाटत होता त्यांना हें उत्तर होतें.

विनोबांचें दिल्लींतील काम संपलें. उत्तरप्रदेशांतल्या सर्वोदयप्रेमी कार्यकर्त्यांनीं त्यांना उत्तरप्रदेशासारख्या व्यापक क्षेत्रांत भूदान यज्ञाची परीक्षा करण्याची विनंति केली. म्हणून आश्रमांत परत न जातां अशी च उत्तरप्रदेशांत पायीं यात्रा करण्याचें त्यांनीं ठरविलें आणि त्याप्रमाणें सुरुवात केली. या वेळीं सार्वत्रिक निवडणुकी चालू होत्या. तेथले बहुतेक कार्यकर्ते तीन महिने या निवडणुकांत गुंतले होते. तरी सामान्य लोकांकडून त्यांच्या हाकेला भरपूर साद आणि सहकार्य मिळालें आणि सहा महिन्यांत एक लक्ष एकर भूमिदान प्राप्त झालें. १९५२ सालचें सर्वोदय संमेलन विनोबांना हजर रहाण्यास सोयीचें व्हावें म्हणून त्यांच्या यात्रेच्या मार्गावर च बनारसजवळच्या सेवापुरी आश्रमांत एप्रिल महिन्यांत भरलें. तोंपर्यंतच्या सहा महिन्यांत एक लाख एकर जमीन मिळाली. सेवापुरीच्या संमेलनांत भूदानयज्ञाची चळवळ सर्व भारतांत सुरू करावी आणि पहिला हप्ता म्हणून पंचवीस लाख एकर जमीन मिळवावी असा संकल्प करण्यांत आला. हिंदुस्थानांत पांच लाख खेडीं आहेत प्रत्येक खेड्यांत एका तरी भूमिहीन शेतमजुराच्या कुटुंबाला पांच एकर जमीन देऊन त्याला 'सर्वोदय परिवार' म्हणून स्थापन करायचें ठरविलें तर त्याकरितां पंचवीस लाख एकरांची आवश्यकता होती. या दिशेनें पंचवीस लाख एकराचा संकल्प करण्यात आला. विनोबांच्या संमतीनें सर्वसेवासंघानें प्रत्येक प्रांतात प्रादेशिक

भूदान यज्ञसमित्या स्थापन केल्या आणि सर्व भारतात भूदान यज्ञ आंदोलन सुरू झालें.

तेलंगणाच्या यात्रेंत विनोबांना रोज दोनशें एकर जमीन मिळाली. दिल्लीच्या यात्रेंत तीनशें एकर. उत्तरप्रदेशांत सेवापुरी संमेलनापर्यंतच्या सहा महिन्यांत रोजीं पांचशें एकर आणि संमेलनानंतर रोज हजारप्रमाणें भूमिदान मिळालें. सर्व दर्जाच्या, सर्व परिस्थितींतल्या लोकांनी भूमिदान दिलें. हिंदूंनीं दिलें, मुसलमानांनीं दिलें आणि इतर धर्मीयांनीं हि दिलें. स्त्रियांनीं हि फार भक्तिभावपूर्वक दिलें. मोठमोठ्या जमीनदारांनीं दिलें. लहान लहान शेतकऱ्यांनीं दिलें. गरीब शेतकऱ्यांनीं या भूदान यज्ञांत आपल्या लहानशा तुकड्याच्या आहुति इतक्या श्रद्धापूर्वक दिल्या कीं, त्याच्या अनेक मधुर स्मृति विनोबांच्या अंतःकरणावर कोरून राहिल्या आहेत. त्यांचा उल्लेख करतांना ते लिहितात, "ह्या यज्ञांत कित्येक 'शबरी'नीं आपलें सर्वस्व-दान केलें आहे आणि कित्येक 'सुदाम्या'नीं आपले पोहे अर्पण केले आहेत. अशा चिरस्मरणीय भक्तगाथा अनेक घडल्या आहेत." काँग्रेस, समाजवादी पक्ष आणि कृषक मजदूर प्रजापक्ष ( हे सध्या दोन्ही एक झाले आहेत ), भारतीय जनसंघ वगैरे राजकीय पक्षांनीं भूदान यज्ञ आंदोलनाला पाठिंबा दिला आहे.

पावसाळ्याकरितां त्यांनीं काशी विद्यापीठांत मुक्काम केला आणि १९५२ च्या १२ सप्टेंबर रोजीं पुन्हा यात्रा सुरू केली. दोन दिवस उत्तर प्रदेशांत फिरून त्यांनीं उत्तरप्रदेशाची यात्रा समाप्त केली आणि १४ सप्टेंबरला बिहार प्रदेशांत प्रवेश केला. तेथपर्यंत त्यांना उत्तर-प्रदेशांत तीन लक्षांहून अधिक जमीन मिळाली होती. बिहारमध्यें हि आशादायक परिस्थिति निर्माण होऊं लागली. दोन वर्षांत अर्थात् १९५४ च्या मार्च महिन्यापूर्वीं सर्व भारतांत २५ लक्ष एकर भूमिदान प्राप्त करण्याचा संकल्प करण्यांत आला होता. त्यांत बिहारचा भाग चार लक्षांचा होता. बिहारमध्यें सहा महिने फिरून १९५३ सालच्या मार्च महिन्यांत पश्चिम बंगालच्या दिनाजपूर जिल्ह्यांत रायगंज गांवाजवळ पश्चिम बंगालमध्यें विनोबांनीं प्रवेश करावा असें ठरलें होतें. तेथें त्या जिल्ह्यांत तीन

दिवस फिरून बाकुडा जिल्ह्यात बंगालची यात्रा पुरी करून १६ मे ला बिहारच्या मानभूम जिल्ह्यात यावें असा कार्यक्रम ठरला होता बिहारमध्यें आणखी एक महिना फिरून बिहारची यात्रा पुरी करायची आणि पुढें ओरिसात जायचें. परंतु बिहारमधली यात्रा करताना त्यांनीं या बेतात आमूलाग्र परिवर्तन करून टाकलें बिहारची भूमिसमस्या पूर्ण सुटल्याशिवाय *आपण बिहार सोडणार नाहीं असा त्यांनीं संकल्प केला आणि बिहारमधून* शेतील योग्य अशा जमिनींतला ⅙ म्हणजे ३२ लक्ष एकर जमिनीची बिहारकडून मागणी केली विनोबांच्या या संकल्पामागें एक युक्तिवाद होता तो समजून घेणें जरूर आहे त्यासंबंधीं विनोबांनीं म्हटलें आहे, "आपण जमिनीचा प्रश्न जर सोडवू शकलों तर आपल्या विचारात क्रांति घडून येईल. याकरिता मी सर्व भारतात फिरत आहें आणि त्याप्रमाणें दुसरे हि कित्येक लोक फिरत आहेत परंतु मला असा अनुभव येत आहे कीं, एका प्रदेशात त्याचा व्यापक रीतानें प्रयोग करून हा प्रश्न कसा सुटेल हें प्रत्यक्ष दाखविणें आवश्यक आहे म्हणून बिहारकडून मी ३२ लक्ष एकर जमिनीची मागणी करीत आहें" शिवाय तो च युक्तिवाद पुढें चालवून प्रदेशातल्या एखाद्या जिल्ह्यात आपली सर्व शक्ति एकवटून काम करणें आवश्यक आहे. भगवान् बुद्धाची ही विहारभूमि म्हणून गया जिल्हा याकरिता आत्यंतिक आणि केंद्रीभूत कार्य करण्याकरिता निवडला गेला बिहारमधें ज्या प्रकारची जमीन आहे ते सर्व प्रकार गया जिल्ह्यात आहेत. सपाट जमीन आहे, उच्च नीच डोंगराळ जमीन आहे, जंगल आहे, वाळवट आहे, कंकरमय आहे, *अशी सर्व प्रकारची जमीन गया जिल्ह्यात आहे एक किंमतवान् जमीन* आहे तशी च अगदीं निकृष्ट कमी किंमतीची हि जमीन आहे म्हणून जमिनीच्या दृष्टीनें गया जिल्हा बिहारचा प्रातिनिधिक स्वरूप समजायला हरकत नाहीं गया जिल्ह्यावर लक्ष केंद्रित करून ठोस कामाकरिता तो निवडण्याचें हें हि मुख्य कारण होतें शिवाय हिंदुस्थानातल्या अनेक ठिकाणाहून कार्यकर्ते येऊन तेथे कामाला लावणें सुलभ होतें

१९५२ सालच्या डिसेंबरमध्यें विनोबांचें स्वास्थ्य बिघडलें त्या वेळीं ते मानभूम जिल्ह्यात फिरत होते आजारामुळें मानभूम जिल्ह्यातल्या चांडिल गावीं त्यांना तीन महिने पडून रहावें लागले. म्हणून त्या वर्षीचें सर्वोदय

समेलनाचे अधिवेशन चांडिल येथें च घेण्यात आलें. त्या समेलनात असा सकल्प करण्यात आला कीं, सेवापुरी समेलनातल्या सकल्पाप्रमाणें दोन वर्षांत अर्थात् १९५४ साल्च्या मार्च महिन्यापूर्वी सर्व भारतात २५ लक्ष एकर भूमिदान प्राप्त करायच च, परतु त्याशिवाय १९५७ सालपर्यंत सर्व भारतात मिळून शेतीला योग्य अशा एकूण जमिनीचा एकपचमाश म्हणज पाच कोटि एकर जमीन भूदान यज्ञात दान मिळवायची. हा उद्देश साध्य करण्याकरिता पाच वर्षेपर्यंत, निदान एक वर्षपर्यंत तरी, आपल इतर काम सोडून भूदान यज्ञाला च वाहून घेण्याचे कार्यकर्त्यांना आवाहन करण्यात आलें. १९५७ सालापूर्वी पाच कोटि एकर भूमिदान प्राप्त करून भारताची भूमिसमस्या यशस्वी रीतीनें सोडविण्याचा सकल्प विशेष अर्थपूर्ण आहे. १७५७ सालीं प्लासीच्या लढाईंत हिंदुस्थान पारतत्र्याच्या जाळ्यात बद्ध झाला. १८५७ सालच्या बडाच्या रूपानें पारतत्र्यानें बधन तोडण्याकरिता क्रातीला सुरुवात झाली १९५७ सालीं सामाजिक आणि आर्थिक समता स्थापन करून स्वराज्याला पूर्णता प्राप्त व्हावी. यासबधीं विनोबा म्हणतात, "माझ्या मतें आर्थिक क्राति अनिवार्य आहे १७५७ सालीं प्लासीची लढाई झाली १८५७ सालीं स्वातत्र्याकरिता बड झालें. तशी च आता १९५७ सालीं आर्थिक आणि सामाजिक क्राति झाल्याशिवाय राहणार नाही."

सेवापुरीच्या सर्वोदय समेलनात दोन वर्षांत भूदान यज्ञात २५ लक्ष एकर जमीन जमविण्याचा सकल्प करण्यात आला होता. दोन वर्षांनतर १९५४ च्या एप्रिल महिन्यात बुद्धगया येथील सर्वोदय समेलन भरलें त्या वेळेपर्यंत सर्व भारतात दोन लक्ष सदतीस हजार बावीस दात्याकडून ३८,२५,१०१ एकर जमीन प्राप्त झाली. या दृष्टीनें सेवापुरी समेलनात केलेला सकल्प पूर्ण झाला जरी प्रत्येक प्रदेशाकरिता जो भाग किंवा कोटा ठरविण्यात आला होता तो प्रत्येक प्रदेशात पूर्ण झाला नाहीं. तथापि दोन वर्षांत एवढ्या मोठ्या सख्येच्या दात्याकडून इतकी भूमि मिळणें ही एक आश्चर्य करण्यासारखी गोष्ट होती. याशिवाय बरेंच समग्र ग्रामदान हि मिळालें होतें. अर्थात् थोडी असो जास्त असो, आपल्याजवळ जी काहीं जमीन होती ती त्या गावच्या लोकानीं आपली सर्व भूमि भूदान यज्ञात अर्पण केली

होती. याप्रमाणें भूदान-यज्ञाचा पहिला भाग यशस्वी रीतीनें पार पडला होता. दुसऱ्या भागात १९५७ सालच्या पूर्वी पाच कोटि एकर जमीन मिळविण्याचें कार्य सुरु झालें आहे. काहीं प्रदेशांनीं हें ध्येय पुढें ठेवून कार्याला सुरवात केली आहे. बुद्धगयेच्या संमेलनापासून हें ध्येय पुढें ठेवून सर्व देशात कामाला आरंभ झाला आहे. शिवाय बुद्धगयेच्या संमेलनानंतर मिळालेल्या भूमीच्या वितरणाच्या कामावर हि जोर देण्यंत आला आहे. आजपर्यंत जी जमीन प्राप्त झाली आहे तिचे व्यवस्थितपणे शीघ्र वाटप केल्यानें ग्रामराज्याचा पाया घालण्याचें काम केल्यासारखें होणार आहे.

बिहारमध्यें २७ महिने पदयात्रा केल्यानंतर ओरिसाला जाताना मधें थोडे दिवस विनोबा पश्चिम बंगालमध्यें फिरले. बांकुडा आणि मेदिनीपूर या जिल्ह्यात पदयात्रा करुन जाण्यात त्याचे २५ दिवस गेले. १९५५ सालच्या पहिल्या तारखेस अगदीं पहाटे बांकुडा जिल्ह्यातल्या शालतोडा गावीं त्यानीं प्रवेश केला. *त्याच्या पदयात्रेच्या वेळीं लोकामध्यें अभूतपूर्व स्वयंस्फूर्त जागृति* झालेली दिसून आली. २६ जानेवारी रोजीं त्यानीं ओरिसात प्रवेश केला. त्या ठिकाणीं पूर्वीपासून च भूदान यज्ञाचें काम पुष्कळ च पुढें सरकलें होतें. त्या वेळपर्यंत ओरिसात ४२ हजार दात्याकडून एकूण १ लक्ष २५ हजार एकर जमीन आणि ८५ गावें ग्रामदान मिळालें होतें. त्या ठिकाणच्या आंदोलनाची प्रगति, विशेषतः ग्रामदानाची प्रगति, पाहून विनोबानीं ओरिसात जाण्यापूर्वीं एका पत्रात लिहिलें होतें, “बिहारमधें भूमिप्राप्ति, ओरिसात भूमिक्रान्ति आणि इतर सर्व ठिकाणीं मुक्त भ्रमण.” ही त्याची भविष्य-वाणी सफल झाली आहे. विनोबा ओरिसात गेल्यापासून सर्व प्रदेशात, विशेषेकरुन कोरापूट जिल्ह्यात, भूदान यज्ञानें एक नवीन च स्वरूप धारण केलें त्या ठिकाणीं एकामागून एक ग्रामदानें मिळू लागलीं. भूमिदानाची अखेरची परिणति म्हणजे सर्वस्व ग्रामदान. कारण त्यामुळें व्यक्तिगत मालकी च नाहींशी होऊन गाव म्हणजे एक परिवार असें होऊन जातें. २८ मे १९५५ रोजीं त्यानीं कोरापूट जिल्ह्यात प्रवेश केला. तोंपर्यंत ओरिसात १ लक्ष ४१ हजार एकर जमीन मिळाली होती आणि दात्याची संख्या ९५ हजार ३०० होती त्यात एकट्या कोरापूट जिल्ह्यात नऊ हजार दात्या-कडून ५९ हजार एकर जमीन प्राप्त झाली होती आणि संपूर्ण ग्रामदानाची

सख्या ९१ झाली होती. २० ऑगस्ट १९५५ पर्यंत ओरिसात एकूण ८९८ ग्रामदान मिळालें. त्यात कोरापुटमधल्या ग्रामदानाची सख्या सुमार ४०० होती आणि आतापर्यंत ओरिसात प्राप्त झालेल्या जमिनींचें परिमाण एकूण २ लक्ष ९ हजार ६ शें ८१ होतें

१९५५ सालच्या मार्च महिन्याच्या अखेरीच्या आठवड्यात जगन्नाथ पुरी येथें ७ वे सर्वोदय समलन भरल. त्या ठिकाणीं १९५७ सालापूर्वी भूमिकाति यशस्वी करण्याच्या सकल्पाची पुन्हा घोषणा केली गेली. शिवाय सर्वोदयप्रेमी आणि अहिंसेवर निष्ठा असलेल्या सर्व व्यक्तींना सर्वसेवासघाने सविनय विनति केली कीं, ' ही अहिंसक कातीच्या परीक्षेची वेळ १९५७ सालपूर्वी आहे. तोपयत भूमिकाति सफल करण्याकरिता त्यानीं आपलें इतर सर्व काम सोडून द्यावें आपली बुद्धि, शक्ति आणि कार्यकुशलता त्यानीं भूदान यज्ञाच्या कार्याला च लावावी. १९५५ सालच्या ऑगस्ट महिन्यापर्यंत सर्व भारतात ४ लक्ष ९३ हजार ६५९ दात्याकडून एकूण ४० लक्ष १४ हजार ६२९ एकर जमीन भूदानात मिळाली त्यातली २ लक्ष ११ हजार २०४ एकर जमीन ७२ हजार २५२ कुटुबामध्यें वाटण्यात आली.

ओरिसातील पदयात्रा समाप्त करून विनोबा आध्र प्रदेशात गेले. १ ऑक्टोबर १९५५ रोजीं त्यानीं आध्रमधल्या नोथीली गावात प्रवेश केला. आध्र देशातल्या लोकानीं मोठ्या समारभानें त्याचें स्वागत केलें

## ( ९ ) भूदान-यज्ञाचे पंचसोपान

विनोबा म्हणतात, भूदान यज्ञाच्या पाच पायऱ्या आहेत. भूदान यज्ञ एकेका पायरीवरून चढत विनोबाच्या ओरिसातल्या यात्रेच्या वेळीं तो पाचव्या पायरीवर चढला. ह्या पचसोपानाचें विनोबानीं पुढें दिल्याप्रमाणें विवरण केलें आहे '—

( १ ) तेलगणामध्यें भूमिहीन दरिद्री लोक आणि जमीनमालक याच्यामध्यें झगडे आणि द्वेष उत्पन्न झाल्यामुळें तेथें जी भयकर परिस्थिति उत्पन्न झाली होती ती परिस्थिति सुधारण्याची अत्यत जरुरी होती. अशा अवस्थेमध्यें त्या ठिकाणीं भूदान यज्ञाचा आरभ झाला. आणि त्याला तेथें चागली साद हि मिळाली. तेथील भयकर परिस्थिति बदलून शातीची

स्थापना झाली. त्याचा प्रभाव सर्व देशावर हि पडला आणि देशाचे लक्ष त्यानें आकर्षण करून घेतलें हा भूदान-यज्ञाचा पहिला सोपान. (२) तेलंगणातल्या दंग्यामध्ये जमिनीचे मालक आणि त्यांच्या पक्षातले लोक यांची हजारोहजारांनीं हत्या झाली होती. अनेक दरोडे पडून घरें लुटलीं गेलीं होतीं व जाळण्यात हि आलेलीं होतीं. अनेकांना वाटलें कीं, ह्या कारणामुळें भूदान-यज्ञाला जमीनमालकांकडून अनुकूल उत्तर मिळालें. परंतु सर्व देशात भूदान यज्ञ उपयोगी आहे किंवा नाहीं, विशेषतः ज्या ठिकाणीं कोणत्या हि तऱ्हेची गडबड नाहीं म्हणजे जेथें कमली हि हिंसात्मक चळवळ नाहीं, त्या ठिकाणीं भूदान-यज्ञ चालेल कीं नाहीं याविषयीं शंका आहे. म्हणून जेथें स्वाभाविक अवस्था असेल अशा एखाद्या योग्य क्षेत्रात भूदान यज्ञाची परीक्षा घेणें जरूर आहे. विनोबाच्या दिल्लीच्या यात्रेत अशी परीक्षा पाहण्याचा योग आला आणि तेथें हि भूदान यज्ञ यशस्वी झाला. सर्व देशाची दृष्टि तिकडे आकर्षित झाली. भूदान-यज्ञाची वार्ता चोहोंकडे पसरली. याप्रमाणे भूदान यज्ञाचा द्वितीय सोपान रचला गेला. (३) यापुढें कार्यकर्त्यांमध्यें आत्मविश्वास उत्पन्न करण्याची जरूरी होती कीं ज्यामुळें ते विश्वासपूर्वक सर्व देशात हें आंदोलन चालविण्यात यशस्वी होतील. दोन वर्षांत सर्व देशात २५ लाख एकर आणि त्यात उत्तर-प्रदेशात ५ लक्ष एकर भूमिदान प्राप्त करण्याचा संकल्प सेवापुरीच्या सर्वोदय संमेलनात केला होता. हे दोन्ही संकल्प पूर्ण झाले आणि त्यामुळे कार्यकर्त्यां-मध्यें आत्मविश्वास उत्पन्न झाला. हा भूदानयज्ञाचा तृतीय सोपान. (४) देशात जेवढी भूमि आहे तिचा $\frac{1}{6}$ जमीन जर मिळेल तर च सर्व भूमिहीनांना जमीन देणें शक्य आहे. प्रथम एका प्रदेशात पूर्ण शक्ति लावून याप्रमाणें काम करून जर तेथली $\frac{1}{6}$ जमीन मिळविता आली तर त्या गोष्टीचा प्रभाव इतर प्रदेशावर हि पडेल आणि देशात सर्व ठिकाणीं $\frac{1}{6}$ जमीन मिळवणें सहजसाध्य होईल. या दृष्टीनें बिहारमधें $\frac{1}{6}$ जमीन अर्थात् ३२ लक्ष एकर जमीन मिळविण्याचा संकल्प करण्यात आला. तो संकल्प पुष्कळ प्रमाणात सिद्धीस गेला. २३ लक्षाहून काहीं अधिक जमीन बिहारमधे प्राप्त झाली. आता कार्यकर्ते भूमि वितरणाच्या कामाला विशेष रीतीनें लागल्यामुळें

भूमिप्राप्तीच्या कामाकडे त्यांचें जरा लक्ष कमी झालें. बिहारमध्यें जितकी जमीन मिळाली यापेक्षा जितक्या लोकांनी दिली याचें महत्त्व जास्त आहे. जमीन दान करणारे लोक तीन लाखांहून अधिक आहेत. एका च प्रदेशात लक्षावधि लोक लक्षावधि एकर दान करतात हें दृश्य बिहारमध्यें दिसून आलें. लक्षावधि लोकांनी अत्यंत श्रद्धापूर्वक दान दिलें. बिहारमध्यें जें दान मिळालें त्यातलें अधिकांश दान अत्यंत सात्त्विक दान आहे. हा भूदानयज्ञाचा चौथा सोपान (५) जमिनीवरील व्यक्तिगत मालकीचा निरास होईल तेव्हा च भूमिक्रांति सिद्ध होईल. समग्र ग्रामदानात व्यक्तिगत मालकी नाहींशी होते आणि जमिनीची मालकी गावा-कडे जाते. सर्व गाव एका कुटुंबासारखें वागू लागतें. ह्याला विनोबांनी 'ग्रामपरिवार' असें नाव दिलें आहे. विनोबांनी कोरापूट जिल्ह्यात जेव्हा पदयात्रा चालू केली तेव्हा संपूर्ण ग्रामदानाच्या चळवळीला अपूर्व यश मिळालें. १९५५ सालच्या ऑगस्ट अखेरपर्यंत ओरिसात ५०० हून अधिक संपूर्ण गावें मिळालीं. त्यातलीं एका कोरापूट जिल्ह्यात ४०० वर होतीं. हें दानाबरोबर सर्वस्वदानाची आणखी एक पायरी भूदान यज्ञ चढला. याप्रमाणें भूदान यज्ञानें ओरिसात पांचव्या सोपानावर आरोहण केलें.

विनोबांनीं या भूदान यज्ञाच्या पांच पायऱ्यांना वेगवेगळीं नावें दिलीं आहेत. पहिल्या सोपानात एका विशिष्ट ठिकाणीं अशांति दूर झाली म्हणून त्याला त्यांनीं 'अशांति दमन' असें नाव दिलें. दुसऱ्या सोपानानें सर्व देशाची दृष्टि भूदान यज्ञाकडे आकर्षित केली म्हणून त्याचें नाव 'ध्यानाकर्षण' ठेविलें. तिसऱ्या सोपानानें कार्यकर्त्यांमध्यें आत्मविश्वास जागृत झाला म्हणून त्याला नाव दिलें 'निष्ठानिर्माण'. चौथ्या सोपानावर कोणा एका विशिष्ट प्रदेशात हें जमीन प्राप्त करून घेता येईल का याची परीक्षा पाहण्यात आली म्हणून विनोबांनीं त्याला 'व्यापक भूमिदान' असें नाव दिलें. पांचव्या सोपानात सर्व गावाचा एक च परिवार एक च कुटुंब करण्याचा प्रयत्न केला गेला, याचें नाव त्यांनीं 'भूमिक्रांति' असें ठेविलें.

म्हणून विनोबा म्हणतात, 'भूदान यज्ञ आंदोलन नाहीं, तें आरोहण आहे.'

# (१०) हें जणूं गांधींच्या च कार्याचें दृश्य आहे

परकीय राज्य जाऊन आपल्याला स्वातंत्र्य मिळालें तें फक्त राजकीय स्वातंत्र्य आहे. तें संपूर्ण स्वराज्य नाहीं. राजकीय स्वातंत्र्य हें संपूर्ण स्वराज्य मिळविण्याचें एक साधन मात्र आहे. या साधनानें आर्थिक आणि सामाजिक समता जेव्हां स्थापन होईल तेव्हां च देशाला संपूर्ण स्वराज्य मिळालें असें होईल. त्या स्वराज्याचें चित्र म. गांधींनीं आपल्या अठरा कलमी रचनात्मक कार्यक्रमानें रंगविलें आहे आर्थिक समता स्थापन करणें हें त्या अठरा कलमी रचनात्मक कार्यांतलें एक कार्य आहे. परंतु जगाची व्यवस्था अशी झाली आहे कीं, भूमिसमस्येचें समाधान आणि आर्थिक साम्यप्रतिष्ठा आजकालचा युगधर्म च झालेला आहे. आणि म. गांधींचें हें च असमाप्त कार्य, अर्धवट राहिलेलें काम, परमेश्वरानें विनोबांच्या हातीं सोंपविलें आहे. म. गांधी यांच्यामध्यें जो विभूतिमत्वाचा प्रकाश आपल्याला दिसत होता तें च विभूतिमत्व विनोबांच्या ठिकाणीं आपल्यास दिसून येतें. आणि मनात येतें कीं, गांधीजींचा च आत्मा विनोबांच्या रूपानें कार्य करीत आहे. कृपलानीजी बिहारमध्यें विनोबांना भेटले. त्यांचें कार्य त्यांनीं पाहिलें. आणि त्यांना असा च अनुभव आला. ते म्हणतात, "गांधीजींच्या बरोबर चंपारण्यांत असतांना जें दृश्य पाहिलें तें च दृश्य या ठिकाणीं विनोबाजींच्या बरोबर फिरतांना मला दिसत आहे. गांधीजी ज्या रीतीनें काम करीत तसें च काम विनोबा हि करीत आहेत असें मला दिसलें. मी तसें काम करूं शकत नाहीं; कारण माझा स्वभाव वेगळा आहे. परंतु ज्या मनोभावानें, ज्या पद्धतीनें आणि ज्या साच्यांत बापू काम करीत, अगदीं तसें च विनोबा हि करीत आहेत. गांधीजी खेड्यांतील लोकांशीं कथावार्ता करीत. विनोबा हि तसा च करतात. मनात येतें आणि आशा हि वाटते कीं, गांधीजींचा तो च आत्मा आम्हांमध्यें काम करीत आहे. इतके दिवस वाटत होतें कीं, त्यांनीं जें कांहीं शिकविलें, तें गांधीजी निघून गेल्यावर लोक सर्व विसरून गेले. परंतु हें सर्व कार्य पाहून वाटतें कीं, महात्माजींचा आत्मा विनोबांना माध्यम करून आमच्यांत पुनः कार्य करीत आहे आणि गांधीजी करीत होते तें च कार्य पुढें चालू राहिलें आहे. तें बंद झालेलें नाहीं. केवळ परदेशी राज्य

घालविणें एवढें च त्यांचें कार्य नव्हतें. आमच्यांतल्या राजकीय पुढाऱ्यांना परकीय राज्याचा शेवट म्हणजे च क्रांति असें वाटत होतें; परतु गांधींच्या दृष्टीनें स्वातंत्र्यलाभ हें क्रांतीच्या मार्गावरचें एक पाऊल मात्र होतें. गांधीजी स्वातंत्र्याच्या साह्यानें दारिद्र्याचा प्रश्न सोडवू इच्छीत होते.

## ( ११ ) समग्र ग्रामदान अथवा भूमीचें ग्रामीकरण

चळवळीच्या सुरवातीला च विनोबा म्हणाले होते, मला लहान परिवार नकोत; मला मोठे परिवार करायचे आहेत. सर्व गाव एका कुटुंबासारखें मला करायचें आहे. ते पुढे म्हणतात, "हा उद्देश साधण्याच्या दिशेनें च आमचें आंदोलन चाललें आहे. आणि तें ध्येय यशस्वी होईपर्यंत हें आंदोलन चालू राहील." यासंबंधीं १९५१ सालामध्यें रांची येथें भरलेल्या एका शिबिरात बिहारच्या कार्यकर्त्यांपुढें जमिनीच्या व्यवस्थेचें अंतिम चित्र कसें असेल यासंबंधीं ते म्हणाले :

"आमच्या अवस्थेचें शेवटचें रूप असें असेल. भारतातली सर्व जमीन एकत्र करून सामुदायिक शेती केली जाईल असें नाहीं; जमीन व्यक्तीच्या च हातीं राहील, परतु जमिनीची मालक ग्रामपंचायत असेल. प्रत्येक कुटुंबाला पाच एकरप्रमाणें शेती करायला जमीन दिली जाईल, आणि त्यातून उरेल त्यात सामूहिक शेती करण्यात येईल. गावचा शाळा या सामुदायिक जमिनींच्या उत्पन्नातून देण्यात येईल. शिक्षण, आरोग्य वगैरेंचा खर्च त्यातून च केला जाईल. याप्रमाणें गावचीं सर्व सार्वजनिक कामें या सामुदायिक जमिनीच्या उत्पन्नातून होतील. पण स्वत:चें अन्नधान्य उत्पन्न करण्याकरिता जरूर तेवढी जमीन प्रत्येकाला देण्यात येईल. दर आठ दहा वर्षांनीं जमिनीची पुन्हा वाटणी करण्यात येईल. एखाद्याच्या कुटुंबात जनसंख्या वाढली असेल तर त्याला ज्यास्त जमीन देण्यात येईल, आणि कोणाच्या घरीं कमी संख्या झाली असेल तर त्याला कमी जमीन मिळेल. त्या काळापुरती ती व्यक्ति आपल्या शेताचा मालक असेल. अर्थात् त्या काळात त्याच्याकडून कोणी जमीन काढून घेऊ शकणार नाहीं. प्रत्येक जणाला त्या शेतात काम करताना वाटेल कीं या शेताची जबाबदारी माझ्यावर आहे, ही जमीन माझी आहे, त्याप्रमाणें सामुदायिक जमीन ही माझी च आहे असें

म्हणून त्या जमिनींत हि तो काम करील. सारी जमीन च आमची आहे. आम्हाला जास्त जमीन जरूर असेल तेव्हा आम्हाला जास्त जमीन मिळेल आणि जरूर असेल तेव्हा आमच्याकडून कांहीं जमीन दुसऱ्याला हि दिली पाहिजे असें त्याला वाटेल. जरी पिता-पुत्राचा संबंध अतूट असतो तरी बापाला असें वाटत नाहीं कीं माझ्या मुलाचा मी मालक आहें. बाप म्हणतो, मालक तर भगवान् आहे आणि आम्ही दोघे त्याचे सेवक आहोंत. अर्थात् त्याचें आपल्या मुलावर प्रेम आहे पण तो त्याचा मालक नाहीं. त्या च प्रमाणें जमिनीवर हि त्याचें प्रेम असेल, परंतु तो तिचा मालक असणार नाहीं, जमीन विकायला यायची नाहीं. कोणी आपल्या मुलाची विक्री करतो का? आपल्या मुलाला कोणाच्या मदतीला देता येईल. जमिनीची किंमत पैद्यात होऊं शकत नाहीं. ती अमूल्य वस्तु आहे."

यावरून असें दिसून येईल कीं, समग्र ग्रामदानाची कल्पना सुरुवातीपासून च विनोबांच्या मनात गंभीरपणें होती. परंतु असलें मोठें ध्येय बोलणें ही एक गोष्ट आहे. ती प्रत्यक्षात अमलात आणणें ही वेगळी गोष्ट आहे. आंदोलन जसजसें पुढें जाऊं लागलें तसतशी या ध्येयाला अनुकूल परिस्थिति निर्माण करणें आवश्यक झालें. काळ- आणि परिस्थिति जाणून उत्तर प्रदेशातल्या मगरोठ गावच्या लोकांच्या जवळ समग्र ग्रामदानाची कल्पना ते बोलले. आणि त्या गावच्या लोकांनीं आपलें सगळें गाव त्यांना दिलें. हें पहिलें समग्र ग्रामदान. त्यानंतर बिहारमध्यें १३ आणि ओरिसांत २५ समग्र ग्रामदान मिळालें ओरिसांत समग्र ग्रामदानाची संख्या हळूहळू पण निश्चितपणें वाढू लागली. विनोबा म्हणाले, ओरिसातल्या पदयात्रेचा माझा उद्देश भूमिक्रांति हा आहे गावातल्या सर्व लोकांनीं आपली सर्व जमीन दान देऊन सर्व जमीन गावच्या मालकीची करावी म्हणजे भूमिक्रांति साध्य होईल. विनोबांच्या ओरिसातल्या पदयात्रेंत कोरापूट जिल्ह्यात समग्र ग्रामदानाचा एक प्रवाह च चालू झाला आहे. हा प्रवाह भूदान यज्ञाच्या महत्तम ध्येयाच्या दिशेनें जात आहे.

या समग्र ग्रामदानातल्या जमिनीची व्यवस्था कशी करायची आणि गावातलें पुनर्निर्माणाचें कार्य कसें चालवायचें यासंबंधीं कोरापूट जिल्ह्यातल्या पदयात्रेचे वेळीं विनोबांनीं विस्तारपूर्वक विवरण करून त्या गावातल्या

लोकांना समजावून दिलें, “ जमीन परमेश्वराची. गाव होईल ईश्वराच्या वतीनें जमिनीचा विश्वस्त. कायद्यानें हि कोणा व्यक्तीला जमिनीचा मालक म्हणता येणार नाहीं गावाला च जमिनीचा मालक मानलें जाईल. कुटुंबात किती लोक आहेत हें पाहून माणशीं एक एकर याप्रमाणें प्रत्येक कुटुंबाला शेती करायला जमीन दिली जाईल. प्रत्येक पाच किंवा दहा वर्षांनंतर कुटुंबातली लोकसंख्या जितकी असेल ती पाहून तदनुसार जमिनीची पुन्हा वाटणी होईल. गावात काहीं सामुदायिक जमीन असेल त्या जमिनींतून गावच्या सर्व जमिनीचा सारा देणें आणि गावच्या प्रगतीचीं इतर कार्यें करणें वगैरे कामें होतील. काहीं वर्षें अनुभव पाहून गावच्या लोकांना वाटेल तर गावची सर्व जमीन हि सामुदायिकरीत्या ते करूं शकतील. कोणा एखाद्याच्या शेतात जास्त काम असेल तर गावातले सर्व लोक मिळून तें करून देतील. कोणावर काहीं संकट किंवा त्याच्या शेतात कमी पीक आलें तर त्याला गावातले लोक मदत करतील. कोणी कोणाला कर्ज देऊं शकणार नाहीं. उलट कोणाला काहीं कमी पडेल तर त्याला लोकांकडून साह्य च मिळेल. कारण सर्व गाव जणूं एक कुटुंब च आहे असें राहील.

“ त्यानंतर च ग्रामोद्योग सुरू करण्यात येतील-आणि गाव स्वावलंबी करून पैशाच्या मोहातून त्याला मुक्त करण्याची खटपट करण्यात येईल. पहिलें काम हें असेल कीं, गाववाले एकत्र मिळून ठरवितील कीं यापुढें गावात कापड आणण्यात येणार नाहीं. शेतात कापूस पेरण्यापासून विणण्या-पर्यंत सर्व काम गावात च होईल. त्यामुळें गावातल्या सर्व लोकांना काम मिळेल आणि गावातली लक्ष्मी गावात च राहील. याशिवाय गावात ज्या ज्या काहीं वस्तू लागतील त्या सर्व गावात च तयार करण्याची व्यवस्था करण्यात येईल. गावात कोणाच्या स्वतःच्या खाजगी मालकीचें दुकान असणार नाहीं. गावाच्या मालकीचें एक दुकान राहील. त्यातून च जरूर ते बाहेरील जिन्नस विकत घेता येतील आणि गावाला लागून उरणारे जिन्नस त्याच्यामार्फत च विकले जातील.

“ गावातल्या सर्व मुलामुलींना समान शिक्षण मिळेल. शिक्षक सकाळीं एक तास मुलामुलींना आणि संध्याकाळीं एक तास प्रौढांना शिक्षण देईल.

बारी सर्व दिवस तो शेतात काम करील. भारतातल्या शिक्षणव्यवस्थेंत उद्योग आणि आत्मज्ञान दोन्ही हि पाहिजेत. त्यामुळे हाताला काम मिळेल आणि बुद्धीचा विकास होईल. सध्याकाळीं गावातले सर्व लोक एके ठिकाणीं जमतील आणि तेथें गीता, रामायण वगैरे धर्मग्रंथाचा पाठ होईल आणि गावाच्या उन्नतीसंबंधीं चर्चा करण्यात येईल. आजकाल दारू, विडी, सिगरेट वगैरे व्यसनामुळे गावची अवस्था फार खराब होऊन गेली आहे; म्हणून गावचे लोक सर्व मिळून यापुढे विडी, दारू वगैरे सेवन करणार नाहीं अशा देवापुढें शपथा घेतील गावातल्या कोणाला कर्ज असेल तर तें सोडण्याबद्दल, निदान व्याजाची सूट देण्याबद्दल, सावकाराला विनंति करण्यात येईल. पुढे केव्हा कर्जाची आवश्यकता पडेल तर गावाकडून तें देण्यात येईल. सरकारकडून हि घेण्यास हरकत नाहीं. गावातल्या लग्नकार्यांची व्यवस्था गावाकडून होईल, कोणा कुटुंबाच्या शक्तीनें नाहीं या कारणामुळें लग्नकार्याकरिता कर्ज काढण्याचा प्रश्न उत्पन्न होणार नाहीं.

"सामाजिक क्षेत्रात जातिभेद, अस्पृश्यता, स्त्रीपुरुषभेद वगैरे सर्व भेदभाव दूर करण्यात येतील प्रत्येक मनुष्य परमेश्वराचे संतान म्हणून मानला जाईल. या दृष्टीनें सगळ्यांचे हक्क समान असतील सगळ्या तऱ्हेच्या उद्योगाची, त्या च प्रमाणें समाजहितकर कामाची, सामाजिक, नैतिक आणि आध्यात्मिक प्रतिष्ठा समान राहील गावच्या सर्व जमिनीवर सर्वांचा समान हक्क मानला जाईल. आणि आदर्श तर असा असेल कीं, प्रत्येकजण काहीं थोडा वेळ तरी शेतात काम करील च. कारण शेतीकामाशिवाय मानवजीवनाला पूर्णता मिळण्याचा संभव नाहीं. गावचा विणकर, चांभार, कुंभार वगैर सर्वजण गावच्या लोकांच्या जरूरीप्रमाणें त्यांचें काम करून देतील. त्यांना दिलगीर ठेवला जाणार नाहीं. सर्वांचे शेतातीं जें पीक येईल त्यातला काहीं भाग त्यांच्या घरीं पोंचविण्यात येईल. प्राचीन काळीं गावची व्यवस्था अशी च होती. ह्याप्रमाणें 'वसुधैव कुटुंबकम्' या सिद्धान्ताचा आरंभ ग्रामपरिवारा पासून होईल."

सर्वस्वदानी गावच्या जमिनीच्या व्यवस्थेंत जमिनीची मालकी नाहींशी होईल खरी परंतु व्यक्तिगत मालकीची शोभ मात्र गावच्या लोकांना मिळू शकेल. म्हणजे ते आपली शेती पृथक्पृथक्पणें करू शकतील. समग्र ग्रामा-

संबंधी विनोबा म्हणतात की, गावात कोणी भूमिहीन राहणार नाहीं हें भूदान यज्ञाचें पहिलें पाऊल असें म्हणता येईल आणि गावाच्या भूमीचा कोणी मालक असणार नाहीं हें भूदान यज्ञाचें शेवटचें पाऊल

विनोबा म्हणतात, समग्र ग्रामाचें सुफल चार प्रकारचें आहे (१) आर्थिक, (२) सांस्कृतिक, (३) नैतिक, आणि (४) आध्यात्मिक याचें विवेचन करिताना ते म्हणतात

(१) आर्थिक—"समग्र ग्रामदानाचें पहिलें सुफल आहे आर्थिक क्रांति व्यक्तिगत मालकीचा लोप होऊन गावची सर्व जमीन एक झाल्यावर गावच्या लक्ष्मीची वृद्धि होईल कारण (क) गावाकरिता कोणतें पीक किती परिमाणात आवश्यक आहे हें पाहून शेतात काय पेरायचें हें ठरविणेंत येईल (ख) शेतीच्या उन्नतीकरिता सर्व लोक एकत्र मिळून खटपट करतील (ग) सरकारची किंवा दुसरी बाहेरून मिळणारी मदत सहज रीतीनें मिळू शकेल आणि (घ) व्यक्तिगत रीतीनें कोणाला हि कर्ज काढण्याची सोय राहणार नाहीं याप्रमाणें गावची आर्थिक क्रांति सिद्ध होईल

(२) सांस्कृतिक—"सर्व गाव एक कुटुंबासारखें झालें तर परस्परात प्रेम आणि सहानुभूति वाढेल आपल्या सुखात वा आपल्या दुःखात दुसरे हि अंशभागी झाले म्हणजे सुख वाढतें आणि दुःखाची तीव्रता कमी होते, म्हणून समग्र ग्रामदानी गावच्या लोकाचें सुख वाढेल आणि दुःख कमी होईल शिवाय, अशा गावात परिवारापुरती किंवा व्यक्तीपुरती मनोवृत्ति संकुचित न राहता गावच्या लोकामध्ये खेळाडू वृत्ति निर्माण होईल कोणी हि खेळाडू एकटा च खेळत नाहीं सगळ्याच्या लोकाच्या जोडीनें आणि सहकार्यानें तो खळतो तेव्हा च त्याला जास्त आनंद होतो नर्तकाला हि याप्रमाणें च सामूहिक नृत्यात आनंद होत असतो म्हणून समग्र ग्रामदानी गावातल्या लोकामध्यें एका कुटुंबातल्या लोकाप्रमाणें सहयोग असल्यामुळें सर्वांपेक्षा त्याना जास्त सुख मिळेल आणि दुःखाचें कारण घडल्यास दुःख कमी जाणवेल

(३) नैतिक—"ग्रामीकरणामुळें लोकाची नैतिक पातळी हि वाढेल सटेबाजी, चोरी, दगेधोपे वगैरे नाहींसे होतील कोण कुणाच्या घरीं

कशाला चोरी करील! मनुष्य आपल्या व्यक्तिगत स्वार्थाकरितां वेगळें कुटुंब करतो आणि त्याकरिता वेगळा संपत्तिसंचय करितो. ह्या व्यक्तिगत स्वामित्वामुळें समाजाचें नैतिक अधःपतन झालें आहे. एखादा भिकारी हि दोन चार पैसे किंवा एखादा सामान्य वस्तूचा तुकडा आपल्या फडक्यात काळजीपूर्वक बांधून ठेवतो; त्याप्रमाणें कोणी कांहीं आणे, कोणी कांहीं रुपये, कोणी हजारों रुपये आपापल्या पिशवीत बांधून राखीत असतो. ह्याप्रमाणें लोकांचे मन संकुचित झालेलें असतें आणि म्हणून तें आपलें घर लहान बांधून ठेवतात. हे च जगातल्या तत्त्वासलेल्याचें, संघर्षाचें मूळ आहे. जेव्हां जमिनीची आणि संपत्तीची व्यक्तिगत मालकी नाहींशी होईल तेव्हा लोकांचें आणि समाजाचें हि नैतिक मान उन्नत होईल यात संशय नाहीं. हे समग्र ग्रामदानाचें सर्वोत्कृष्ट सु-फल आहे. असें झाल्यास सर्व जग आनदानें नाचू लागेल. आज सारें जग दुःखात आहे. एकमेकाच्या स्वार्थाचा झगडा हें च दुःखाचे कारण आहे. यामुळें च जगात हिंसा वाढली आहे. जर गावातली जमीन आणि संपत्ति गावाच्या मालकीची होऊन जाईल तर जगाची नैतिक पातळी हि उच्च होईल.

(४) आध्यात्मिक— "आध्यात्मिक दृष्टीविषयीं सर्वांत शेवटीं विवेचन केलें जात आहे, परंतु तिचें महत्त्व कमी नाहीं. हें माझें घर, ही माझी जमीन, अशा तऱ्हेनें लोक बोलत असतात. ही 'मी' आणि 'माझें' अशी भावना मनुष्याला आसक्तीचा दास करून टाकते. मनुष्य जेव्हा 'मी–माझें' या भावनेपासून मुक्त होईल आणि हें जग सर्वांकारिता आहे, केवळ माझ्याकारिता नाहीं, हें ज्ञान जेव्हा त्याला होईल, त्या वेळीं त्याला मुक्तिलाभ होईल. प्रत्येकाचें मन आज बंधनात पडलें आहे. कारण तें 'मी आणि माझें' ही भावना सोडू शकत नाहीं. या कारणामुळें च मुनि-ऋषींनीं मुक्तीचा जो मार्ग दाखविला आहे त्या मार्गानें जाऊन हि सुख वा मुक्ति मिळत नाहीं. बहुधा असें म्हटलें जातें कीं, जर माणूस सर्वस्वत्याग करून घर सोडून निघून जाईल तर त्याची 'मी' आणि 'माझें' ही भावना निघून जाईल. परंतु या निषेधात्मक मार्गानें

मुक्तिलाभ होत नाहीं. साधारणपणें आपण ज्याला आपलें घर म्हणतों, तें वास्तविकपणे आपलें आहे असें मानायचें सोडून दिलें तर च आपला मुक्तीचा मार्ग सुगम होईल. आपला संपूर्ण विश्वास असला पाहिजे कीं सर्व गाव माझें च घर आहे; आणि ज्या घरीं आपण साधारणपणें राहत असतों आणि ज्याला आपण आपलें घर आहे असें म्हणतों, तें हि सर्वांच्याकरिता आहे. 'मी कोणाकरिता नाहीं' आणि 'कोणी माझ्याकरिता नाहीं' ही भ्रांत भावना राहली तर मुक्तिलाभ होण्याचा संभव नाहीं. 'मी सगळ्याचा' आणि 'सगळे माझे' ही भावना जागृत झाली तर च मुक्ति प्राप्त होईल.

"प्राचीन काळीं मुक्ति मिळविण्याकरिता 'माझें काहीं हि नाहीं' ही भावना साध्य करण्याकरिता पुष्कळ प्रयत्न करण्यात येत असे. त्याकरिता संसार सोडून देऊन लोकांच्या संसर्गापासून निर्जन अरण्यात राहण्याची प्रथा देशामध्यें होती. असें वाटे कीं, हा च मुक्तीचा अगदीं सहज उपाय आहे. परंतु मुक्ति प्राप्त करायचा हा काहीं सोपा उपाय नाहीं. मनुष्य या सर्वांचा त्याग करून निघून जाईल खरा, परंतु शेवटीं लंगोटीवर तरी त्याची आसक्ति राहून जाईल. त्यामुळें त्याचें कार्य सिद्ध होणार नाहीं. म्हणून आपण मनात अशी भावना केली पाहिजे कीं, माझें जें काहीं आहे तें सर्व गावाचें आहे. गाव माझें आहे आणि मी गावाचा आहें. या च श्रद्धेच्या बळावर आपल्याला लौकर मुक्ति प्राप्त होईल.

## (१२) प्रेम आणि आत्मत्याग या वृत्तींचा विकास

सामान्य दृष्टीनें पाहिलें तर जग स्वार्थपर आहे असें वाटतें. पहावें तिकडे स्वार्थपरता, द्वेष आणि हिंसा यांचें तांडव चालू आहे. व्यक्तिव्यक्तीमध्यें, वर्गावर्गामध्यें, जातीजातीमध्यें, देशादेशामध्यें स्वार्थाचा झगडा चालू आहे. परस्परांबद्दल द्वेष आणि हिंसा यांचें भयंकर दर्शन होत आहे. अशा अवस्थेमध्यें इतक्या थोड्या काळात जमिनीचा प्रश्न सुटण्याच्या दृष्टीनें मिळालेली जमीन अगदीं थोडी असली तरी इतक्या मोठ्या प्रमाणात भूदान यज्ञात जमीन मिळणें कसें समजनीय होतें?

मनुष्यात ज्याप्रमाणें लोभ, हिंसा आणि द्वेष दिसून येतो, त्याप्रमाणें त्याच्याबरोबर च त्याच्यात आत्मत्यागाची स्वाभाविक प्रवृत्ति असते असें

दिसून येईल. आपल्या जीवनातून हळूहळू हिंसा, द्वेष आणि लोभाचा नाश करून अहिंसा आणि प्रेमाची प्रतिष्ठा व्हावी याकरिता मनुष्य सतत प्रयत्न करीत आला आहे. मनुष्य आणि पशु यामध्ये हा च मुख्य भेद आहे. पशु प्रारंभी जसा होता तसा च अजून हि आहे. परंतु हिंसाशक्तीचा नाश आणि प्रेमशक्तीचा विकास करून मनुष्यानें आपल्यात अद्भुत परिवर्तन केलें आहे यात च मनुष्याच्या संस्कृतीचा वास्तविक विकास सिद्ध झाला आहे. आफ्रिकेतल्या निबिड जंगलात मनुष्याचा जो नमुना दृष्टीस पडतो, अंदमान येथील गहन अरण्यात ' जरवाज ' नावाच्या मनुष्यजातीची जी हिंस्र मूर्ति दिसून येते, त्यावरून वर सांगितलेल्या उक्तीची सत्यता दिसून येईल. मानवसंस्कृतीच्या इतिहासात कित्येकांची आपल्या प्रेम आणि आत्मत्याग या वृत्तींची येथपर्यंत उन्नति झाली होती कीं त्यांना ' नरनारायण ', ' ईश्वराचे अवतार ' अशा तऱ्हेच्या संज्ञा प्राप्त झाल्या. असे थोडे च अपवादात्मक लोक होऊन गेले, परंतु सामान्य क्षेत्रात प्रेम आणि अहिंसा स्थापन करण्याच्या बाबतींत मानवसंस्कृतीचा विकास अजूनपर्यंत हि आपल्या कुटुंबाइतका च मर्यादित आहे. म्हणून, साधारण मनुष्यामध्यें त्याग आणि प्रेमाचा विकास नेहमीं दिसून येतो खरा, परंतु तो आपलें कुटुंब, आपले स्वकीय एवढ्या-पुरता च मर्यादित असतो. लोक आपल्या आप्तस्वकीयांकरिता किती तरी त्याग, किती तरी दुःख सोसायला नेहमीं तयार असतात. प्रत्येक घरीं प्रेम आणि त्यागाची वृत्ति किती तरी प्रमाणात विस्तार पावलेली दिसून येईल. मातापिता आपल्या मुलांमुलींकरिता, मुलें आपल्या आईवडिलांकरिता, स्त्री पतीकरिता, पति आपल्या स्त्रीकरिता जो आत्मत्याग, जें दुःख, कष्ट सहन करू शकतात ते पाहिल्यावर मन विस्मित होऊन जातें. जर मनुष्य सर्व गावाला च आपलें कुटुंब मानू शकेल, जर मनुष्य गरिबाला आपल्या कुटुंबातला एकजण, दरिद्री भूमिहीनाला आपल्या कुटुंबातला आणखी एक अंशभागी मानू लागेल तर भूदान यज्ञ अविलंबेंकरून पूर्ण यशस्वी होईल. संस्कृतीचा इतिहास पाहिला तर असें दिसून येईल कीं, मनुष्यानें ज्या अनेक संस्था निर्माण केल्या त्यांत कुटुंबसंस्था ही फार मोठी आहे. कुटुंबामध्यें दुसऱ्याकरिता त्याग आणि दुःख, कष्ट सहन करण्याचें शिक्षण मनुष्याला मिळतें. आपला स्वतःचा विकास आपल्या कुटुंबाइतका विस्तृत करण्याचें

शिक्षण त्याला मिळतें. दुसरी व्यक्ति ही आपला च भाग आहे असें समजण्याची शक्ति त्याला येते. परंतु मानवसंस्कृतीची प्रगति अजून हि एवढ्यापुरती च सीमित राहिली आहे. कारण मनुष्याला आपल्या परिवाराकरिता आत्मत्याग करण्याचें, आपल्या परिवाराएवढे आपण मोठे आहों असें मानण्याचें जें शिक्षण मनुष्याला मिळालें तें आपल्या परिवारापुरतें च, आपल्या कुटुंबाइतकें च मर्यादित राहिलें. आपल्या गावाइतकें, आपल्या समाजाइतकें, विस्तृत झालें नाहीं. म्हणून भूदान यज्ञाचा उद्देश मानव-संस्कृतीला—प्रथमतः निदान भारतीय संस्कृतीला—एकाच उच्च पातळीवर नेणें हा आहे. भूदान यज्ञाचा उद्देश आपल्या कुटुंबाच्या सीमेचा विस्तार करून त्याच्या प्रेमाच्या आणि त्यागाच्या क्षेत्राचा हि विस्तार करणें हा आहे. गावाला च, सर्व समाजाला च आपला परिवार मानणें आणि दरिद्री भूमि-हीनांना आपला सहावा मुलगा मानणें हें भूदान यज्ञाचें ध्येय आहे. म्हणून विनोबा म्हणतात, " मी आपल्याजवळ एवढें च मागतों की, आपण आपल्या मुलांवर जेवढें प्रेम करता, त्याचें पालनपोषण करता, तसें च प्रेम तुम्ही दुसऱ्याच्या मुलांवाळांवर करा." मनुष्याच्या आत्म्याची शक्ति, त्याचें प्रेम, आत्मत्यागाची शक्ति यांना सीमा नाहीं. परंतु सध्याच्या काळीं आपलें कुटुंब आणि परिवार यांच्या सीमेंत च ती सुप्त राहिली. ही सुप्त शक्ति कशी जागृत करायची?

ही सुप्त शक्ति जागृत करायची असेल तर प्रथम जनमानसांत चिंतन क्रांति, विचार-क्रांति होणें जरूर आहे. व्यक्तिगत संपत्ति मानण्याच्या पायावर च सध्याची समाज व्यवस्था उभारलेली आहे. म्हणून जेव्हां विचार-क्रांति होईल, लोकांच्या मनांतून मालकीची कल्पना नाहींशी होईल, तेव्हां च ही समाजव्यवस्था बदलूं शकेल. समाजांत ही विचार-क्रांति कशी घडवून आणायची?

ज्याप्रमाणें आत्म्याची शक्ति अपरिमित आहे त्याप्रमाणें च विचाराची शक्ति हि अमर्याद आहे. एखादा विचार मनुष्याच्या अंतःकरणांत असा स्फुरतो कीं त्यामुळें त्याच्या जीवनांत क्रांति होते. असें दिसून येतें कीं, काहीं काहीं श्रेष्ठ मनुष्याच्या विचारांत इतकी शक्ति असते कीं, त्यामुळें दुसऱ्या लोकांच्या जीवनांत, एवढे च नाहीं तर समाजजीवनांत हि, अमोल

परिवर्तन होऊन जातें पण असा विचार सत्यावर आधारलेला असावा लागतो भूदान यज्ञात असलेली विचारधारा सत्याच्या पायावर उभारलेली आहे आणि ती भारतीय परंपरेला धरून आहे या विषयात आणखी हि एक गोष्ट नीटपणें समजून घेतली पाहिजे. साधारणपणं धर्मप्रचार करणे आणि क्रांति घडवून आणणें या दोन्ही वेगळ्या गोष्टी आहेत. विनोबा आपल्या चळवळीला 'धर्मचक्रप्रवर्तन' म्हणतात तरी त्यांचें आंदोलन क्रांतिकारी आहे. पूर्वीचे ऋषि मुनि नेहमीं धर्माचें शिक्षण हि देत असत आणि धर्माचा प्रचार हि करीत असत. परंतु युगधर्म आणि कालाचा ओघ जाणून त्याच्याशीं च धर्मविचार जोडून देणें ही वेगळी गोष्ट आहे. हा क्रांतीचा मार्ग आहे. ही च धर्मचक्रप्रवर्तनाची पद्धति आहे. अर्थात् सत्पुरुष जन्माला येतात आणि आवश्यकतेनुसार धर्मप्रचार करीत असतात हें प्राचीन काळापासून चालत आलेलें आहे. परंतु त्यामुळें व्यापक रीतीनें हृदयपरिवर्तन झालेलें नाहीं, पण जेव्हा धर्मविचार कालाच्या ओघाशीं जोडला जातो तेव्हा व्यापक हृदयपरिवर्तन घडून येतें. म्हणून च सामुदायिक अहिंसेच्या मार्गानें गांधीजी देशाला नेऊ शकले प्रतिपक्षाचा अहिंसेनें प्रतिकार करणें हें पूर्वी हि घडलेलें आहे, परंतु त्या कालाची मागणी 'स्वराज्य' ही होती. जर गांधीजींनीं अहिंसेची स्वराज्याशीं जोड केली नसती तर त्यांना आणखी किती अनुयायी मिळाले असते? इंग्रजी सत्ता बलवान् होती, त्यांच्या हातीं आधुनिक शस्त्रें होतीं आम्ही नि शस्त्र म्हणून अहिंसेच्या च मार्गानें इंग्रजाशीं लढाई देणें योग्य होतें. परंतु तेवढ्यानें च भागलें नसतें. देशाची परिस्थिति याला अनुकूल होती याप्रमाणें आंतरिक धर्मविचाराची शक्ति आणि परिस्थिति या दोन्हींचा संयोग केल्यामुळें गांधीजी देशाला अहिंसेचें शिक्षण देण्यास समर्थ झाले. त्या प्रमाणें च दरिद्री भूमिहीनाला आज जमीन पाहिजे आहे. केवळ ह्या देशातल्या च नव्हे तर साऱ्या दुनियेंतल्या, विशेषत आशियातल्या, लोकांना जमीन मिळाल्याशिवाय ते कधीं हि स्वस्थ बसणार नाहींत. आताची परिस्थिति च अशी आहे. याच्याबरोबर च आज एक धर्मविचार जागृत होत आहे. जमिनीवर सर्वांचा समान अधिकार. भुकेलेल्या भूमिहीन शेजाऱ्याला जमीन दिली पाहिजे. प्रत्येकानें उत्पादक परिश्रम केले पाहिजेत. तेव्हा च जगात खातेनें समता स्थापन होईल.

उत्पादक श्रमाला प्रतिष्ठा मिळाली पाहिजे. जर हजार पांचशें वर्षांपूर्वी या धर्मविचाराचा प्रचार केला असता तर तो कोणीं ऐकला नसता. परंतु आजची परिस्थिति हा धर्मविचार ऐकायला आणि त्याचें अनुसरण करायला अनुकूल आहे. ही धर्मविचाराची शक्ति आणि वर्तमानपरिस्थितीची शक्ति या दोन शक्ति एकत्र झाल्या आहेत. बाहेरच्या परिस्थितीमुळें हा धर्मविचार हृदयावर सहज प्रभाव पाडूं लागला आहे आणि त्यामुळें हृदयांत परिवर्तन हि होऊं लागलें आहे. आणि हृदयपरिवर्तन झाल्याच्या योगानें तिचा बाहेरच्या परिस्थितीवर हि प्रकाश पडत आहे. अशी एकानें दुसऱ्यावर क्रिया-प्रतिक्रिया होत आहे, ज्याप्रमाणें फळापासून बीज आणि पुन्हा बीजापासून फळ तशी ही स्थिति आहे.

परंतु ही विचारधारा समाजांत व्यापक रीतीनें सुप्रतिष्ठित होण्याकरितां आणखी एका गोष्टीची जरूरी आहे. ती म्हणजे ह्या विचारधारेचा कोण प्रचार करीत आहे ही. एखाद्या व्यक्तीचें जीवन अत्यंत शुद्ध असेल तर ती व्यक्ति दुसऱ्याचें हि जीवन शुद्ध आणि उन्नत करूं शकते. जगामध्यें केवळ एक हि अत्यंत शुद्ध सत्याग्रही असेल तर त्याचा प्रभाव साऱ्या जगावर पडूं शकेल आणि साऱ्या जगाचें हृदय त्याच्या प्रभावानें विरघळून जाऊं शकेल. पण त्याच्या अंतःकरणांत साऱ्या दुनियेवर प्रेम असलें पाहिजे. आपल्यामध्यें मधूनमधून अशा लोकांनीं अवतार घेतला आहे. जगाचें कल्याण एवढें च त्याचें ध्येय, एवढी च त्याची इच्छा. त्याच्या जीवनांत दुसऱ्याचें दुःख सावरण्याकरितां आत्मत्यागाहून दुसरें कांहीं नाहीं. ज्याचें प्रेम सर्वव्यापी होऊन गेलें आहे, आणि जो 'आत्मौपम्यबुद्धि' संपन्न अर्थात् जो सर्व जीवांचें सुखदुःख तें आपलें च सुखदुःख असा अनुभव करतो आणि जो सर्वत्र समदर्शी आहे तो च खरा सत्याग्रही. अशा मनुष्याला आपण महापुरुष, महात्मा वगैरे शब्दांनी गौरवून आपल्या अंतःकरणांतली त्याच्याविषयींची श्रद्धा दाखवीत असतों. अशा मनुष्यानें आवाहन केल्यावर, त्याचें दर्शन झाल्यावर, त्याची वाणी कानावर पडल्यावर आपल्या अंतःकरणांतली त्यागवृत्ति वाढूं लागते, आमच्यांतली सुप्त शक्ति जागृत होते, आमच्यांत असलेल्या संकुचितपणाचें बंधन तुटून जातें आणि आमच्या अंतःकरणांतली क्षीण झालेली ज्योति उज्ज्वल व्हायला लागते. लोकांनीं जो विचार

ग्रहण करावा म्हणून असा माणूस जेव्हा आवाहन करतो तेव्हा लोकांच्या जीवनावर त्याचा सत्वर अपूर्व प्रभाव पडतो. त्याने लोकाना दुःखकष्ट सहन करण्याचें आवाहन केलें तर हजारों लोक त्याग करायला तयार होतात, लोककल्याणाकरिता पुढें सरतात आणि समाजात क्रांति घडवून आणतात. अशा तऱ्हेचा एक महापुरुष आपल्यामध्यें नुकता च होऊन गेला. त्याचें नाव म. गांधी. त्याच्या आवाहनानें सारा भारत त्यागाला आणि दुःख, कष्ट सहन करायला उभा राहिला. तो महापुरुष निघून गेला. आज तो च त्याचे सर्वश्रेष्ठ अनुयायी आचार्य विनोबा भावे यांच्या रूपानें पुन्हा अवतरला. म्हणून त्यांनीं प्रवर्तन केलेला विचार इतक्या थोड्या दिवसात सर्व वर्गांतले, सर्व थरातले लोक ग्रहण करीत आहेत. देशातल्या लहान मुलापर्यंत भूदान-यज्ञाचा संदेश पोंचला आहे थोड्या च दिवसात देशातल्या अनेक ठिकाणीं याची क्रांतिकारक हवा निर्माण झाली आहे. आमच्या महान् समस्येच्या मानानें अगदीं अल्प असली तरी अगदीं थोड्या दिवसात लोकांनीं प्रेमानें ४० लक्ष एकर जमीन त्यांच्या हातात सोंपविली आहे

या विषयाचें आणखी हि गंभीरपणें चिंतन आणि मनन करणें जरूर आहे ही जी महात्मा आणि महापुरुष यांची वर गोष्ट सांगितली ती सरासर पाहता काय आहे ? आत्मा अनंतगुणसंपन्न आहे. आत्मा अनंत-शक्तिपूर्ण आहे. काल आणि परिस्थितीनें उत्पन्न झालेल्या समस्या सोडविण्याकरिता एखादा गुण किंवा शक्ति याचा विकास होण्याची आवश्यकता असते. त्या शक्तीचा या गुणाचा पूर्वी आविर्भाव झालेला नसतो. जरूर पडते अशा वेळीं आत्म्याचा विकास घडून येतो, आणि मनुष्याच्या अंतःकरणात त्या शक्तीचा व गुणाचा उदय होतो. त्या शक्तीला अंत नाहीं. जेव्हा कारण पडेल तेव्हा आत्म्याच्या त्या वेळीं जरूर असलेल्या गुणाचा विकास होतो आणि समाजाचें कार्य चालू राहतें. आत्म्याचे जे गुण वा शक्ति आजपर्यंत प्रकट झाल्या आहेत तेवढ्या च अखेरच्या; त्यापेक्षा नवीन गुण किंवा शक्ति आढळणार नाहींत असें म्हणणें संकुचितता आणि अज्ञान यांचें द्योतक आहे आत्म्याचे गुण आणि शक्ति यांच्या आविर्भावाला च विनोबांनीं 'अवतार' असें नाव दिलें आहे. त्या युगपुरुषाच्या माध्यमातून हे गुण आणि शक्ति यांचा विकास आणि उदय होतो तो

वास्तविक अवतार नाहीं. तो निमित्तमात्र. विनोबा म्हणतात, " अवताराचा अर्थ हा कीं, मनुष्याच्या अंतःकरणात शक्तीचा आविर्भाव होणें. त्या ठिकाणीं सत्यनिष्ठा प्रकट व्हायची होती त्या ठिकाणीं तिनें रामचन्द्राचें रूप घेतलें. त्या ठिकाणीं निष्काम कर्मयोग प्रकाशित व्हावयाचा होता त्या ठिकाणीं तिनें श्रीकृष्णाचें रूप घेतलें. बुद्धामध्यें करुणेची मूर्ति अवतरली म्हणून आम्ही बुद्धाला अवतार मानतों. आम्ही इंद्रियांचे दास आहों म्हणून मनुष्याला च अवतार मानतों. इंद्रियांना ग्रहण करण्याकरिता कांहीं मूर्तींची आवश्यकता असते म्हणून मूर्ति निर्माण झाली. वास्तविकपणें राम, कृष्ण वा बुद्ध हे अवतार नाहींत. सत्यनिष्ठा, निष्काम कर्मयोग, भूतदया याचे अवतार त्या त्या क्षेत्रात झाले. त्या ठिकाणीं अशा प्रकारें मानवदेहाची शक्ति प्रकट झाली त्या ठिकाणीं च अवतार झाला. मानव त्याच्या मूर्तीची पूजा करू लागला. त्यामुळें उपासनेची सोय झाली. परंतु देह हा अवतार नाहीं. मानवाच्या अंतःकरणात प्रकट झालेली भावना ही च खरा अवतार. जसजसा आर्थिक, आध्यात्मिक विकास होत जाईल, तसतसा उत्तरोत्तर श्रेष्ठ अवताराचा आविर्भाव होऊं लागेल. ही च समाजविकासाची प्रक्रिया आहे. इंग्रजानें हिंदुस्थानात येऊन आपलें राज्य स्थापन केलें ही एक विचित्र गोष्ट दिसून येते. त्यानें सगळ्या देशाला नि शस्त्र केलें. तेव्हा त्याच्यापुढें एक समस्या उभी राहिली. एक तर देशानें कायमचें इंग्रजाचे गुलाम होऊन राहावें, नाहीं तर आपली शक्ति तरी प्रकट करावी, ज्या शक्तीच्या योगानें शस्त्रावाचून शस्त्राला तोंड देण्याची शक्यता व्हावी आणि देश स्वतंत्र व्हावा. परिस्थितीमुळें त्याचें प्रयोजन दिसून आलें तेव्हा अहिंसक प्रतिकार आणि सत्याग्रह याचा आविष्कार झाला. म. गांधी त्याचे निमित्तमात्र झाले. मीं कितीक वेळा म्हटलें आहे कीं, म. गांधी पुढें आले नसते तर त्याच्या ठिकाणीं आणखी कोणी तरी उभा राहिला असता. परंतु ह्या सत्याग्रहशक्तीचा आविष्कार झाला असता च असता. ह्या शक्तीच्या आविष्काराची आवश्यकता होती. कारण कालाची आणि परिस्थितीची ती मागणी होती. लोकांनीं पाहिलें कीं अहिंसा ही एक महान् शक्ति आहे, जिच्या साह्यानें एवढ्या मोठ्या साम्राज्यवादी राष्ट्राशीं सामना देणें शक्य झालें आणि इंग्रजाला हिंदुस्थान सोडून जावें लागलें. त्यामुळें एक चमत्कार घडून आला. अत्याचार करणारे

आणि त्याच्यावर अत्याचार झाला ते यांच्यामध्ये प्रेमाचा संबंध स्थापित झाला. अत्याचारी आता पुढें अत्याचारी राहिले नाहींत. दोघांमध्यें बंधुभाव स्थापन झाला. याप्रमाणें अहिंसा शक्ति प्रकट झाली आणि तिच्यामुळें आपल्याला स्वातंत्र्य प्राप्त झालें. स्वातंत्र्याकरिता अनेक देशांनीं अनेक तऱ्हेचे प्रयत्न केलेले आहेत पण अहिंसेचा प्रयत्न हा हिंदुस्थानचा विशेष आविष्कार आहे. कारण त्यामुळें मनुष्यहृदयातली नवीन शक्ति प्रकट झाली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आता हिंदुस्थानात आर्थिक स्वातंत्र्य आणि साम्ययोगस्थापना हें काम उपस्थित झालें आहे. याकरिता आर्थिक क्षेत्रात तदुपयोगी शक्ति प्रकट होणें जरूर आहे; आणि अशी शक्ति आज प्रकट होत आहे.” या शक्तीचें नाव ‘सर्वोदय’. सर्वोदयाच्या स्थापनेकरिता मौलिक शक्तीची जरूरी आहे. ती आज संत विनोबांच्या माध्यमातून विकास पावत आहे. येथें विनोबा निमित्तमात्र आहेत. म्हणून असें म्हणणें योग्य नाहीं कीं, जें आजपर्यंत झालें नाहीं तें यापुढें भविष्यकालीं कसें घडून येईल?

या विषयाचें आणखी एक प्रकारें विवरण करणें शक्य आहे. जेव्हा याप्रमाणें आत्म्याच्या शक्तीचा आविर्भाव होण्याचें प्रयोजन असतें तेथें परमेश्वर त्याकरिता एक मंत्र देत असतो. विनोबा म्हणतात, ‘या मंत्राचा अवतार हा च वास्तविक अवतार. ज्या विशिष्ट मनुष्याच्या माध्यमातून हा मंत्र फलद्रूप होतो त्याला आपण अवतार मानतों, परंतु वास्तविक पाहता तो निमित्तमात्र.’

जेव्हा असें दिसून आलें कीं, देशाच्या सर्व दुःखाचें मूळ पारतंत्र्य आहे, आणि केवळ लहान लहान दुःखें दूर करून भागणार नाहीं, तेव्हा दादाभाई नवरोजींनीं देशापुढें स्वराज्याचा मंत्र ठेविला. तेव्हापासून या मंत्राची साधना सुरू झाली. परंतु एक महान् शक्तिशाली राष्ट्र देशावर राज्य करीत होतें, त्याच्या हातीं शस्त्र होतें आणि त्यानें या देशाला निःशस्त्र करून टाकलें होतें. तेव्हा म. गांधींनीं सामुदायिक अहिंसेच्या पायावर ‘भारत छोडो’ या मंत्राचा उच्चार केला. तो मंत्र विराट् जनआंदोलनात परिणत झाला. सरकारनें तें दाबून टाकण्याकरिता शस्त्र हे

प्रयत्न केले वाटेल ती, हे आंदोलन दाबून टाकलें गेलें. परंतु खरें पाहता तसें झालें नव्हतें. मंत्र कधीं हि दाबला जात नाही. तो मंत्र पुन्हा शक्तिशाली होऊन प्रकट होतो सूर्याच्या किरणाप्रमाणें तो सर्व ठिकाणीं पोहोंचतो आणि सर्वांच्या हृदयात प्रवेश करतो. या ठिकाणीं हि तसें च घडलें. या महान् मंत्रोच्चारानें पाच वर्षांत इंग्रजांना भारत सोडावें लागलें. मंत्र फलद्रूप झाला आणि आम्हाला स्वराज्य मिळालें. एका मंत्राची पूर्तता झाली आणि परमेश्वरानें आम्हाला दुसरा मंत्र दिला आहे. समाजाचें कार्य याप्रमाणें चालतें.

अशा प्रकारें मंत्राच्या तत्वाचें विवरण करताना विनोबा म्हणतात, "परमेश्वराचें एक परमतत्व आहे. या तत्वापासून मंत्र स्फुरण पावतो. मंत्रापासून महापुरुषाना प्रेरणा मिळते, महापुरुषाच्या विचारापासून समाजाला चेतना मिळते, परमेश्वराची प्रेरणा हें च मंत्राचें मूळ. मंत्राच्या च रूपानें परमतत्व प्रकट होतें. एका अवताराचें कार्य पूर्ण होऊन गेल्यावर दुसरा अवतार होतो. त्यापासून त्या काळीं विश्वाला तेज प्राप्त होतें. ही ईश्वराची लीला आहे. श्रीरामचंद्राच्या काळीं एक मंत्र आला. कृष्णाच्या काळीं दुसरा, बुद्धाच्या काळीं तिसरा मंत्र आला. याप्रमाणें मंत्रामागून मंत्र प्राप्त होऊन पृथ्वीची उन्नति होत आली आहे

"एक मंत्र दुसऱ्या मंत्राला जन्म देऊन निघून जातो, ज्याप्रमाणें बीजापासून फळ आणि फळापासून बीज उत्पन्न होतें एक बीज लुप्त होऊन गेल्यावर आणखी एक बीज अंकुरित होतें. त्याप्रमाणें एक मंत्र पूर्ण झाल्यावर दुसरा मंत्र प्रकट होतो पृथ्वीवरील कोणती हि वस्तु नाश पावत नाहीं असा विज्ञानाचा सिद्धान्त आहे स्वराज्यमंत्ररूप अवताराची पूर्तता होऊन गेली तेव्हा म. गांधींनीं आणखी एक मंत्र देशाला दिला. तो मंत्र पूर्वी च तयार करून ठेविला होता. त्याचें नाव 'सर्वोदय'. त्या मंत्राचें बीज स्वराज्यआंदोलना मध्ये च पेरलें गेले होतें स्वराज्यप्राप्तीनंतर त्याला अंकुर फुटला आहे"

सर्वोदयाचे रूप विराट् आणि व्यापक आहे. त्याचा एकेक भाग घेऊन आपण काम करू शकतों भूमिसमस्या सर्वोदयाचा पाया आहे. आज विनोबांनीं भूदान यज्ञाचा मंत्र देशाला दिला आहे

## ( १३ ) भारतात आत्मज्ञानाचा विकास

या प्रसंगी आणखी एक विषय गंभीरपणे समजून घेतला पाहिजे. भूदान-यज्ञ हा सत्यावर आधारलेला एक महान् विचार या सिद्धान्त आहे; आणि तो विचार देशाच्या वर्तमान स्थितींत अत्यंत आवश्यक आहे, शिवाय अनुकूल आहे. शिवाय या भूदान-यज्ञाचा प्रवर्तक आणि प्रचारक एक आत्मत्यागी आणि विश्वप्रेमी सन्यासी महापुरुष आहे. हीं तीन कारणें एकत्रित झाल्या-मुळें इतक्या थोड्या दिवसात भूदान-यज्ञानी इतकी प्रगति झाली. नाहीं तर हें शक्य होतें काय? याशिवाय हें घडून येण्याला आणखी काहीं कारण आहे काय? होय, आहे. भारताच्या स्वभावात असें एक वैशिष्ट्य आहे कीं, त्यामुळें हिंदुस्थानातील सामान्य जनता भूदान-यज्ञाचें तत्त्व सहजपणें ग्रहण करू शकते. तो स्वभाव म्हणजे भारताचें हृदय. अर्थात् भारतीय लोकाचें अंतःकरण निर्मल आणि अविकृत आहे. म. गांधी असें म्हणत असत आणि विनोबा हि तसें च सांगतात त्यामुळें भूदान यज्ञाचा विचार सामान्य लोकाना इतक्या सहजपणें आणि इतक्या अल्प काळात समजावून देणें शक्य झालें, आणि इतक्या सहज त्यांच्या हृदयाला त्यानें स्पर्श केला. हृदय पवित्र आणि अविकृत असण्याचें लक्षण कोणतें? आपण आपल्या बुद्धीनें एखादा विषय समजू शकतों, परंतु एखादा सद्विचार समजल्यानंतर किंवा त्याच्यासंबधीं ज्ञान प्राप्त झाल्यानंतर लोक तदनुसार आचरण करीत नाहींत. ज्याचें हृदय स्वच्छ आणि निर्मळ आहे अशी व्यक्ति मात्र एखाद्या प्रश्नाचें ज्ञान प्राप्त झाल्यावर त्याबरोबर च तदनुरूप आचरण करू लागते. इतके दिवसपर्यंत ज्या कोणी व्यक्ति याप्रमाणें आचरण करीत नव्हत्या याचें एकमात्र कारण हें होतें कीं, आजपर्यंत याबद्दलचें त्याना ज्ञान नव्हतें. तेव्हा ते अज्ञानी होते. परंतु ज्याचें हृदय निर्मळ आणि स्वच्छ नाहीं अशा व्यक्ति त्याना समजावून दिल्यावर, त्यांची बुद्धि ती गोष्ट जरी समजली तरी ते तदनुरूप आचरण करू शकत नाहींत. या विषयाबद्दल त्यांचें जे ज्ञान असतें तें केवळ शाब्दिक ज्ञान असतें. असें ज्ञान त्यांच्या हृदयावर सहज प्रभाव करीत नाहीं. दुसरा हि आपल्याप्रमाणें च आहे असें पाहणें आणि त्याच्याशीं तदनुरूप आचरण करणें ही 'आत्मौपम्य' वृत्ति. शेजाऱ्याला आपल्या-

प्रमाणें पाहणें आणि त्याच्याशीं वागणें हें सर्वोदयाचें मूळ तत्त्व आहे. आणि ही च भूदान यज्ञाची प्रेरक भावना आहे. आपण आपल्या केवळ देहात च सीमाबद्ध आहों असें समजतो. पण तें बरोबर नाहीं. आपला शेजारी, एवढें च नव्हे तर सर्व समाज, आपलें च व्यापक रूप आहे असें मानणें हें सर्वोदयाचें सार आहे. साधारणपणें भारतीय मनुष्याचें हृदय निर्मळ आणि शुद्ध आहे. परंतु त्याचें आत्मज्ञान संकुचित राहिलेलें आहे. कारण त्याला आत्मज्ञानाच्या व्यापकतेचें शिक्षण दिलें गेलेलें नाहीं.

आपल्या ऋषिमुनींनीं व्यक्तिगत धर्मानें शिक्षण दिलें परंतु सामुदायिक धर्माचें शिक्षण दिलें नाहीं. म्हणून भारताचें हृदय स्वच्छ व निर्मळ असून हि भारतांकडून इतके दिवसपर्यंत सामुदायिक क्षेत्रात आत्मज्ञानाच्या धर्माचें आचरण करणें संभवनीय झालें नाहीं. विनोबा म्हणतात, "मी खेडोपाडीं जाऊन एक च गोष्ट समजावून देत आहें. तिचें सार हें कीं, आपल्याला देहापुरतें च मर्यादित समजू नका. हिंदुस्थानात अद्यापि तत्त्वानें वेदान्ताचा प्रचार कमी झालेला नाहीं. आत्मा सर्वव्यापक आहे ही गोष्ट तर देशातल्या सर्व लोकांच्या मुखीं आहे, परंतु शाब्दिक ज्ञान ही एक गोष्ट आणि त्या विचाराचें जीवनात आचरण ही दुसरी गोष्ट आहे. भारतात शाब्दिक ज्ञान इतकें दूर पोहोंचलें आहे कीं, केवळ मनुष्यात च नव्हे परंतु प्राणिमात्रात हि एक च आत्मा विराजमान आहे असें मानलें जातें. परंतु व्यवहारात आत्मा इतका संकुचित आहे कीं, आपण केवळ आपला च देह आणि त्याच्याशीं संबंधित आसस्वकीय लोक याहून भिन्न दुसऱ्या कोणाची चिंता करीत नाहीं. आचरणात भारताचें आत्मज्ञान इतकें संकुचित झालें आहे. आई आपल्या मुलाकरिता त्याग करते कारण ती आपल्या मुलामध्यें आपलें स्वरूप पाहते. तिचें आत्मज्ञान तिच्या मुलापर्यंत च मर्यादित असतें. आई आपल्या मुलावर प्रेम करते परंतु दुसऱ्याच्या मुलावर तिचें प्रेम असत नाहीं कारण त्या मुलामध्यें तिला आपल्या आत्म्याचा अनुभव येत नाहीं. ती तोंडानें आत्मज्ञानाच्या गोष्टी बोलेल, परंतु अनुभवात मात्र तिचा आत्मा तिच्या मुलापुरता च मर्यादित असतो. संस्कृतामध्यें मुलाला संतान किंवा संतति म्हणतात. संतति म्हणजे विस्तार. आई समजते कीं, आपलें संतान आपला च विस्तार आहे, आपलें च रूप आहे. एवढ्यापुरतें तिचें आत्मज्ञान

मर्यादित आहे, परतु यापुढें तिला असें ज्ञान होणें जरूर आहे कीं, आपलें रूप इतकें लहान नाहीं, तें व्यापक आहे." आज भूदान यज्ञाच्या मार्फत हिंदुस्थानातल्या लोकाना त्याच्या आत्मज्ञानाचा विस्तार करण्याचें शिक्षण मिळत आहे. आणि म्हणून ज्या ठिकाणीं अत्यत निष्ठेने कार्य झालें आहे त्या ठिकाणीं अतिशय लोकर भूदान यज्ञाचे तत्त्व अत करणापासून ग्रहण केलें गेलें आहे त्याच्या मागें म गाधींची विचारधारा जरूर आहे. खरोखर पाहता म गाधींनीं दिलेल्या शिक्षणाच्या पायावर च हे मदिर उभारलेलें आह

भारतात आत्मज्ञानाच्या विकासाबद्दल विनोबा पुढे म्हणतात, "माझी श्रद्धा अशी आहे कीं, आमच्या हृदयात काहीं बिघाड नाहीं तसें काहीं असतें तर भूदान यज्ञाचा इतका व्यापक प्रचार झाला नसता म्हणून मला वाटतें कीं, भारताचें हृदय स्वच्छ, शुद्ध आणि निर्मळ आह परतु आमचें आत्मज्ञान मात्र सकुचित होऊन गेलें आहे मुलाचें हृदय स्वच्छ आणि निर्मळ असतें, परतु त्याना ज्ञान असत नाहीं त्यामुळें ते दुसऱ्याला मारु देऊ शकतात. एखादें कुत्रें दुसऱ्या कुत्र्याच्या तोंडातून भाकरी काढून घेऊ शकतें कारण त्याचें आत्मज्ञान अत्यत सकुचित असतें. त्याला फक्त आपल्या देहाचें ज्ञान असतें, आत्म्याचें असत नाहीं. मुलाची हि अवस्था अशी च आहे केवळ खाण्याच्या गोष्टीपुरतें च मुलाचें ज्ञान. त्याचें हृदय निर्मळ असलें तरी त्याना आत्म्याचें ज्ञान नाहीं ज्या ठिकाणीं त्याना आत्म्याचें ज्ञान शिकवून दिलें जातें त्या ठिकाणीं ते सत्वर ग्रहण करू शकतात मीं पाहिलें आहे कीं, आपली वस्तु दुसऱ्याला दिली पाहिजे असें आत्मज्ञानाचें शिक्षण ज्या ठिकाणीं आईबाप आपल्या मुलाना देतात तेथें मुलाना दुसऱ्याला देण्यात आनद वाटतो. जन्म झाल्याबरोबर मूल देहापुरतें च मर्यादित असतें. देहापेक्षा अधिक मोठ्याची तें भावना करू शकत नाहीं, कारण त्याला आत्म्याचें ज्ञान असत नाहीं. परतु जेव्हा त्याला आत्म्याचे ज्ञान करून दिलें जातें तेव्हा मूल तें सहज ग्रहण करू शकतें त्याला सस्काराची आवश्यकता आहे. त्याप्रमाणे च भारताचें हृदय शुद्ध आणि निर्मळ आहे, परतु त्याला सस्काराची जरूरी आहे. भारतवासीयाना हें समजून देण्याची आवश्यकता आहे कीं, 'हे भाई हो, तुम्हीं आपल्याला देहापुरतें च मर्यादित राखलें आहे,

तें चूक आहे. सारा समाज आत्म्याचें व्यापक रूप आहे. आपली च संतति आहे ' ही गोष्ट समजून दिली तर लोक सहज समजून जातात असा माझा अनुभव आहे."

भारतीयाच्या आत्मज्ञानासंबंधीं विनोबांच्या दोन प्रवचनांतला भाग वर उद्धृत केला आहे. त्यामध्यें कांहीं दोष आहे, औचित्य नाहीं, असें कोणी म्हणणें शक्य आहे. तें असें कीं, विनोबा एके ठिकाणीं म्हणतात : " भारतात वेदान्ताचा प्रचार कमी नाहीं. आत्मा सर्वव्यापक आहे ही गोष्ट तर देशातल्या सर्व लोकांच्या मुखात आहे. केवळ मनुष्यामध्यें च नाहीं. तर प्राणिमात्रामध्यें एक च आत्मा विद्यमान आहे. परंतु तें केवळ शाब्दिक ज्ञान आहे म्हणून त्याचा हृदयावर प्रभाव पडत नाहीं." परंतु दुसऱ्या ठिकाणीं ते म्हणतात, " आमचें आत्मज्ञान संकुचित होऊन गेलें आहे, परंतु भारताचें हृदय स्वच्छ, शुद्ध आणि निर्मळ आहे म्हणून भूदान-यज्ञाच्या विचारामार्फत भारतातल्या सामान्य लोकांना आत्मज्ञानाचें शिक्षण देता च त्यांच्या हृदयावर त्याचा शीघ्र प्रभाव होत आहे. जरा गंभीरपणें समजून घेण्याचा प्रयत्न केला तर ह्या दोन्हींमधें कांहीं विरोध नाहीं असें दिसून येईल. आत्मा सर्वव्यापक आहे असें शिक्षण देणें वा ज्ञान होणें ही एक गोष्ट आणि या आदर्शानुरूप जीवनातल्या प्रत्येक क्षेत्रात आचरण करण्याचें शिक्षण देणें ही वेगळी गोष्ट आहे. आईनें केवळ मनुष्यात च नव्हे तर प्राणिमात्रात हि एक च आत्मा आहे असें आपल्या मुलाला शिक्षण दिलें तरी दुसऱ्या प्राण्याला त्रास देण्यात त्याला कांहीं वाटत नाहीं. परंतु आई जर मुलाला असें शिक्षण देईल कीं, आपला जिन्नस दुसऱ्याला दिल्याशिवाय खाऊ नये, तर मुलगा त्याप्रमाणें आचरण करूं लागतो. साधारणपणें महान् आध्यात्मिक ध्येयाचें शिक्षण दिलें तर मनुष्याला तें तो तोंडानें बोलू शकला वा मनात समजू शकला आणि त्याचें हृदय स्वच्छ, शुद्ध आणि निर्मळ असलें तरी तें ध्येय आपल्या जीवनाच्या व्यावहारिक क्षेत्रात आणण्याचें शिक्षण तो सहज घेऊ शकत नाहीं. आत्मज्ञानाचें महान् ध्येय कशा प्रकारें जीवनात आचरावें याचें शिक्षण देणें याचा च खरा अर्थ आत्मज्ञानाचें शिक्षण म्हणून भारतात वेदान्ताचा व्यापक प्रचार झालेला असून हि आणि भारताचें हृदय स्वच्छ आणि निर्मळ असून हि वेदान्ताचें

ज्ञान केवळ शाब्दिक राहिले. परंतु जेव्हा भूदान-यज्ञाच्या विचारामार्फत भूदान-यज्ञाच्या शिक्षणाचा प्रचार होऊ लागला त्याबरोबर तें आत्मज्ञान भारत इतक्या लौकर आणि इतक्या सहजपणें आपल्या व्यावहारिक जीवनात ग्रहण करू शकला.

## ( १४ ) क्रांतीच्या विकासाचा क्रम

क्रांतीचा तीन पायऱ्यानीं विकास होतो. प्रथम विचारात, नंतर शब्दात आणि शेवटीं आचरणात. आणखी हि तीन प्रकारानीं क्रांतीची परिणति घडत असते. ती प्रथम कोणा एखाद्या विशेष व्यक्तीच्या जीवनात, नंतर आणखी काही व्यक्तींच्या जीवनात आणि शेवटीं सर्व समाजात दृढपणें प्रस्थापित होते. अर्थात् प्रथम हृदय-परिवर्तन, नंतर जीवन परिवर्तन आणि शेवटीं समाज परिवर्तन होत असते. विनोबानीं त्यांच्या एका भाषणात यासंबंधीं फार सुंदर विवेचन केलें आहे : " कोणती हि क्रांति प्रथम विचारात घडून येते, नंतर ती शब्दानें प्रकाशित होते तेव्हा ती संकल्परूप असते आणि शेवटीं आचरणात तिचा विकास होतो. आचरण हि प्रथम व्यक्तिगत असतें आणि नंतर सामूहिक होतें, आणि शेवटीं त्याच्यावर सर्व समाजाची मोहर केली जाते. सर्व समाज त्याला मान्यता देतो. याप्रमाणें धर्मविचार प्रथम काहीं काहीं माणसाच्या चित्तात अंकुरित होतो आणि नंतर तो साऱ्या समाजाला मान्य होतो अथवा कायद्याच्या रूपानें त्याला कायमची प्रतिष्ठा प्राप्त होते. यापुढें तो विचार एक धर्मनिष्ठारूप मानला जातो व रूढीसारखा आचरणात येतो. मी एक उदाहरण देतों. आज चोरी करणें वाईट गोष्ट आहे असें मानलें जातें. सर्व समाज आणि कायदा हि त्याच्या विरोधी आहे. परंतु चोरीच्या विरुद्ध कायदा आहे म्हणून लोक चोरी करीत नाहींत असें नाहीं. चोरी करणं ही समाजविरोधी गोष्ट आहे असें माणसाच्या निर्मळ-बुद्धीनें मानलें आहे म्हणून च धर्मात आणि कायद्यात त्याला स्थान आहे. मुळात अशी विचारधारा नव्हती. परंतु जसजशी नीतिविचाराची स्थापना होऊं लागली तसतशी निष्ठा वाढू लागली. सामाजिक निष्ठेचें हें मीं एक उदाहरण दिलें आहे. याप्रमाणें च स्वतःच्या जरूरीपेक्षा ज्यास्त जमीन ठेवू

नये, जरूरीपेक्षा जास्त संग्रह करणें उचित नाहीं, ज्याप्रमाणें चोरी हें पाप आहे, त्याप्रमाणें अधिक संग्रह करणें पाप आहे, हा धर्मविचार आपल्यामध्यें प्रस्थापित केला पाहिजे. हा विचार नवीन नाहीं, फार पुरातन आहे. महर्षींनीं आपल्या जीवनात तो आचरिला आहे. हा विचार आपल्या व्यक्तिगत जीवनात ज्यांनीं आचरिला असे अनेक महात्मे आणि साधुसंत होऊन गेले. परंतु सामान्य लोकांत चोरीविरुद्ध जशी भावना आहे तितकी तीव्र आणि दृढ भावना संग्रहाविरुद्ध नाहीं. अशी मनोभावना आता निर्माण केली पाहिजे. म्हणून मीं या आंदोलनाला धर्मचक्रप्रवर्तन असें नाव दिलें आहे. यामुळें हा एक विचार सामाजिक क्षेत्रात प्रस्थापित होईल. असंग्रह म्हणजे अपरिग्रह हा केवळ ऋषि आणि साधुसंत्यांनी यानीं च आचरण्याचा गुण आहे असें मानलें गेलें आहे. पण आता सर्वसाधारण लोकांचा, गृहस्थादिकांचा तो मूलाधार झाला पाहिजे. त्याशिवाय कोणत्या हि रीतीनें शोषण नाहींसें करिता येणार नाहीं. हा धर्मविचार सामाजिक निष्ठा म्हणून स्थापित केला पाहिजे. त्याचा आरंभ विचारक्रांतीमधें आणि त्याची परिणति सामाजिक क्रांतीमधें होईल." याप्रमाणें शांतीच्या मार्गानें, सद्भावना जाग्रत करून, क्रांति घडवून आणणें हें भूदान यज्ञ आंदोलनाचें ध्येय आहे. ते म्हणतात, "मी ज्ञान आणि प्रेम दोघांना एकत्रित आणूं इच्छितों. त्यांना सूर्य आणि चंद्र म्हणता येईल. हे ईश्वराचे दोन डोळे आहेत. हे दोन्ही चक्षु एकत्रित झाले म्हणजे तेज परिपूर्ण होईल."

## (१५) भूदान यज्ञाचें मूलतत्त्व आणि सामुदायिक धर्म

हा च भूदान यज्ञाचा मूलगत सिद्धान्त आहे. सर्वोदयविचाराचें मूळ हि यात च आहे. हा अर्धवट विचार नाहीं. तो संपूर्ण जीवनाचा महान् सिद्धान्त आहे, आणि आचरणांत आणण्याचा उपाय हि आहे. थोडक्यात, वैदिक धर्माचें सार यामध्यें अंतर्भूत आहे. तें च सूत्ररूपानें ईशावास्य मंत्रात साठविलेलें आहे

> " ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ।
> तेन त्यक्तेन भुंजीथा मा गृधः कस्यस्विद् धनम् ॥ "

जगात जें काहीं आहे तें सर्व ईश्वराचें आहे. तो एकटा च काय तो मालक. हें जाणून आपलें जें काहीं आहे तें त्याला अर्पण केलें पाहिजे. आणि त्याच्याकडून जें काहीं मिळेल ते प्रसाद म्हणून घेऊन त्यावर संतुष्ट राहिलें पाहिजे. येथें आपलें काहीं नाहीं, सारें भगवताचे आहे, ही भावना जीवनात प्रतिष्ठित केली पाहिजे. जी व्यक्ति याप्रमाणें आपलें जीवन घालवू लागेल ती कोणाच्या हि धनाचा अभिलाष धरणार नाहीं. ईश्वरसमर्पण, जें प्राप्त होईल तें प्रसादस्वरूप ग्रहण, द्वेष न करणें, धनाची लालसा न करणें, हा एक स्वयपूर्ण धर्मविचार आहे, आणि तो साधनेचा हि उपाय आहे. याच्या योगें च सामुदायिक धर्मस्वरूपामधें समाजनिष्ठा स्थापना केली पाहिजे. आपल्या देशात अनेक साधुसंतानीं जन्म घेतला. त्यानीं ध्यान, जप वगैरेंचें शिक्षण आपल्याला दिलें. परंतु सामुदायिक धर्म काय याचें त्यानीं शिक्षण दिलें नाहीं. याबद्दल प्रजासमाजवादी पुढारी श्री. जयप्रकाश नारायण यानीं जें म्हटलें आहे त्याचा येथें उल्लेख करणें योग्य आहे. " आपण असा प्रश्न करू शकता कीं, तुम्हीं हा जो विषय मांडला आहे तो विषय ऋषि-मुनींनीं पुष्कळ आचरला आहे. परंतु त्यामुळें समाजात परिवर्तन का झालें नाहीं? त्याचें उत्तर असें : त्याचा सिद्धान्त एकांगी होता हें त्यांच्या असफलतेचें कारण आहे. त्यानीं केवळ व्यक्तीकडे पाहिलें. त्याना वाटलें कीं जी काहीं वाईट गोष्ट आहे ती व्यक्तीमधें च आहे. बुद्धाचें म्हणणें असें कीं, तृष्णा हें च दुःखाचें मूळ आहे. एका दृष्टीनें तें सत्य आहे. परंतु एक मुलगा राजाच्या घरीं जन्माला यावा आणि दुसरा गरिबाच्या घरीं जन्माला यावा याचें कारण तर तृष्णा नाहीं! म्हणून समाजवादी समाज-परिवर्तन करण्यावर आपण जास्त दृष्टि दिली पाहिजे. ऋषिमुनि सर्व काहीं अंत:करणात च आहे असें मानीत, आणि आपण सर्व काहीं बाहेरचें आहे असें मानतों. माझ्या मतें ह्या दोन्ही विचारात एकांगीपणाचा दोष आहे. ह्या दोन्हींचा समन्वय व्हावा अशी माझी इच्छा आहे. यातलें आपण एक हि सोडून दिलें तर उत्तम समाजरचना करणें शक्य नाहीं. दोन्हींचें ग्रहण केलें तर चागला समाज स्थापन करिता येणें शक्य आहे."

म. गांधींनीं देशाला सामुदायिक धर्म शिकविला. व्यक्तिगत आणि सामुदायिक जीवन हें एक आणि अविभाज्य आहे, हें समजावून देऊन अहिंसक समाजरचनेच्या ध्येयासाठीं देशाला तयार करण्याकरिता त्यांनीं विधायक कार्यांची व्यवस्था केली. जीवनाच्या एका क्षेत्रांत अहिंसा प्रतिष्ठित झाली तर ती दुसऱ्या क्षेत्रांत हि प्रसारित झाल्याशिवाय राहणार नाहीं. देशाचें स्वातंत्र्य मिळविण्याकरिता राजकीय क्षेत्रांत अहिंसेचा प्रयोग झाला. परंतु त्या वेळच्या विशेष परिस्थितीमुळें ती अहिंसा दुर्बलाची अहिंसा होती, लाचारीची अहिंसा होती. त्यामुळें राजकीय क्षेत्रांत अहिंसा प्रस्थापित झाली नाहीं. आज राजकीय क्षेत्रांत ती आचरण करण्याला अवकाश नाहीं. पण देश आणि काल यांच्या परिस्थितीमुळें भारतांत आर्थिक आणि सामाजिक क्षेत्रांत अहिंसेचा प्रयोग करण्याचा सुयोग आला आहे. गांधींच्या मागें या महान् कार्याचा भार परमेश्वरानें विनोबाजींच्यावर टेवला आहे.

आता प्रश्न असा कीं, हा सामुदायिक धर्म स्थापन करण्याचा उपाय काय ? आज सामान्य लोकांनीं निवडलेलें सरकार स्थापन झालेलें आहे. त्याच्यामार्फत हें महान् ध्येय गाठणें संभवनीय आहे का ? पूर्वीं च सांगितलें आहे कीं, हा धर्म समाजांत प्रस्थापित करावयाचा असेल तर विचार आणि आचार यांत महान् क्रांति झाली पाहिजे. विचारक्रांति किंवा निष्ठाक्रांति घडवून आणणें राज्यशक्तीला शक्य नाहीं. राज्यशक्ति अनुसरण करणारी मात्र असू शकते, समाजाला मार्गदर्शन करणारी असू शकत नाहीं. एखादी मौलिक भावधारा निर्माण करणें तिच्या शक्तीपलीकडचें आहे जेव्हा एखादा विचार मनुष्याची विवेकबुद्धि मानू लागते आणि तिचा आचार करू लागते तेव्हा च मात्र सरकार कायदा करून त्यावर आपला शिक्का मारू शकतें आणि दंड-शक्तीच्या बळानें त्याला सार्वजनिक कार्यांत परिणत करू शकतें. यासंबंधीं विनोबा म्हणतात, "विचार-प्रचार हें तर पुढाऱ्याचें आणि विचार-प्रवर्तकाचें काम आहे. क्रांतिकारक विचार जेव्हा लोक मानू लागतात तेव्हा च सरकार तो अमलांत आणण्याची व्यवस्था करू लागतें. आणि जर सरकार तसें करणार नाहीं तर एक सरकार जाऊन दुसरें सरकार येईल. शून्याचें जें मूल्य आहे त्यासारखें च मी सरकारला मूल्य देतो. जनशक्तीबरोबर राज्यशक्तीचा योग होतो तेव्हा सरकारची शक्ति मोठी होऊ शकते. जेव्हा

विचार सगळीकडे पसरून दृढ होतो तेव्हा त्या विचाराला अनुकूल अशी च राज्याची घडण होते. तसे झाले नाहीं तर क्रांति होते. मार्क्सचा विचार जेव्हा प्रसार पावला तेव्हा लेनिनच्या नेतृत्वाखालीं रशियामध्यें क्रांति घडून आली. रूसो आणि व्हॉल्टेअर यानीं प्रवर्तित केलेल्या विचारक्रांतीमुळें च फ्रान्समध्यें राज्यक्रांति झाली. माझी खात्री आहे, आमच्या विचारप्रणालीच्या पायावर लोकमत संघटित झालें कीं सरकार तो विचार मान्य करील च. जर करणार नाहीं तर सरकार खतम् होईल आणि त्याबद्दल मला दुःख वाटणार नाहीं."

## (१६) सर्वोदयप्रेमी लोकांचें कर्तव्य

कोणी कोणी विनोबाना विचारतात कीं, 'तुम्ही बाहेर का राहता? राज्य चालविण्याची जबाबदारी का पत्करीत नाहीं?' याच्या उत्तरात विनोबानीं एक सुंदर उपमा देऊन समजावून दिलें आहे कीं, "आमचें काम राज्यशक्तीच्या द्वारा साध्य होण्याचा संभव नाहीं. राज्य कोणत्या मार्गानें चालावें तो मार्ग सरकारला दाखवून देणें आणि त्या मार्गांतल्या अडचणी दूर करून तो मार्ग साफ करणे हें आमचें काम आहे. गाडीला दोन बैल जोडलेले असतात. मी जर तिसरा बैल होऊन तिला धक्का देऊ लागलों तर त्यामुळे गाडीची काय सोय होईल? त्यापेक्षा ज्या मार्गानें गाडी जाणें उचित आहे तो रस्ता जर मीं थोडा नीट करून दिला तर गाडीची मोठी सोय करून दिल्यासारखें होणार नाहीं का?" राज्यशक्तीला त्यानीं 'दण्डशक्ति' हें नाव दिलें आहे. विनोबा म्हणतात, "आज आमचें जें सरकार आहे त्याच्या हातीं आम्ही 'दण्डशक्ति' सोंपवून दिली आहे. हिंसा या दण्डशक्तीचा एक भाग होऊन राहिला आहे. तथापि आम्ही तिला हिंसा म्हणू इच्छीत नाहीं. या शक्तीला हिंसेपेक्षा वेगळ्या प्रकारात आम्ही ठेवू इच्छितों. आम्ही तिला हिंसाशक्तीहून भिन्न 'दण्डशक्ति' हें नाव देतों. कारण सर्व लोकानीं मिळून ही शक्ति सरकारला दिली आहे. म्हणून ती निव्वळ हिंसाशक्ति नाहीं, ती 'दण्डशक्ति' आहे."

## (१७) राज्यकर्त्यांची करुण अवस्था

देशातल्या राजकीय पुढाऱ्यांची अहिंसेवर श्रद्धा आहे हें विनोबाना मान्य आहे. त्यांचें हृदय अनुभव करितें कीं, अहिंसेशिवाय कोणती हि समस्या वास्तविकपणें सुटणें शक्य नाहीं. पण जेव्हां त्यांची बुद्धि विचार करूं लागते तेव्हां आपल्यावर असलेल्या जबाबदारीची गोष्ट मनात घेऊन अहिंसेवर निर्भर राहून चालण्याचें धैर्य त्याना होत नाहीं. बुद्धि सांगेल त्याप्रमाणें च ते काम करूं शकतात. त्यांची बुद्धि त्याना सांगते कीं, आम्ही सैन्यविसर्जन करून चालूं शकत नाहीं. आम्ही लोकांचे प्रतिनिधी आहों. लोकात अजून तितकी ताकद नाहीं. सैन्याशिवाय चालण्याची त्यांच्यात योग्यता नाहीं. म्हणून लोकाचे प्रतिनिधी या नात्यानें आम्हाला जबाबदारी वाटते कीं, 'आम्हीं सैन्य ठेवलें पाहिजे, वाढविलें पाहिजे, मजबूत केलें पाहिजे.' याप्रमाणें त्यांच्या हृदयाचा विश्वास एका वस्तूवर आहे आणि त्यांची परिस्थितीनें प्रभावित झालेली बुद्धि उलटी गोष्ट सांगत आहे. हृदय आणि बुद्धि यांच्या विरोधाच्या कैचींत सापडून असहाय झाल्यामुळें त्याना सैन्यबळाचा आश्रय घ्यावा लागला आहे. त्यांच्या हृदयाचा रचनात्मक कार्यावर विश्वास आहे, पण त्यांच्या बुद्धीला चरखा आणि इतर ग्रामोद्योग यांच्या द्वारा युद्धयंत्र मजबूत करिता येईल अशी खात्री वाटत नाहीं. ही त्यांची लबाडी नाहीं, शोचनीय अवस्था आहे. विनोबा म्हणतात, "आत्मनिरीक्षणपूर्वक मी असें म्हणतों कीं, जे आज जबाबदारीच्या जागेवर आहेत त्या जागेवर आम्ही असतों तर आज ते जें करीत आहेत त्यापेक्षा वेगळें कांहीं करू शकलों असतों असें नाहीं. हें स्थान च असें आहे. तें जादूचें आसन आहे. या आसनावर जो बसेल त्याजवर एका संकुचित, सीमाबद्ध, अस्वाभाविक कक्षेच्या दृष्टिकोणातून च विचार करण्याची जबाबदारी पडते. त्याला मीं परतंत्र म्हटलें आहे, त्या बद्धभूमींत पडल्यावर असहाय अवस्थेंत, दुनियेचा ओघ ज्या दिशेनें वाहत आहे असें दिसतें त्या दिशेकडे लक्ष देऊन च विचार करण्याची जबाबदारी त्यांच्या माथ्यावर पडते." या अवस्थेंतून सुटण्याचा उपाय काय? विनोबा म्हणतात, "आपल्या देशाचे पुढारी आम्हाला सांगतात कीं, 'आम्ही जें काम करीत आहों

तें तुम्हीं करण्याचें कारण नाहीं. त्यात तुम्ही अडकून पडूं नका. पण आम्हाला ज्याची उणीव भासत आहे ती जर तुम्ही पुरी करू शकत असाल तर तेवढें मात्र करा.' या आशेनें ते आमच्या मुखाकडे पाहत आहेत. ही गोष्ट आम्हीं नीटपणें समजून घेतली पाहिजे आणि या दृष्टीनें मी जिला 'जनशक्ति' म्हणतों ती 'स्वतंत्र जनशक्ति' ज्यायोगें निर्माण होईल तें काम सर्वस्व अर्पण करून आपण केलें पाहिजे. असें केलें तर च सरकारला मदत केल्यासारखें आणि देशाची योग्य सेवा केल्यासारखें होईल."

## (१८) दण्डनिरपेक्ष जनशक्ति

ही स्वतंत्र जनशक्ति काय आहे? ही राज्यशक्ति किंवा दंडशक्ति नाहीं. ही दंडशक्तीहून भिन्न आहे. शिवाय हिंसेच्या विरोधी आहे. विनोबांनीं चांडिल येथील सर्वोदय संमेलनाच्या आपल्या प्रथम भाषणांत या विषयाचें सविस्तर विवेचन केलें आहे. पूर्वीं म्हटलें च आहे कीं, क्रांति प्रथम विचारांत उदय पावते आणि शेवटीं ती कार्यान्वित होऊन तिची रूढ आचरणांत परिणति होते. शिवाय हें क्रांतिकार्याचें आचरण प्रथम विशेष व्यक्तीमध्यें मर्यादित असतें आणि तें शेवटीं सर्व समाजांत सामाजिक निष्ठा म्हणून प्रतिष्ठा पावतें. अर्थात् क्रांतीची ही शेवटची परिणति जेव्हा रूढ आचरणांत आणि सर्व समाजांत प्रतिष्ठित होते तेव्हा जनशक्ति प्रकट होते. शांतीच्या आणि प्रेमाच्या मार्गानें हें करणें शक्य आहे. ती केवळ समाजाच्या मनांत राहत नाहीं, तर रूढ सामाजिक निष्ठामूलक आचरणांत च ती प्रकट होते. अशा वेळीं तिचें सार्वजनिक क्षेत्रांत आचरण होण्याकरितां तिला कायद्याचा आधार लागत नाहीं. शांतीच्या मार्गानें, विचारप्रचार करून लोकांमध्यें अशी मनोवृत्ति निर्माण होईल कीं, जीमुळें कायदा असो वा नसो, लोकांची बुद्धि ती गोष्ट प्रमाण मानील. त्याप्रमाणें लोक आचरण करूं लागतील. लोक जमीन वाटून घेतील. म्हणून च विनोबा म्हणतात, "कांहीं कायदा आहे म्हणून का आई आपल्या मुलाला स्तनपान करीत असते!" त्यावरून आपण अहिंसक क्रांति किंवा जनशक्ति हिचें स्वरूप समजूं शकू. हिंसेला तर वाव च परंतु दंडशक्तीला हि अवकाश राहू नये अशी परिस्थिति समाजांत निर्माण केली पाहिजे. त्याकरिता प्रयत्न करणें सर्वोदयप्रेमी लोकांचें काम

आहे. विनोबा म्हणतात, "आम्ही जर हें करू तर आम्ही आमचा स्वधर्म ओळखूं शकलो आहों आणि तदनुसार आचरण हि करावयास शिकलों आहों असें आपल्याला समजून येईल. हें जर आम्हीं केलें नाहीं आणि दंडशक्तीच्या आधारावर जी कांहीं जनसेवा करितां येईल तिची लालसा धरली तर जें विशेष कार्य आमच्याकडून व्हावें अशी आशा केली जाते तें कार्य वा ती आशा आमच्याकडून पूर्ण होणार नाहीं. उलट आम्ही एक ओझें च होऊन बसू असा संभव आहे."

## (१९) समस्या सोडविण्यांत कायद्याचें स्थान

कायद्यानें जमिनीचा प्रश्न सोडविण्याच्या प्रश्नासंबधीं विनोबा म्हणतात, "अनेक लोक मला विचारतात, 'तुमचें सरकारवर वजन आहे असें दिसतें. तेव्हा सर्व अडचणी दूर करून भूमि-वितरणाचा मार्ग सरकारनें खुला करावा याकरितां तुम्ही सरकारवर वजन का आणीत नाहीं? तुमच्या प्रभावानें या दिशेनें प्रयोग का करीत नाहीं?' ह्याप्रमाणें पुष्कळ लोक मला विचारतात. त्यांना मी सांगू इच्छितों, भाई, कायद्याच्या मार्गांत मी आडकाठी तर आणीत नाहीं. तुम्ही इच्छिता त्या दिशेनें मीं जावें असें तुम्ही म्हणतां तेव्हा मी सांगतों कीं जो मार्ग मीं स्वीकारला आहे त्या मार्गानें मला पूर्ण यश, सोळा आणे फळ, मिळालें नाहीं आणि बारा आणे, आठ आणे मिळालें तर त्यामुळें हि कायदा करण्यास सुविधा मिळेल. एकपक्षीं प्रथमपासून च मी कायद्याला विरोध करीत नाहीं आणि दुसरेपक्षीं कायदा होण्याची मी सुविधा करून देत आहें. त्याकरितां मी अनुकूल हवा निर्माण करीत आहें कीं ज्यामुळें तो सहज अमलांत यावा. यापेक्षा एक हि जास्त पाऊल मी या दिशेनें पुढे टाकीन व वारंवार म्हणू लागेन कीं '*कायद्या-शिवाय हें काम होणार नाहीं*', '*कायद्याशिवाय हें काम होणार नाहीं*' तर मीं स्वधर्म सोडला असें म्हणावें लागेल. हा माझा धर्म नाहीं. उलट, माझा धर्म हा आहे कीं, *कायद्याशिवाय च जनतेच्या अंतःकरणांत मी अशी भावना निर्माण करूं शकेन कीं ज्यामुळें समजा हि कायदा झाला नाहीं तरी लोक आपआपसांत जमीन वाटून घेतील.* कोणत्या कायद्याच्या भयानें आई आपल्या मुलाला स्तनपान करिते? मनुष्याच्या हृदयांत अशी एक

होईल. विनोबा म्हणतात, “आमचा स्वधर्म असा आहे की, गावोगांवीं फिरून विचार सागणें आणि विचारावर च विश्वास राखणें. असा विचार ऐकून आणि ऐकवून कधीं काम होईल असें आम्हीं म्हणत नाहीं. अतःकरणात विचार असेल तर च कार्य होईल. कारण आमचें कार्य विचाराच्या योगें च होण्यासारखें आहे.” दडनिरपेक्ष विचार-प्रचारानें च जनशक्ति जाग्रत करण्याच्या कामाला विनोबानीं नाव दिलें आहे ‘ विचार-शासन. ’

ज्याना सर्वोदयाची ही दृष्टि मान्य नाहीं त्यानें म्हणणें मानून कायद्या-शिवाय जमिनीचा प्रश्न सुटणार नाहीं, कायदा केला च पाहिजे, असें म्हटलें, तरी आता च योग्य कायदा अमलात आणणें शक्य आहे का ? प्रथम पश्चिम बगालचा प्रश्न घेऊ. प. बगालमध्यें जमीनदारी नाहींशी करण्याचा कायदा केला गेला आहे. आणि जमीन एका निर्दिष्ट प्रमाणात सध्याच्या मालकाच्या हातात ठेवून उरलेली जमीन सरकारनें काढून घेण्याचें कायद्यानें ठरविलें आहे. सरकारला वाटलें, या कायद्यामुळें चार लक्ष एकर शेतीला योग्य अशी जमीन भूमिहीनाना वाटण्याकरिता सरकारच्या ताब्यात मिळेल. परतु इकडे जमिनींच्या मालकानीं कायदा चुकविण्याकरिता ठरलेल्या सीलिंगपेक्षा आपल्याजवळ ज्यास्त असलेली जमीन आपल्या नातेवाइकाच्या नावावर करून टाकली. याप्रमाणें हस्तातर बद करण्याकरिता सरकारला दुसरा कायदा करावा लागला. परतु हें हस्तातर बद करणें शक्य झालें नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें चार लक्ष एकर जमीन सरकारच्या हातात येण्याची आशा राहिली नाहीं. सरकारला हि तशी शका वाटते. काहीं असो, आपण असें धरून चालू कीं, सरकारच्या हातात चार लक्ष एकर जमीन भूमिहीनात वाटण्याकरिता मिळेल. तरी त्यामुळें काय होणार आहे ? सध्याच्या खानेसुमारीप्रमाणें प. बगालमध्यें शेतीवर उपजीविका करणाऱ्या लोकाची सख्या सुमारें १ कोटि ४० लक्ष ५० हजार आहे. त्यात भूमिहीनाची सख्या ६० लाखाहून थोडी अधिक आहे. हें सोडून ज्याच्याजवळ ५ बिघ्यापेक्षा कमी जमीन आहे त्याची हि भूमिहीन दरिद्री लोकात च गणना करणें योग्य आहे. चार लक्ष एकर जमीन घेऊन यातल्या किती जणाना जमीन देता येईल ? प. बगालमध्यें शेती करण्यायोग्य जमीन एकूण १ कोटि

४६ लक्ष एकर आहे. साधारणपणें अनुमान केलें आहे कीं, एकूण जमिनीच्या $\frac{1}{६}$ जमीन मिळेल तर भूमिहीनांना कांहीं थोडी जमीन देता येईल. या हिशोबानें प. बंगालमध्यें २५ लक्ष एकर जमिनीची जरूरी आहे. म्हणून प. बंगालजवळ भूदान-यज्ञाची प्रेमाची मागणी २५ लक्ष एकराची आहे. कायद्यानें का हीं २५ लक्ष एकर जमीन मिळण्याचा संभव आहे? सध्याच्या परिस्थितींत असा संभव नाहीं. परंतु पुष्कळांना वाटतें कीं, सरकार मनांत आणील तर अधिक कडक कायदा करून २५ लक्ष एकर जमीन आपल्या ताब्यात घेऊं शकेल. त्याचें म्हणणें मान्य केलें तर २५ लक्ष एकर जमिनीकरितां एकराला कमीतकमी ६०० रु धरले तरी एकूण १५० कोटि रु. नुकसानभरपाई द्यावी लागेल. इतका पैसा देण्याची आज सरकारची स्थिति नाहीं, आणि निकटच्या भविष्यकाळांत होण्याचा संभव हि नाहीं. सर्व हिंदुस्थानांत भूमिहीनांकरितां ५ कोटि एकर जमिनीची जरूरी आहे, हें पूर्वी च सांगितलें आहे. त्या पांच कोटि एकर जमिनीला नुकसानभरपाई देणें सरकारला शक्य नाहीं. तेव्हां आतां प्रश्न असा कीं, नुकसानभरपाई न देतां इतकी जमीन काढून घेणें सरकारला आतां च किंवा निकटच्या भविष्यांत शक्य आहे का? शिवाय याकरितां केंद्र सरकारच्या कायद्यांत बदल करणें अवश्य आहे. सध्याची समाजव्यवस्था व्यक्तिगत संपत्तीच्या पायावर उभारलेली आहे. जोंपर्यंत समाजाला व्यक्तिगत मालकी असणें हें योग्य नाहीं असें शिक्षण मिळालें नाहीं तोंपर्यंत कायद्यांत फेर

यावर आधारलेला विचार च, मात्र अशा तऱ्हेची विचारक्रांति वह शकतो. दुसऱ्या पद्धतीनें हि त शक्य नाहीं हिंसात्मक उपायानें जमीन काढून घेण्याचा प्रचार किंवा आंदोलन चालविलें तर त्यामुळें भीति उत्पन्न होईल, परंतु विचारक्रांति घडून येणार नाहीं कायदा करण्याची भीति दाखविली किंवा कायदा केला तरी विचारक्रांति होत नाहीं म्हणून कायद्यानें भरपाई न देता जमिनीच्या पुनर्वितरणाची व्यवस्था करायची असेल तरी त्याकरिता हि भूदान यज्ञ हा च एकमात्र मार्ग आहे त्यानें च कायदा करण्याकरिता योग्य नैतिक हवा निर्माण करता येईल

म्हणून जमिनीचा प्रश्न सोडविण्याकरिता कायदा करणं यावरोबर भूदान-यज्ञाची तुलना केली तर आपल्याला असें समजून येईल कीं —

( १ ) सरकार कायद्याच्या बळावर जमीन काढून घेऊ शकेल, परंतु अशी जमीन घेण्यानें मनुष्याच्या मनात प्रेम उत्पन्न होणार नाहीं

( २ ) भूदान यज्ञामुळें हृदयाचं मीलन होईल कायद्यानें असं होणें शक्य नाहीं, उलट त्यामुळें कटुता वाढेल

( ३ ) भूदान यज्ञाच्या द्वारें जनतेची शक्ति जागृत होईल आणि त्यामुळें समाज सर्वोत्तम क्रांतीच्या मार्गावर पुढें पाऊल टाकील कायदा अशी जागृति करू शकत नाहीं.

श्री दादा धर्माधिकारी यांनीं आपल्या ‘ क्रांतीचा मार्ग ’ या पुस्तकात कायद्याच्या या अक्षमतेसंबंधीं कांहीं सुंदर उदाहरणें दिलीं आहेत " आमच्या कायद्यानें विजयालक्ष्मी, राजकुमारी अमृत कौर किंवा सुचेता कृपलानी यांना जितका आहे किंवा सरोजिनीदेवींना होता तितका अधिकार दिला आहे परंतु आपण प्रत्यक्ष काय पाहतों ? देशातल्या असंख्य स्त्रियांना घराच्या दाराबाहेर पडता येत नाहीं, आणि बाहेर पडल्या च तर घोंगटा किंवा बुरखा घ्यावा लागतो कायदा त्यांना अधिकार देतो खरा, परंतु शक्ति देऊ शकत नाहीं. अस्पृश्यांची हि अवस्था तशी च आहे कागदात अस्पृश्यता नाहींशी झाली आहे, परंतु वास्तव जीवनात अस्पृश्यता आहे तशी च आहे कायद्यानें दारूबंदी केली आहे परंतु मद्यपान चाललें आहे च "

(४) भूदान-यज्ञ समाजात विचारक्रांति निर्माण करील. मालकींचे विसर्जन हे भूदान यज्ञाचें क्रांतिकारी मुफल आहे. कायद्यानें जमीन घेऊं शकलो तरी मालकी विसर्जन करण्याची मनोवृत्ति उत्पन्न होण्याचा संभव नाहीं. कारण कायद्यात विधायक शक्ति असत नाहीं. ज्यास्तींत ज्यास्ती कायदा वाईट कामाचा निरोध करू शकतो, परतु सत्प्रेरणा जागृत करणें कायद्याला शक्य नाहीं.

(५) भूदान-यज्ञात गरीब, श्रीमत सर्वांकडून च जमीन मिळविली जाते, परतु कायदा ठरविलेल्या सीलिंगपेक्षा ज्यास्त असलेली जमीन मात्र च घेऊं शकतो.

भूदान यज्ञाला कायदा नको आहे. भूदान यज्ञ श्रीमत मनुष्याला शेजार-धर्माची दीक्षा देतो, त्याच्या आत्मज्ञानाचा विकास घडवून आणतो आणि त्याच्या आत्म्याला आपल्या कुटुंबाच्या सीमेच्या बाहेर समप्रसारित करतो. त्याच्या आत्म्याचा त्याच्या कुटुंबाचे बाहेर विस्तार करतो. श्रीमत मनुष्याला त्याच्या कुटुंबाच्या बाहेर जे दरिद्री आहेत त्याना आपल्या कुटुंबाचे ते भागीदार आहेत असें मानायला लावू लागतो. त्याच्या कुटुंबाच्या बाहेर जे भूमिहीन दरिद्री आहेत त्याना आपले मुलमें मानावेत आणि त्याना त्याचा हक द्यावा अशी प्रेरणा करतो. आई जेव्हा आपल्या बाळाला उचलून घेते तेव्हा तिला थोडें वाकावे लागते. आज श्रीमतानीं आपल्या भूमिहीन दरिद्री मुलाला उचलून कडेवर घ्यावें याकरिता त्यानीं हि थोडें वाकले पाहिजे. अर्थात् आपलें जीवनमान काहीं अशीं कमी केलें पाहिजे. युगपरिवर्तन होत आहे. श्रीमत लोकानी कालाचा इशारा समजून घ्यावा. आज गरीब लोकाच्या अत:करणातला भगवान् जागा होत आहे. या युगात जमीन श्रीमताच्या हातातून गरिबाच्या हातीं जाणार च आहे. प्रश्न असा आहे कीं, कोणच्या मार्गानें ती जावी? आज प्रेमाच्या मार्गानें, शातीच्या मार्गानें, श्रीमत जर आपली जमीन गरिबाकरितां अर्पण करतील तर आईला आपल्या मुलाला स्तनपान देताना जो परमानंदाचा अनुभव होतो तो च अनुभव श्रीमताना हि गरिबाकरिता भूमि देताना होऊं लागेल व श्रीमताचा सन्मान आणि गौरव याचें रक्षण होईल. एवढें च नाहीं तर त्याची प्रतिष्ठा वाढेल आणि ते समाजाचे खरे सेवक आणि पुढारी होऊं शकतील. श्रीमता-

जवळ विद्या आहे, बुद्धि आहे, विचार करण्याची शक्ति आहे. आज ते समाजाची सेवा करीत नाहींत. त्यांची बुद्धि आणि हृदय या त्यागानें पवित्र होऊं देत. तेव्हां च ती सेवा देवपूजेंतली श्रेष्ठ अर्घ्यें होईल. अशा युग-परिवर्तनात त्यांच्याजवळ जास्त जमीन आणि संपत्ति राहणार नाहीं. आज जे राजे आहेत ते कालप्रवाहाच्या ओघात बाह्यतः राजे राहणार नाहींत तरी ते लोकांच्या अंत:करणात राजर्षि म्हणून च चिरकाल विराजमान होतील. त्यामुळें त्याचें कल्याण होईल आणि सर्व समाजाचें हि कल्याण साधेल. आज गरीब भूमिहीन धुळींत लोळत आहेत. श्रीमंतानीं स्वेच्छेनें त्याग केला तर गरिबाना हि समाजात मानाचें स्थान लाभेल. समाजात द्वेषरहित उत्पादक श्रमाची प्रतिष्ठा स्थापित होईल. श्रीमंताना हि त्यागधर्माची दीक्षा मिळून लोकहृदयात मानाचें श्रेष्ठ आसन मिळेल हा च भूदान यज्ञाचा मुख्य उद्देश आणि ध्येय आहे.

## (२०) दारिद्र्याचें मूळ

समाजात दारिद्र्य का आहे ? समाजात दारिद्र्य, शोषण आणि विषमता आहे त्याचें मूळ कोठें आहे ? उत्पादनाचा मुख्य आधार, साधन आणि यंत्र या सर्वांवर उत्पादन करणाऱ्याचा पूर्ण अधिकार आणि मालकी असली पाहिजे. नाहीं तर त्याला उत्पादक श्रम करण्याची संधि मिळत नाहीं. किंवा त्याच्या श्रमानें उत्पन्न झालेल्या संपत्तीपासून तो वंचित केला जातो. जमीन ही उत्पादनाचें मौलिक साधन या क्षेत्र आहे. जो माणूस आपल्या हाताने शेती करून जमिनींतून पीक काढील त्याला जमिनीवर अधिकार असला पाहिजे. जो कुशल मजूर यंत्राच्या साह्याने वस्तु निर्माण करतो त्या यंत्रावर त्या मजुराचा अधिकार असला पाहिजे. यंत्र त्याच्या ताब्यात असलें पाहिजे. हा स्वाभाविक आणि योग्य नियम आहे. जोंपर्यंत हा नियम योग्यपणें पाळला जात होता तोंपर्यंत सर्वजण श्रम करीत आणि सर्वजण धर्मपालन हि करीत. कोणाचें हि शोषण होत नव्हतें आणि कोणी हि दरिद्री नव्हता आणि कोणी अफाट श्रीमंत हि नव्हता. जेव्हांपासून हा नियम मोडायला सुरुवात झाली तेव्हांपासून समाजात शोषण, दारिद्र्य आणि विषमता यांचा प्रवेश झाला. अर्थात्

उत्पादनाचें मौलिक साधन जी भूमि, ती जोंपर्यंत शेतात राबणाऱ्या शेतकऱ्याच्या हातात होती, तोंपर्यंत शेतकरी दरिद्री नव्हता. जेव्हा ती तिसऱ्या अनुत्पादक माणसाच्या हातीं गेली, तेव्हा पीक उत्पन्न करणारा शेतकरी असहाय आणि परावलंबी झाला. या अवस्थेंत त्याला त्रास देणाऱ्या शोषकापुढें मान वाकवावी लागली. नाहीं तर त्याला बेकार आणि उपाशी बसावें लागलें असतें. तेव्हापासून त्याला त्याच्या श्रमानें निर्माण झालेल्या सर्व संपत्तीचा भोग करणें शक्य राहिलें नाहीं. थोडासा अंशमात्र च त्याच्या पदरात आला. त्याच्या श्रमानें उत्पन्न झालेल्या संपत्तीचा अधिकांश भाग श्रीमंत मालक आत्मसात् करूं लागले. कारखान्यातल्या उत्पादनक्षेत्रात हि अशी च अवस्था झाली. जोंपर्यंत त्याला लागणाऱ्या वस्त्राकरिता सूत उत्पादन करण्याचें यंत्र— चरखा— त्याच्या च हातात होतें तोंपर्यंत शोषण आणि दारिद्र्य नव्हतें. जेव्हापासून तो चरखा मोठ्या कारखान्याच्या स्वरूपात अनुत्पादक धनिक भांडवलदाराच्या हातात गेला तेव्हापासून बेकारी, दारिद्र्य आणि शोषण होऊं लागलें. जोंपर्यंत वस्त्र-उत्पादनाचें यंत्र, माग उत्पादक विणकराच्या हातात होतें तोंपर्यंत दारिद्र्य आणि शोषण नव्हतें. जेव्हा तो माग मोठ्या कापडगिरणीच्या आकारानें अनुत्पादक भांडवलदाराच्या ताब्यात गेला तेव्हा खेड्यात बेकारी आणि दारिद्र्याची निर्मिति झाली. जोंपर्यंत तेल उत्पन्न करायचें यंत्र—घाणी —ग्रामीण तेल्याचे हातात होतें तोंपर्यंत दारिद्र्य नव्हतें. जेव्हा यंत्रानें मोठ्या तेलाच्या गिरणीचा आकार धारण करून तें श्रीमंत गिरणीवाल्याच्या ताब्यात गेलें तेव्हा खेड्यात बेकार दरिद्र्याची संख्या वाढली. जोंपर्यंत भात भरडण्याचें यंत्र—चिरट—गावातल्या विधवा बाईच्या, लहान शेतकऱ्याच्या, अधीन होतें तोंपर्यंत त्याना वेळ मिळेल तेव्हा तें यंत्र काम देई. आणि तोंपर्यंत गावात अभाव आणि उपजीविकेच्या साधनाची वाण नव्हती. जेव्हा ही चिरट लहान-मोठ्या तांदळाच्या गिरण्यांच्या रूपानें अनुत्पादक श्रीमंत आणि मध्यम वर्गाच्या हातात जाण्यास सुरुवात झाली तेव्हापासून त्या विधवा बाईच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहिलेल्या दिसूं लागल्या आणि गरीब शेतकऱ्याचें मन—हृदय—भग्न झालें. अशा तऱ्हेचीं अनेक उदाहरणें देता येतील.

आमच्या देशाची काय अवस्था आहे? ग्रामोद्योग प्रायः सर्व हि नाश पावले आहेत. मजूर कारागीर अगदीं च थोडे उरले आहेत. आणि त्याना हि आपल्या उद्योगातून पोट भरणें कठीण झालें आहे. म्हणून ग्रामोद्योगानें ज्यांची उपजीविका होत होती त्याचा अधिकाधिक उत्तरोत्तर भार जमिनीवर च पडत आहे. उलटपक्षीं वन्याचदश शेतकऱ्याची जमिनीवरील मालकी गेली आहे व उरलेल्याची जात चालली आहे. जमीन अतिशय वेगानें थोड्या च अनुत्पादक श्रीमन् लोकाच्या हाती केंद्रित झाली व होत आहे. देशातली दुसरी हि धनसंपत्ति अल्पसंख्य धनिक भांडवलदाराच्या हातीं केंद्रित झाली आहे. परिणामतः बेकार आणि दरिद्री याची अवस्था पराकोटीला गेली आहे. दारिद्य आणि उपजीविका मिळविण्याचे साधनाचा अभाव यामुळें खेड्यातल्या सामान्य लोकाची अवस्था कठीण झाली आहे; आणि त्यांची क्रयशक्ति कमी झाल्यामुळें दुष्काळ ही च नेहमींची अवस्था होऊन राहिली आहे.

## (२१) महाराष्ट्रांतील शेती व भूदान-यज्ञ

महाराष्ट्रात, म्हणजे मुंबई राज्यातील मराठीभाषिक बारा जिल्ह्यात, मुख्यत: रयतवारी धारा पद्धति आहे. त्यामुळें महाराष्ट्रात शेत-जमिनीची विषम प्रमाणात विभागणी नाहीं. स्वत: शेती न करणारे जमीन मालक फारसे नाहींत असा कित्येक जाणत्या मंडळींचा हि गैरसमज आहे. म्हणून महाराष्ट्रात भूदान-यज्ञाला वाव नाहीं अशा भ्रमात वावरणारे बरे च बुद्धिमान् लोक महाराष्ट्रात आढळतात. याबाबत वस्तुस्थिति काय आहे ती समजून घेतली पाहिजे, म्हणजे वरील भ्रम दूर होईल.

महाराष्ट्रात ५० लाख एकर जमीन कुळाना खंडानें लावलेली आहे. म्हणजे तीस टक्के जमिनीवर गैरहजर मालकी (ॲब्सेंटी ओनरशिप) आहे. १०० एकराहून जास्त जमिनीचे मालक महाराष्ट्रात दहा हजारावर असून ते १६ लाख एकर जमिनीचे धनी आहेत. यापैकीं ५० टक्के जमीन तरी या बड्या मालकानीं कुळाना खंडानें लावलेली आहे. तीनपंचमांश टक्के लोक ९ टक्के जमिनीचे मालक आहेत. ११ टक्के लोकाच्याकडे ५८ टक्के जमीन

तर ९ टक्के लोकाकडे ४२ टक्के जमीन, अशी महाराष्ट्रांतील जमिनीच्या मालकीची विभागणी आहे.

आता लोकसंख्येच्या दृष्टीनें पाहिलें तर खेड्यांतील २५ लाख कुटुंबापैकीं शेतीव्यवसायातील कुटुंबें १९ लाख असून त्यापैकीं ७ लाख कुटुंबे शेतमजुरीवर गुजराण करतात. यापैकीं ३ लाख कुटुंबाना तर तसूभर हि जमीन नाहीं दुसऱ्याच्या शेतावर काम मिळेल तर राबावें, नाहीं तर उपासमार असा त्यांचेबाबत प्रकार आहे. या शेतमजुराना काम मिळवून देण्याचा प्रश्न यापुढें असा च दुर्लक्षित ठेवण्यात सामाजिक व राजकीय दृष्टीनें धोका आहे हें कोणा हि विचारवंतास कबूल करावें लागेल.

ज्याच्यापाशीं जास्त आहे त्यानीं ज्याच्यापाशीं मुळीं च नाहीं त्याना द्यावें. त्यामुळें समाजात कुटुंबभावना निर्माण होऊन सर्वांचें जीवन सुसंघ व्हावें असें भूदान यज्ञाचें तात्कालिक लक्ष्य आहे. ज्याच्यापाशीं जास्त नाहीं, बेताचें च आहे, त्यानीं हि ज्याना मुळीं च नाहीं त्याना देण्यानें कौटुंबिक भावना निर्माण होण्यास मदत होईल.

अशा प्रकारें महाराष्ट्रात जमिनीची विषम विभागणी आणि जमीन नसलेले पण जमिनीची गरज असलेले लोक या दोन्ही गोष्टींची कमतरता नसल्यामुळें भूदान यज्ञाची गरज महाराष्ट्रात हि आहे याबद्दल कोणीं हि शंका बाळगण्याचें कारण नाहीं

प्रत्येकीं पाच एकर जमीन दे यानें किफायतशीर तुकड्याच्या संख्येंत भर पडणार नाहीं काय असा हि आक्षेप आहे. महाराष्ट्रात आज पाच एकराहून कमी जमीन असलेले शेतकरी ९ लाख असून त्याच्याकडे २५ लाख एकर जमीन आहे. ५२ टक्के शेतकरी प्रत्येकीं सरासरी अडीच एकर जमीन कसतात हा त्याचा अर्थ आहे यातील काहीं शेतकरी एकाहून अधिक छोटे तुकडे कसीत असतील व काहींजण छोट्या तुकड्यावरील शेतीस जोडून काहीं अन्य व्यवसाय करीत असतील.

महाराष्ट्राची लोकसंख्या १ कोटि ६५ लाख असून त्यापैकीं ग्रामीण लोकसंख्या १ कोटि २३ लाख आहे. एकूण क्षेत्र ३ कोटि ६० लक्ष एकर असून त्यापैकीं लागवडीखालील क्षेत्र १ कोटि ८२ लाख एकर

आहे. देशातील लोकसंख्येच्या दरडोई सवा एकर अशी जमिनीची सरासरी पडते. ५ माणसांच्या एका कुटुंबाला ६ एकराहून ज्यास्त जमीन वांट्यास येत च नाहीं. अन्नधान्यें व कडधान्यें यांखालीं १ कोटि ५२ लाख एकर जमीन आहे. पाउसमान बऱ्यापैकीं असेल त्या वर्षीं या जमिनींतून २५ लाख टन धान्य पैदा होतें. ६ एकरांत १ टन धान्य असें प्रमाण पडतें. रोज माणशीं १ पौंड या हिशेबानें ६ जणांस एक टन धान्य लागतें. महाराष्ट्रांतील जमिनीचा सरासरी मगदूर लक्षांत घेतां केवळ उदरपूर्तीसाठीं ५ माणसांच्या एका कुटुंबास ६ एकर कोरडवाहू जमीन लागेल.

अमुक क्षेत्र असलें म्हणजे ती जमीन परवडण्यासारखी असते असें ठोकळेबाज उत्तर देणें कठीण आहे. जमिनींतील मातीचा दर्जा, पाऊस-मानाचें प्रमाण व हवामशीरपणा, पाणीपुरवठा इत्यादि गोष्टींचा त्यांत विचार करावा लागतो. कोरडवाहू ५ एकर किंवा बागाईत १ एकर जमीन एका भूमिहीन कुटुंबास देण्याची भूदान यज्ञांत योजना आहे. देशांतील नैसर्गिक साधनसंपत्ति व मनुष्यबळ यांचा मेळ घालण्याचा त्यांत प्रामुख्यानें विचार आहे हें ध्यानांत घेतलें पाहिजे. संपत्ति उत्पादनाच्या उपलब्ध असलेल्या नैसर्गिक साधनांचें लोकसंख्येच्या प्रमाणांत समान व न्यायोचित विभाजन करून बेकारी व उपासमार टाळणें, क्रयशक्तीची अधिक चांगल्या प्रकारें विभागणी करून पर्यायानें देशाच्या अर्थनंद्याला सुस्थिरता प्राप्त करून देणें हीं उद्दिष्टें भूदान यज्ञानें साध्य होण्यासारखीं आहेत.

कोंकण, मावळ व देश अशा महाराष्ट्राच्या तीन टप्प्यांत अनुक्रमें १०, २० व ३० एकर जमीन हें परवडण्यासारखें क्षेत्र (Economic holding) होईल असें तज्ज्ञांचें मत आहे. या हिशेबानें पाहिल्यास आज फक्त २० टक्के लोकांकडे च असें क्षेत्र आहे. प्रत्येक कुटुंबास २० एकर जमीन द्यायची म्हटल्यास फक्त ९ लाख कुटुंबांची सोय लागू शकेल. मग बाकीच्यांचें काय? परवडण्याइतकें क्षेत्र ही कसोटी ठेवणें च अशक्य आहे.

जमिनीचा मगदूर सुधारणें, बांधबंदिस्ती व छोट्या छोट्या पाणीपुरवठ्या-च्या योजना अमलांत आणणें यायोगें उत्पादनक्षमता वाढविली तर ५ एकर

जमीन हि परवडणारें क्षेत्र होणें अशक्य नाहीं. गरज ही शोधाची जननी आहे. एवढी जमीन माझी आहे व त्यावर च उपजीविका चालविली पाहिजे अशी शेतऱ्याची खात्री झाली म्हणजे मार्ग निघू शकेल. उत्तर प्रदेश व बंगालमध्यें एकरीं $\frac{3}{4}$ टन ( १५०० ते २००० पौंड ) धान्य पिकतें, तर महाराष्ट्रात फक्त ३७५ पौंड ( $\frac{3}{16}$ टन ) पिकतें. शिवाय महाराष्ट्राचा ३० टक्के प्रदेश दुष्काळी व ३५ टक्के निमदुष्काळी आहे. दहा वर्षांतून एक साल दुष्काळाचें व दोन सालें अवर्षणाचीं जातात. ही परिस्थिति सुधारणें व उत्पादन वाढविणें यासाठीं कार्योद्युक्त होण्यास जरूर तें भावनाबल जनतेंत निर्माण झालें पाहिजे. जमिनीच्या समान वाट्याच्या द्वारें तें निर्माण केलें जाऊ शकेल.

दान मिळालेल्या जमिनींतून तुकडेजोड करणें शक्य होईल. फार लहान तुकडे जोडून पाच एकर मूळ तुकड्याएवढे करिता येतील. भूदान-यज्ञ ही एखादी यांत्रिक टोपलेभाज चळवळ नसून जनतेच्या सुप्त विवेकशक्तीला, न्यायबुद्धीला व आत्मप्रत्ययाला आवाहन आहे ही महत्त्वाची गोष्ट नजरेआड होऊ देता कामा नये. मिळालेल्या जमिनीचे आकडे सांकेतिक होत; जनमनाची पकड अधिकाधिक प्रमाणात घेतली जाऊन शोषणरहित समाजाच्या रचनेचा पाया भक्कम प्रमाणावर घातला जावा हें या यज्ञाचें मूलभूत उद्दिष्ट होय.

महाराष्ट्रांतील बेकारीचा प्रश्न भूदान यज्ञानें सुटेल असा त्याचा दावा नाहीं, उलट, बेकारीचा प्रश्न नाहीं च, असला तरी उपेक्षणीय आहे, त्याकडे डोळेझाक केली तरी चालेल, कालान्तरानें तो आपोआप सुटेल, अशा छापाच्या भोंगळ वृत्तीवर मात्र या यज्ञाचा आघात करावयाचा आहे ही मनोवृत्ति धोक्याची आहे, अनैतिक आहे, असा या यज्ञाचा गंभीर इषारा आहे. डोळे उघडून जगात काय चाललें आहे तें पहाणारास या भूमिकेमधील मर्म पकडून घेऊ शकेल.

महाराष्ट्राच्या ११ लाख शेतकरी कुटुंबापुरता विचार केला तरी वर्षा-तून २७० दिवस कामाला उपलब्ध असतात. असा हिशेब केल्यास ५१ कोटि

दिवसाइतके पुरुषाचे श्रम व तितके च स्त्रियांचे श्रम. असे श्रमघटक आज उपलब्ध आहेत. एक एकर कोरडवाहू जमीन पीक घेण्यासाठीं एक पुरुष व एक स्त्री यांना सामान्यपणें दहा दिवस काम करावें लागतें *लागवडीखालील १ कोटि ८२ लाख एकर जमिनीपैकीं सुमारें २० लाख* एकर कोरडवाहू जमीन हें श्रमासाठीं उपलब्ध क्षेत्र समजतां येईल. त्यासाठीं पुरुषाचे २० कोटि दिवसाइतके व स्त्रियांचे २० कोटि दिवसाइतके श्रमघटक लागतात. यावरून असें दिसतें कीं, शेतीसाठीं उपलब्ध असलेल्यापैकीं ४० टक्के श्रमशक्तीला च आज वाव आहे. शेती अधिक दिवस व अधिक काम देणारी (*Intensive*) बनवणें व ग्रामोद्योग चालवणें यायोगें बाकीच्या ६० टक्के श्रमशक्तीला वाव दिला पाहिजे.

जनतेमध्यें 'शुद्ध स्वदेशी'ची भावना निर्माण झाल्यावेरीज देशांतील सर्व श्रमशक्तीचा वापर होणें व पूर्णोद्योगाचें उद्दिष्ट गाठणें शक्य नाहीं. जनतेमध्यें अशी भावना निर्माण झाल्यावेरीज त्यासाठीं आवश्यक ती फायदेशीर योजना होऊं शकणार नाहीं, व झाली तरी यशस्वी होणार नाहीं. भूदानयज्ञ हा आज सर्व रचनात्मक कार्यांचा केंद्रबिंदु होय. या विधानाचें मर्म हें च कीं, शेतजमिनीच्या न्यायोचित वेरवाटपाच्या प्रश्नामधून च जनतेला आपल्या प्रश्नाचें सम्यग्दर्शन होऊन रचनात्मक कार्यास योग्य भूमिका तयार होईल.

बेकारांना मोठ्या उद्योगधंद्यांत भरवावें म्हणणारांनीं हें ध्यानांत घ्यावें कीं, एका माणसाला मोठ्या कारखान्यांत काम द्यावयाचें तर २५०० डॉलर म्हणजे १२००० रुपये भांडवली खर्च लागतो असें यूनोचे आर्थिक तज्ञ सांगतात. महाराष्ट्रांतील ३ लाख भूमिहीन शेतमजुरांना जर मोठ्या कारखानदारींत काम द्यावयाचें तर ४ अब्ज भांडवल लागेल व उत्पादन होणाऱ्या मालाला देशांतील क्रय शक्तीचे अभावीं गिऱ्हाईक मिळालें नाहीं तर परत बेकारीची संक्रांत येईल. प्रश्न तर भारतांतील ८ कोटि बेकारांचा व नव्या समाजरचनेचा आहे. *त्याचा विशाल व व्यापक दृष्टीनें विचार* केला पाहिजे.

## (२२) महाराष्ट्रांतील जमीनमालकीमधील विषमता

मुंबई प्रांतात बहुशीं रयतवारी धारापद्धति असल्यामुळें येथें गैरहजर मालकी किंवा जमिनींचें विषम वाटप यांना अवसर नाहीं असे समजणें भ्रममूलक होय. महाराष्ट्रात भूदान यज्ञाचें काम आवश्यक नाहीं अशी समजूत बाळगणाऱ्या मंडळींनीं सरकारी अहवालांतील आंकडे तपासून पहावेत, म्हणजे आपली चूक त्यांच्या ध्यानात येईल.

(१) ठाणे जिल्हा : ७९ हजार खातेदाराच्या मालकीची जमीन ३ लाख एकर आहे, तर ७ हजार खातेदाराच्या मालकीची जमीन ५॥ लाख एकराहून अधिक आहे. म्हणजे ९२ टक्के लोकाकडे ३६ टक्के जमीन, तर ८ टक्के लोकाकडे ६४ टक्के जमीन आहे.

(२) कुलाबा जिल्हा : ५९ हजार खातेदाराच्या मालकीची जमीन २ लाख एकर आहे, तर ३॥ हजार खातेदाराच्या मालकीची जमीन २। लाख एकर आहे. म्हणजे ९३ टक्के लोकाकडे ४६ टक्के जमीन, तर ७ टक्के लोकाकडे ५४ टक्के जमिनीचें स्वामित्व आहे.

(३) पश्चिम खानदेश : ५७ हजार खातेदाराकडे ६ लाख एकर जमीन आहे, तर १४ हजार खातेदाराकडे ९ लाख एकर जमीन आहे. ७९ टक्के लोकाकडे ३९ टक्के जमिनीची मालकी, तर २१ टक्के लोकाकडे ६१ टक्के जमिनीची मालकी असा प्रकार आहे.

(४) नाशिक जिल्हा : १। लाख खातेदाराकडे १०। लाख एकर जमीन आहे, तर १३ हजार खातेदाराकडे १२ लाख एकर जमीन आहे. म्हणजे ८५ टक्के लोक ४४ टक्के जमिनींचे मालक, तर १५ टक्के लोक ५६ टक्के जमिनीचे धनी अशी वस्तुस्थिति आहे.

(५) पूर्व खानदेश : १॥ लाख खातेदाराकडे ११ लाख एकर जमीन, तर १५ हजार खातेदाराकडे ८ लाख एकर जमीन आहे. म्हणजे ९० टक्के लोकाकडे ५६ टक्के जमीन, तर १० टक्के लोकाकडे ४४ टक्के जमीन आहे.

(६) सोलापूर जिल्हा : ८६ हजार खातेदाराकडे ८॥ लाख एकर जमिनीची मालकी, तर २७ हजार लोक १५ लाख एकर जमिनीचे

मालक आहेत. याचा अर्थ ७६ टक्के खातेदाराकडे ३६ टक्के जमीन व २४ टक्के खातेदाराकडे ६४ टक्के जमीन आहे.

(७) रत्नागिरी जिल्हा : ७७ हजार खातेदाराकडे २। लाख एकर जमीन, तर ३। हजार खातेदाराकडे २ लाख एकर जमीन आहे. ९६ टक्के लोकाकडे ५६ टक्के व ४ टक्के लोकाकडे ४४ टक्के जमीन आहे.

(८) अहमदनगर जिल्हा : १॥ लाख खातेदाराकडे १२ लाख एकर जमीन, तर ३०॥ हजार खातेदाराकडे १५ लाख एकर जमीन आहे. ८२ टक्के लोकाकडे ४४ टक्के व १८ टक्के लोकाकडे ५६ टक्के जमीन आहे.

(९) पुणें जिल्हा . १॥ लाख खातेदाराकडे १२ लाख एकर जमीन, तर २०॥ हजार खातेदाराकडे ९॥ लाख एकर जमिनीची मालकी आहे म्हणजे ८९ टक्के लोक ५५ टक्के जमिनीचे मालक, तर ११ टक्के लोकाकडे ४५ टक्के जमिनीची मालकी असा प्रकार आहे.

(१०) सातारा जिल्हा . २। लाख खातेदाराकडे ११। लाख एकर जमीन असून १२ हजार खातेदाराकडे ६। लाख एकर जमिनीचें स्वामित्व आहे. म्हणजे ९५ टक्के लोकाकडे ६६ टक्के जमीन व ५ टक्के लोकाकडे ३४ टक्के जमीन आहे.

सातारा जिल्ह्याची आता पुनर्घटना झाली असून विलीन संस्थानी प्रदेशाचा समावेश करून दक्षिण सातारा जिल्हा बनविण्यात आला आहे. त्याचे, तसें च कोल्हापूर जिल्ह्याचे, आकडे मिळाले नसले तरी वर दर्शविल्याहून फारशी वेगळी परिस्थिति त्या जिल्ह्यात नाहीं. कोल्हापूर जिल्ह्यात तर संस्थानिक, जहागिरदार, इनामदार यांच्या मोठमोठ्या खासगत शेरी जमिनींचें क्षेत्र हजारों एकरांचें आहे.

प्रत्येकीं शंभर एकरावर जमिनीचे मालक असणाऱ्या खातेदारांची संख्या व त्यांचेकडील एकूण क्षेत्र यांचे जिल्हेवार आकडे पुढें दिल्याप्रमाणे आहेत :

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| (१) ठाणें : | १५१९ खातेदार | ३॥ लाख | | एकर | क्षेत्र |
| (२) कुलाबा : | ६३७ | ,, | १। | ,, | ,, | ,, |
| (३) पूर्वखानदेश : | १३३९ | ,, | २ | लाखावर | ,, | ,, |
| (४) नाशिक : | १५५४ | ,, | २। | लाख | ,, | ,, |
| (५) प. खानदेश : | ११६२ | ,, | ३ | ,, | ,, | ,, |
| (६) सोलापूर : | २४८३ | ,, | ४ | ,, | ,, | ,, |
| (७) रत्नागिरी : | २२७ | ,, | ८८ | हजार | ,, | ,, |
| (८) नगर : | २५२५ | ,, | ३॥। | लाख | ,, | ,, |
| (९) पुणें : | १४८२ | ,, | १॥। | ,, | ,, | ,, |
| (१०) सातारा : | ६४० | ,, | ९३ | हजार | ,, | ,, |

वरील आकडे १९४३ सालातील असले तरी गेल्या दहा वर्षांत जमीनमालकीच्या विभागणींत विशेष बदल झाला नसल्यानें त्यावरून आजच्या परिस्थितीचें दिग्दर्शन होतें. आर्थिक दृष्ट्या किफायतशीर होणारें क्षेत्र व जमिनीचे लहान तुकडे या प्रश्नाचा विचार हा एक स्वतंत्र विषय होईल. येथें फक्त मालकीच्या विषम विभागणीच्या च प्रश्नाची आकडेवारीनें छाननी केली आहे.

## (२३) गरिबाला जमीन पाहिजे

असें म्हणतात कीं, खेड्यातले लोक दरिद्री असतात याचें कारण ते आळशी आहेत, त्यांना काम करायला नको. त्यांच्यामध्यें ग्रामोद्योग सुरू करण्याची खटपट व्यर्थ गेली आहे. हें म्हणणें बरोबर नाहीं. तें संपूर्ण असत्य आहे असें नाहीं. प्रथम च ग्रामोद्योग त्यांच्या हातीं दिला तर ते त्याचा मनापासून स्वीकार करू शकत नाहींत. परंतु त्यांना जमीन द्या कीं ते वेड्यासारखे तिच्यावर तुटून पडतील. कारण त्यांना प्रथम पाहिजे जमीन. नाहीं तर सर्व व्यर्थ आहे. त्या गरीब लोकांमध्यें कांहीं आळशीपणा आला आहे हें खरें आहे, पण त्याबद्दल ते जबाबदार नाहींत. त्यांच्यावर पुष्कळ दिवस आळशीपणा (Enforced idleness) लादला गेल्यामुळें, निरुपायानें पुष्कळ दिवस कामाशिवाय राहिल्यामुळे, त्यांचें कामावरचें लक्ष उडून गेलें आणि त्यांचें सवयीनें आळसांत रूपांतर झालें. गावांतल्या गरिबाची अवस्था अशी

झाली आहे तरी शेतात मेहनत करताना ते कधीं आळशी असत नाहींत, पण ती जमीन त्यांची स्वत ची असली पाहिजे.

## ( २४ ) बेकारीचा प्रश्न आणि त्याचें स्वरूप

१५ वर्षांपासून ५५ वर्षांपर्यंतच्या लोकांना कामाला योग्य असें मानलें जातें. १९५१ सालच्या खानेसुमारीवरून सर्व भारतात अशा लोकांची संख्या २१ कोटि २० लक्ष आहे परंतु दारिद्र्यामुळें एका बाजूनें दहा वर्षांच्या मुलाला हि आणि ६५ वर्षांच्या म्हाताऱ्याला हि काम करावें लागतें. या हिशोबानें हिंदुस्थानांतल्या काम करण्यास योग्य लोकांची संख्या २४ कोटि होते यापैकी जेमतेम १४ कोटि लोकांना काम मिळतें. म्हणजे १० कोटि लोकांना बेकार बसावें लागतें. या १४ कोटि लोकांना हि जें काम मिळतें तें पुरें काम मिळत नाहीं. या १४ कोटींपैकीं १० कोटि लोक शेती करतात. त्यांना शेतात जास्तींत जास्त ६ महिने काम असतें. उरलेले ६ महिने त्यांना बेकार बसावें लागतें. कारागीरवर्गाची लोकसंख्या गावच्या लोकसंख्येच्या शेकडा सुमारें १० असते काम नसल्यामुळें त्यांना हि वर्षांतून ६ महिने बसून रहावें लागतें. यावरून आपल्या देशातल्या बेकारीचा प्रश्न किती व्यापक आहे याचें सहज अनुमान करता येईल. शेतकऱ्यांत हि शेकडा ७५ लोकांच्या जमिनीचें प्रमाण ५ एकरांहून हि कमी आहे आणि त्याचें वार्षिक उत्पन्न अत्यंत कमी आहे. रिझर्व बँकेनें नुकती च पाहणी केली त्यावरून समजून येतें कीं, ज्या शेतकऱ्यांच्याजवळ स्वत ची जमीन आहे त्यांच्यातल्या अर्ध्या लोकांचें वार्षिक उत्पन्न ३०० रुपयांहून हि कमी आहे. शेतीच्या मेहनतीचा खर्च वजा केला तर त्यांना होणारा फायदा ६० रुपयांपेक्षा कमी आहे. जमीन सुधारणें किंवा शेतीची उन्नति करणें याकरिता वर्षाला २२ रुपयांपासून ५१ रुपये पर्यंत हि खर्च करण्याला ते समर्थ नाहींत. गावातल्या कारागिरवर्गाचें वार्षिक उत्पन्न हि अतिशय कमी आहे. शेतीचे आणि ग्रामोद्योगाचे कामात आज शेकडा ७५ लोक आहेत. त्यांची अशी दुरवस्था आहे, म्हणून देशातल्या बेकारीचा प्रश्न जसा मोठा आहे तसा च जे बेकार नाहींत त्यांच्या तल्या दारिद्र्याचा प्रश्न हि भयानक आहे आजकाल वर्तमानपत्रात आणि लोकामध्यें बेकारीच्या प्रश्नासंबंधीं बहुधा नेहमीं चर्चा चालते ते चर्चा करीत

असतात ते कोण बेकार असतात ? ज्याना खायला नाहीं किंवा एकदा च जेवण मिळतें अशा मरणोन्मुख कोटि कोटि भूमिहीन किंवा खेड्यातले कामगार अशा लोकाच्या बेकारीची ते चर्चा करीत नाहींत ते चर्चा करतात शिक्षित वा अर्धशिक्षित बेकाराची. त्याची बेकारी घालविली पाहिजे. हा एक देशापुढील प्रश्न आहे याविषयीं संशय नाहीं. परतु देशाच्या बेकार समस्येच्या दृष्टीकोनाने त्याचा च प्रश्न तेवढा देशापुढ किंवा जगापुढें माडणे भ्रामक आहे. सरकारी असोत बिनसरकारी असोत, जे लोक देशाच्या आर्थिक उन्नतीच्या गोष्टी बोलत असतात त्याच्या चर्चेत ह्या कोट्यवधि भूमि हीनाना स्थान असत नाहीं, असलें च तर अगदीं गौण असतें. म्हणून देशातल्या खऱ्या बेकाराचा जो अत्यत महत्त्वाचा प्रश्न आहे तो आज साधारणत सुशिक्षित समाज आणि सरकार याच्या दृष्टीपुढे उभा असत नाहीं हें दुर्दैव आहे म्हणून विनोबा दु खानें म्हणतात, “ जर राष्ट्रीय म्हणजे सर्वस्पर्शी प्लॅनिंग म्हणजे योजना करणें शक्य नसेल आणि पार्शल म्हणजे आशिक प्लॅनिंग करणें भाग असेल तर ह्या कोट्यवधि गरीब लोकाच्या प्रश्नाला अग्रगण्य मानलें पाहिजे ” याचें कारण काय ? कारण हे च लोक देशातल्या सर्वापेक्षा अगदीं खालच्या तळातले आहेत. हे च लोक सर्वांपेक्षा गरीब आणि असहाय आहेत. या ठिकाणीं प्रख्यात मार्क्सच्या एका वचनाचा उल्लेख केला पाहिजे. त्यानें त्याच्या काळच्या आणि दुसऱ्या देशातल्या परिस्थितीला उद्देशून जरी तें म्हटलें असलें तरी त्याचें म्हणणें या असहाय मरणाच्या दारीं पडलेल्या आजच्या भूमिहीन गरिबाचें चित्र रेखाटत आहे. “The forest of uplifted arms demanding work becomes ever thicker while the arms themselves ever thinner” याचा अर्थ ‘पोटाला काम मागणाऱ्याच्यावर उचललेल्या हाताची सख्या सारखी वाढत चालली आहे आणि हें वर उचललेल्या हाताचें जगल जितकें निबिड होत आहे तितके च त्या बेकाराचे हात निरतर क्षीण होत आहेत.’ म्हणून आज त्याच्या भल्याच्या कसोटीवर च प्रत्येक गोष्ट पारखून पाहिली पाहिजे. यासंबधीं म. गाधींचें हि एक सुदर वचन मनापुढें उभें राहतें. “I will give you a talisman Whenever you are in doubt apply the following test Recall the face of the

poorest and weakest man whom you may have seen and ask yourself, if the step you contemplate is going to be of any use to him. Will he gain something by it ? Will it restore him to a control over his own life and destiny ? In other words, 'Swaraj' for the hungry spiritually starving millions ? '

" मी तुम्हाला एक मंत्र देतो. जेव्हा तुमच्या मनात काही संशय असेल तेव्हा तो प्रश्न तुम्ही या कसोटीवर पारखून घ्या. सर्वांत गरीब, सर्वांत दीन, माणूस तुम्ही पाहिला असेल. त्याचा चेहरा आपल्या दृष्टीसमोर आणा व स्वतःला असा प्रश्न करा की, आपण जी व्यवस्था, जें प्लॅनिंग करू पहात आहोंत त्यानें या माणसानें काही भलें होईल की नाही ? यामुळें या माणसाचा काही फायदा होईल की नाही ? यामुळें तो आपली उपजीविका आणि आपलें दैव यावर काही अधिक सत्ता चालवू शकेल किंवा नाही ? अर्थात् क्षुधार्त आणि आध्यात्मिक प्रकाशापासून वंचित असलेल्या कोट्यवधि लोकांना स्वराज्य मिळेल काय ? "

या दृष्टीनें भूदान यज्ञाचें आंदोलन हें बेकारीचा प्रश्न सोडविण्याची अत्यंत उत्तम योजना आहे याविषयीं संदेह नाही.

## ( २५ ) दारिद्र्याचा प्रश्न सोडविण्याचा उपाय

दारिद्र्य, शोषण आणि त्यांतीची अवाढव्य विषमता कशी दूर करता येईल ? ती दूर करण्याचा योग्य मार्ग कोणता ? त्याचा उत्तम मार्ग म्हणजे ज्या कारणानें दारिद्र्य आणि शोषण निर्माण झालें आहे तें कारण दूर करणें. अर्थात् उत्पादनाचें मौलिक साधन जी जमीन ती अनुत्पादक श्रीमंत लोकांच्या हातून काढून गरीब भूमिहीनांच्या हातीं परत देणें, जमिनीची योग्य वाटणी करून देणे. पुष्कळांना वाटतें की, दुसरें काहीतरी काम देऊन गरिबीचा प्रश्न सोडविणें शक्य आहे. अनेकांची अशी धारणा आहे कीं, यांत्रिक उद्योगधंद्यांच्या साहाय्यानें दारिद्र्य आणि बेकारीचा प्रश्न सुटून जाईल, परंतु जरा गंभीरपणें विचार केला तर दिसून येईल कीं, हें शक्य नाहीं. आपल्या देशांत जे मोठमोठे कारखाने उभे राहिले आहेत ते उभारायला सुमारें शंभर वर्षें झालीं आहेत. त्या कारखान्यांत फक्त २५ लक्ष

लोकांना काम मिळू शकते. सरकारला वाटतें की, पुढील कांहीं वर्षांत यांत्रिक कारखान्याच्या मदतीनें अडीच कोटि लोकांना काम देता येईल. सरकारी योजनेचा हिशोब कांहीं असो, ते शक्य आहे असें वाटत नाहीं. मोठमोठ्या कारखान्यामुळे च इंग्लंड श्रीमान् झालें हें खरें आहे, परंतु त्याच्या मोठ्या कारखान्यांतून उत्पन्न होणाऱ्या वस्तु विकायला इंग्लंडच्या लोकसंख्येपेक्षा २०–२५ पट लोकसंख्या लागते आणि म्हणून इतक्या मोठ्या भूमिभागावर त्यांना जबरदस्तीनें आपलें राज्य स्थापन करावें लागलें. तेव्हा च त्यांना कच्चा माल स्वस्त मिळू शकला आणि कारखान्यांत बनलेला पक्का माल विकून त्यांनीं आपली भरभराट करून घेतली. आपल्या देशाला तें शक्य आहे काय? हिंदुस्थानला मोठाल्या कारखान्याच्या साह्यानें आपलें दारिद्र्य आणि बेकारीचा प्रश्न सोडवावयाचा असेल तर कारखान्यांत उत्पन्न झालेला माल विकण्याकरिता त्याला मगळाकर ठावा मिळविला पाहिजे. हल्लींच्या काळांत पृथ्वीतल्या कोणत्या हि भागांत त्यांना आपला माल विकायची जागा किंवा संधि मिळणार नाहीं. अमेरिकेतल्या जमिनीचें समान वाटप केलें तर प्रत्येक माणसामागें तेथें २५ एकर जमीन पडते, शिवाय तेथें अपार, कधीं हि न संपणारी, नैसर्गिक संपत्ति आहे. रशियातल्या लोकसंख्येच्या मानानें तेथली जमीन पुष्कळ असल्यामुळे रशियांत हि भूमीचा किंवा जमिनीचा प्रश्न नाहीं. भारताच्या मानानें ऑस्ट्रेलिया खूप मोठा देश आहे, आज हि तेथली लोकसंख्या १ कोटि झालेली नाहीं. भारताची लोकसंख्या ३६ कोटि आहे आणि शेतीला योग्य जमीन ३० कोटि एकर आहे. म्हणजे माणसामागें एक एकरापेक्षा हि कमी जमीन आहे. प. बंगालमध्यें शेतीखालीं असलेली आणि शेतीला योग्य असलेली जमीन एकूण १ कोटि ४६ लक्ष एकर आहे. लोकसंख्या अडीच कोटि. त्यांत पुन्हा नवीन येणाऱ्या निर्वासितांचा भर पडत आहे. प्रत्येक मनुष्यामागीं अर्धा एकर जमीन पडते आणि जमिनीशिवाय उपजीविकेचें दुसरें कोणते हि साधन गांवांत उरलेलें नाहीं. हिंदुस्थाननें कितीं हि प्रयत्न केला तरी सामान्य लोकानें औद्योगिक अमेरिका आणि इंग्लंड यांच्यासारखें हिं-

स्थानला वाढविता येणार नाहीं. पण भारत आपल्या स्वतंत्र योग्य मार्गानें जाईल तर च त्याला आपलें दारिद्य आणि बेकारीचा प्रश्न सोडवून सर्वांच्या उपजीविकेची व्यवस्था करण्यास तो समर्थ होईल. उलटपक्षीं भारत जर अमेरिका आणि इंग्लंडचें अनुकरण करूं पाहील तर आजच्या श्रीमंत लोकांमध्यें आणखी थोडी भर पडेल पण सामान्य लोकांची बेकारी आणि दारिद्य दूर होणार नाहीं, उलट ती उत्तरोत्तर वाढत जाईल. विनोबा म्हणतात, "मीं प्लॅनिंग कमिशनला सांगितलें कीं जर आपल्याला देशांतल्या समस्त लोकांकरितां प्लॅनिंग करणें शक्य नसेल आणि तुम्हीं जर आंशिक म्हणजे पार्शल प्लॅनिंग करणार असाल तर तें पार्शल प्लॅनिंग गरिबांकरितां करा. या प्रसंगीं मीं राजाजींचें उदाहरण देऊं इच्छितों. राजाजींच्यासारखा प्रवीण राजनीतिज्ञ जर तेथें नसता तर मद्रासची काय अवस्था झाली असती त्याची कल्पना करून पहा. त्यांनीं गरिबांच्या परिस्थितीकडे दृष्टि ठेवूनच कंट्रोल उठवून दिले, आणि सर्वांपेक्षां त्यांचें मोठें काम हें कीं, त्यांनीं विणकरांचा प्रश्न सोडविण्याचा हि विशेष आग्रह धरला. मीं प्लॅनिंग कमिशनला असें हि सांगितलें कीं, मोठ्या यंत्रांच्या साह्यानें सर्व लोकांची बेकारी जर तुम्ही दूर करूं शकत असाल तर मी माझा चरखा चुलींत टाकीन परंतु मला माहीत आहे कीं, ग्रामोद्योगांशिवाय दुसऱ्या कोणत्या हि मार्गानें हा प्रश्न सुटण्यासारखा नाहीं." ते पुढें म्हणतात, "लोक म्हणतात जमीन फोडून वाढवायाची! दुसरे कांहीं उद्योग देण्याच्या गोष्टी नोला या म्हणण्यात कांहीं अर्थ नाहीं. दुसरें काम देणारे तुम्ही कोण? आईच्या जवळून तिच्या मुलाला काढून घेऊन दुसरें कोणचें काम तिला देऊं शकाल? ग्रामोद्योग त्यांच्या हातांतून काढून घेतले गेले आहेत व काढून घेतले जात आहेत विणकरांचें काम हि बंद केलें जात आहे. तें काढून घेतल्यावर त्यांना दुसरें कोणतें काम द्याल? जमीन एक मौलिक वस्तु आहे. ती पंचभूतांतली एक आहे. ती देणें तुम्हाला नाकबूल करतां येणार नाहीं" भारतानें आपली परिस्थिति पाहून त्या परिस्थितींत आपल्याला जें काम करणें शक्य आहे तें च केलें पाहिजे. जमिनीची योग्य वाटणी झाली एवढ्यानें च खेड्यांतल्या लोकांचें चालणार नाहीं. कुटुंबाला पांच एकर जमीन मिळाली तरी तेवढ्यावर त्यांची उप जीविका होणार नाहीं. अर्थात् त्याच्याकरितां दुसरी कांहीं तरी उपजीविकेची

व्यवस्था करणें जरूर आहे. ग्रामोद्योगाच्या द्वारे च मात्र ही गोष्ट शक्य आहे. सध्याच्या परिस्थितींत जे जे ग्रामोद्योग चालू करणें शक्य आहे, ते करण्याची व्यवस्था केली पाहिजे. अन्नधान्य, कपडा आणि घराला लागणाऱ्या वस्तु गावात च शक्य तेवढ्या निर्माण करण्याची जरूर आहे; त्याशिवाय जो कांहीं कच्चा माल गावात उत्पन्न होतो आणि त्याचा पक्का माल केला असता तो गावात खपतो तो गावात च उत्पन्न करण्याची व्यवस्था ग्रामोद्योगाच्या साह्यानें केली पाहिजे. आजं वैज्ञानिकाची दृष्टि विकारग्रस्त आहे. आज ते सर्व मोठमोठ्या यंत्रांची उन्नति करण्यात ग्रस्त आहेत. दुसऱ्या गोष्टी तर दूर राहू देत, परंतु जात्याला बॉलबेअरिंग बसवून किंवा दुसऱ्या कांहीं सोप्या रीतीनें जातें फिरवणें सोपें जावें, दळण्याचे श्रम कमी व्हावेत, अशी खटपट कोणी वैज्ञानिक करीत आहेत का? ग्रामोद्योगाकरिता लागणाऱ्या यंत्राची सुधारणा करण्याचें काम वैज्ञानिकांनीं मनावर घेतलें पाहिजे. हिंसेशीं विज्ञानाचा योग घडून आला आहे म्हणून आज जग विनाशाच्या मार्गानें चाललें आहे. विज्ञानाला जर जगाचें खरें कल्याण साधावयाचें असेल तर अहिंसेशीं विज्ञानाचें लग्न लावून दिलें पाहिजे. ग्रामोद्योगातून उत्पन्न झालेल्या खाद्यवस्तू, वापरावयाचें कापड वगैरेंची किंमत गिरण्यातून तयार झालेल्या वस्तूंशीं तुलनेनें अधिक असली तरी समग्र दृष्टीनें अथवा सर्व देशाच्या कल्याणाच्या दृष्टीनें शहरातल्या लोकांनीं या च वस्तु विकत घेतल्या पाहिजेत. खेड्यातल्या लोकांना दरिद्री आणि बेकार ठेवून गिरणी-मधें उत्पन्न झालेल्या स्वस्त मालाच्या पाठीमागें धावून चालणार नाहीं. शहर गावाचें शोषण करण्याकरिता नाहीं तर तें गावाची सेवा करण्या-करिता आहे.

## ( २६ ) कर्तृत्व-विभाजन

परंतु हा संकल्प अमलात आणण्याचा उपाय काय? अर्थात् गावाच्या आर्थिक व्यवस्थेमध्यें ग्रामोद्योगाची त्याच्या यथायोग्य स्थानीं प्रस्थापना करण्याचा उपाय कोणता? लोकांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींतून च आजचें सरकार बनलें आहे. जर हें सरकार दृढशक्तीच्या साह्यानें ग्रामोद्योगाची पुन्हा स्थापना करील तर ठीक च; परंतु तें कसें शक्य होईल?

जमिनीचा प्रश्न सोडविण्याकरितां ' जनशक्ति ' निर्माण करण्याच्या विषयावर पूर्वी विवेचन केलें च आहे. ती जनशक्ति जर आम्ही उत्तम प्रकारें उत्पन्न करूं शकलों तर दडपशाहीचें साहाय्य न घेतां च ग्रामोद्योगानें पुनरुत्थान करणें शक्य आहे ही गोष्ट सहज समजून येईल. ग्रामोद्योग स्थापन करण्याच्या क्षेत्रांत हि समाजामध्यें विचारप्रचार करून, त्यांना तो प्रश्न समजावून देऊन, त्यांच्या मनांत ग्रामोद्योगाविषयीं प्रतिष्ठा निर्माण केली पाहिजे. सर्वोदयसमन्वयाचें हें काम आहे. खादी वगैरे रचनात्मक कार्यांचें साहाय्यानें कार्यकर्त्यांनी हा विचार जागृत करण्याची खटपट आजवर केली. परंतु आज समजून चुकलें आहे कीं, भूदान यज्ञ सफल होईल तर च रचनात्मक कार्य यशस्वी करणें सहज शक्य होईल. समाजांत व्यापक रीतीनें विचारप्रचार करून, लोकांच्या बुद्धीला प्रेरित करून कार्य करण्याला प्रवृत्त करणें या गोष्टीला विनोबांनीं ' विचार शासन ' नांव दिलें आहे. जनशक्ति कार्यतत्पर करण्याचा विचार शासन हा प्रधान उपाय आहे. ग्रामोद्योगाच्या क्षेत्रांत हि तसें च आहे. परंतु ग्रामोद्योग स्थापन करण्याच्या विषयांत केवळ विचार शासनाच्या द्वारा तें काम पूर्ण सफल होण्याचा संभव नाहीं. समजा कीं, एखाद्या गावांत किंवा टापूंत केवळ विचारबुद्धि जागृत झाली आहे म्हणून फक्त घाणीचें च तेल वापरायचें असें त्यांनीं ठरविलें आणि गावाला लागणारें तेल निघेल इतक्या तेलघाण्या गावांत चालवावयाच्या असें ठरविलें, परंतु त्यामुळें बाहेरून गावांत येणारें गिरणीचें तेल बंद होणार नाहीं. त्यामुळें गावानें केलेला संकल्प सिद्धीस जाण्याचा संभव नाहीं. म्हणून गांवांत कोणचा जिन्नस येऊं द्यावयाचा, कोणचा येऊं द्यावयाचा नाहीं, हा अधिकार गावाला असला पाहिजे. ही गोष्ट गाव च ठरवील. त्यानें ठरविल्याप्रमाणें तो तो जिन्नस गावांत आणणें बंद केलें गेलें पाहिजे. म्हणून जनशक्ति कार्यान्वित करण्याचा दुसरा उपाय आहे कर्तृत्व विभाजन. जोंपर्यंत सर्व सत्ता केंद्रीभूत राहील, गावागावामध्यें अधिकाराचें विकेंद्रीकरण करून दिलें जाणार नाहीं, तोंपर्यंत खरें ' ग्राम राज्य ' स्थापन करणें शक्य नाहीं. म्हणून विनोबा म्हणतात, “ विचार शासन आणि कर्तृत्व विभाजन हीं जनशक्तीचीं दोन हत्यारें आहेत. म्हणून आम्ही असें इच्छितों कीं, जर एखाद्या गावातल्या लोकांची अशी इच्छा असेल कीं, ' आम्हीं गावांत

बाहेरचा अमुक माल येऊ देणार नाहीं ' तर गावाला तसा अधिकार असला पाहिजे. जर एकाद्या गावातले अगर टापूतले लोक ठरवतील कीं त्या टापूत जें भात उत्पन्न होतें तें भात तांदुळाच्या गिरणीकडे पाठविलें जाणार नाहीं, आणि गिरणींत सडलेला तांदूळ आणला जाता कामा नये, तर तसें करण्याचा अधिकार गावाला असला पाहिजे. तो अधिकार अमलात आणण्याची सत्ता त्याना असली पाहिजे. सरकारनें हें मानलें तर अहिंसेच्या दृष्टीनें तें अनुकूल होईल, परंतु सरकारनें मानलें च नाहीं तर उपाय काय ? '' यासबंधीं विनोबा म्हणतात, '' सरकारनें जर हें मान्य केलें नाहीं तर आम्ही लोकात जाऊन सांगू कीं, हें स्वराज्य असल स्वराज्य नाहीं. आम्ही त्या ठिकाणीं ठाण मांडू आणि सरकार विरोधी असलें तरी आमचा उद्देश अमलात आणण्यास उद्युक्त होऊ च होऊ '' विनोबा आणखी पुढें म्हणतात, ' कर्तृत्व विभाजनाची गोष्ट जेव्हा मी म्हणतों तेव्हा सरकार असें म्हणेल कीं, एका मोठ्या राज्यात छोटीं राज्यें चालू देता येणार नाहींत त्याना मी असें सांगू इच्छितों कीं, जर आम्हीं अधिकाराचें विभाजन् केलें नाहीं, कर्तृत्वाचें विभाजन केलें नाहीं, तर सैन्याशिवाय चालणार नाहीं ही गोष्ट लक्षात घ्या. आज तर सैन्याशिवाय चालत च नाहीं, आणि पुढें केव्हा हि चालणार नाहीं. म्हणून कायमचें असें ठरवून टाका कीं, आम्हाला सैन्याच्या साहाय्यानें च काम चालवायचें आहे. आणि सेना सुसज्जित राखायची आहे आणि पुन्हा अशी कधीं हि गोष्ट बोलू नका कीं, आम्ही कधीं ना कधीं सैन्याच्या प्रयोजनातून मुक्त होऊं इच्छितों. जर कधीं सैन्याशिवाय राज्य चालवावयाची तुम्हास इच्छा असेल तर परमेश्वरानें त्याप्रमाणें विकेंद्रीकरण केलें आहे त्याप्रमाणें च आपल्याला हि केलें पाहिजे. परमेश्वरानें बुद्धीचें विभाजन करून दिलेलें आहे. त्यानें प्रत्येकाला बुद्धि दिली आहे, विंचवाला हि दिली आहे आणि सापाला हि दिली आहे, वाघाला हि दिली आहे आणि मनुष्याला हि दिली आहे. कमी, जास्ती असो परंतु प्रत्येकाला बुद्धि दिली आहे, आणि सांगितलें आहे कीं, तुम्ही आपल्या बुद्धीप्रमाणें आपलें जीवन चालवा, म्हणून सर्व जगाचें काम उत्तम तऱ्हेनें चाललें आहे आणि तो क्षीरसागरात विश्रांति घेत पडला आहे आणि इतक्या शांतपणें तो विश्रांति घेत आहे कीं, परमेश्वर आहे कीं नाहीं असा लोकामध्यें संशय उत्पन्न व्हावा. आपलें

सरकार हि असें च चालले पाहिजे. असा वाटली पाहिजे की, सरकार आहे की नाहीं. लोक जेव्हा म्हणतील हिंदुस्थानात सरकार राज्य करीत आहे असें वाटत नाहीं तेव्हा च समजता येईल कीं, ग्रामचें राज्यशासन अहिंसक झालें आहे. म्हणून च मी ग्रामराज्याची गोष्ट सांगत असतों, आणि त्या-करिता आम्ही असें इच्छितों कीं, गावाचें नियंत्रण करण्याचा अधिकार गावाला असावा. अर्थात् गावातल्या लोकांनीं आपलें स्वत चें नियंत्रण करण्याचा हक्क आपल्या हातात घ्यावा. जनशक्तीसंबंधीं असा हि एक प्रसंग उपस्थित होईल कीं, गावातले लोक आपल्या पायावर उभे राहून असें ठरवतील कीं, अमुक मालाचें आम्हीं उत्पादन बंद आणि ते सरकारकडून अशी अपेक्षा करतील कीं, अमुक माल या ठिकाणीं येऊं देणें उपयोगी नाहीं. आणि त्याची आयात सरकारनें बंद केली पाहिजे. सरकार जर तसें करणार नाहीं, इच्छा असून हि तसें करूं शकत नसेल, तर सरकारशीं विरोध करण्याकरिता उभें राहण्याचें धैर्य गावानें दाखविलें पाहिजे."

## • (२७) भूदान-यज्ञ प्रेमाचा मार्ग

दुसऱ्या देशात हिंसेच्या मार्गानें श्रीमंत आणि गरीब यामधील विषमता दूर करण्यात आली आहे. भूदान यज्ञामध्यें प्रेमाच्या मार्गानें च ही विषमता दूर केली जाईल. श्रीमंताची श्रीमंती दूर करणें आणि गरिबांची गरिबी नाहींशी करणें ही च परमेश्वराची प्रेमाची रीत आहे. यासंबंधीं बोलताना विनोबा म्हणतात, " परमेश्वर सगळ्याना समान च करूं इच्छितो. हें त्याचें प्रेमाचें काम आहे, द्वेषाचें काम नाहीं. मी जें काम करीत आहें तें परमेश्वराचें काम आहे. मी मोठ्याचा अहंकार दूर करूं इच्छितों आणि लहानाना उच्च पदावर उठवूं इच्छितों. त्याकरिता थोराकडून जमीन घेऊन गरीब भूमिहीनाला जमीन देऊं इच्छितों यावरून असें मानणें योग्य नाहीं कीं, माझें मोठ्या लोकाशीं शत्रुत्व आहे. मी तर त्याचा मान वाढावा असें च इच्छितों. मी त्याच्याकडून जमीन घेऊन त्याना गरिबाचें पवित्र प्रेम देऊं इच्छितों. समाजात विषमता राहिली आहे म्हणून श्रीमंत आणि गरीब दोघाचें हि वाईट झालें आहे दोघे मिळून देशाचें नुकसान च करीत आहेत. दुसऱ्या देशात ही विषमता दूर करताना श्रीमंत लोकाची हत्या केली गेली..

रशियात हजारो श्रीमत लोक मारले गेले आणि तेलगणात हि शेकडों श्रीमतांचे खून झाले. हत्येशिवाय, रक्तपाताशिवाय, हें काम भारतात घडून यावें अशी माझी इच्छा आहे. आमचें काम प्रेमाच्या मार्गानें च होईल. परमेश्वराची इच्छा आहे कीं, सुख आणि दु:ख आपण आपसामध्ये वाटून घ्यावें जर सर्वजण आपल्या स्वार्थापुरती च चिंता करतील, शेजाऱ्याशीं सद्व्यवहार करणार नाहींत असे असेल, तर ते गाव गाव नाहीं, तें जगल आहे, तें स्मशान आहे."

## ( २८ ) भूमीचा प्रश्न सोडविण्याकरितां अहिंसक मार्गाचा विचार

मनुष्याला विचार समजावून दिला तर तो समजू शकतो आणि जेव्हा विचार समजतो तेव्हा त्याप्रमाणे आचरण आणि कार्य करण्यास तो तयार होतो. ही श्रद्धा च अहिंसेचा पाया आहे. मनुष्य पशु नाहीं. जनावराला विचार समजावून दिला तरी तें समजत नाहीं. मनुष्य आणि पशु यामध्ये हा च भेद आहे. पशूला परमेश्वरानें स्वतत्र विचार करण्याची शक्ति दिलेली नाहीं. परतु मनुष्याला ती दिली आहे. परमेश्वरानें जनावराला जेवढी बुद्धि आणि चेतना दिली आहे तसें ते आचरण करतात. तें चागलें असो वाईट असो, परतु मनुष्याला त्याने अपरिमित विचारशक्ति दिली आहे. ह्या विचारशक्तींत च आत्मज्ञानाची हि शक्ति अतर्भूत आहे. मनुष्य आपल्या आत्मज्ञानाचा अनत पटींनीं विकास करू शकतो. आपल्याला आपल्या देहाच्या सीमेंत च बद करून ठेवणें ही आत्मज्ञानाची सर्वांत सकुचित अवस्था आहे सारे जग, सारी सृष्टि आपली च आहे अशी श्रद्धा उत्पन्न होणें ही आत्मज्ञानाची पूर्ण विकसित अवस्था आहे. आत्मज्ञानाचा जितका विकास होईल तितका च अत करणात प्रेमाचा विकास होईल आणि त्या च प्रमाणात जीवन हि प्रेममय होईल. या प्रेमाच्या शक्तीनें हृदयाचें परिवर्तन साध्य होईल आणि ज्या प्रमाणात जीवन प्रेममय होईल त्या च प्रमाणात आत्मज्ञानाचा विकास करणें सहज शक्य होईल. म्हणून प्रेमाला जीवनाचें मूलतत्त्व म्हटलें पाहिजे. आत्मज्ञानाचा विकास तसा च प्रेमाचा विकास करणे हें भूदान यज्ञाचें मूलतत्त्व आहे.

अहिंसेच्या मार्गानें जमिनीचा प्रश्न सुटणें शक्य आहे का? विनोबा या प्रश्नाचें उत्तर देताना म्हणतात, "हें जर मान्य असेल कीं प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणात ईश्वर आहे आणि आमच्या श्वासोच्छ्वासाचें हि नियमन तो च करीत आहे, आपल्याला सर्व प्रेरणा त्याच्याकडून च मिळत आहेत, तर आम्हां असा विश्वास ठेवला पाहिजे कीं, सर्वांचें हृदयपरिवर्तन करणें आपल्याला सहज शक्य आहे. जर काळाला च उभा राहिला आणि त्यानें परिवर्तन करायचें ठरविलें तर परिवर्तन निश्चित होईल च. मनुष्याची इच्छा असो वा नसो, पण जेव्हां मनुष्य प्रवाहात पडतो तेव्हां तेथें त्याची उभा रहाण्याची शक्ति चालत नाही. प्रवाहाचा शक्ति कार्य करू शकते. अशा वेळां मनुष्यहृदयाचें परिवर्तन करण्याकरिता कालाचा प्रवाह हि सहायभूत होतो. आज तर सर्व जमीन तापून गेली आहे. त्या तापलेल्या जमिनीवर प्रेमाचे दोन थेंब सिंचन करण्याचें काम आमच्या हातून करून घेण्याची जर परमेश्वराची इच्छा असेल तर तें काम आम्ही आनंदानें करू." या प्रसंगीं ते पुन्हा म्हणतात, "लोक विचारतात, प्रेमाच्या मार्गानें, अहिंसेच्या मार्गानें तें यशस्वी होण्याची शक्यता आहे का? ज्याचें सर्व जीवन कुटुंबातल्या लोकांच्या, आप्तस्वकीयांच्या प्रेमात च गेलेलें आहे त्यांनीं प्रेमाच्या शक्तीविषयीं संशय प्रकट करावा याचें च मला आश्चर्य वाटतें. आमचें जीवन च प्रेममय आहे. प्रेम च जीवनाचें मूलतत्व आहे, खरी गोष्ट अशी आहे कीं, कोणी हि माणूस दुर्जन असत नाहीं. आपण ज्याला दुर्जन म्हणतों तो दुर्जनतेच्या प्रवाहात अगतिकपणें निरुपायानें वाहत जात असतो. आणि म्हणून च त्याचें हि परिवर्तन करणें शक्य आहे. सद्गुण हे आत्म्याचे च असतात म्हणून कोणत्या हि माणसाचें परिवर्तन होऊं शकतें. सत्य आणि प्रकाश हीं भावरूप आहेत. असत्य आणि अंधकार अभावरूप आहेत. प्रकाशाच्यापुढें अंधकार टिकूं शकत नाहीं."

पूर्वी सांगितलें आहे कीं, भूदान यज्ञात ४० लक्षाहून अधिक एकर जमीन मिळाली आहे. समस्येच्या तुलनेनें ती कमी असली तरी जमिनीच्या मालकांनीं इतक्या थोड्या अवकाशात नि स्वार्थपणें इतक्या प्रमाणात जमीन भूदान-यज्ञात अर्पण करणें ही असंभवनीय गोष्ट होती. जगात किंवा येथें हि भूमिदान नवीन नाहीं. फार काळापासून लोक भूमिदान करीत आलेले

आहेत. पण आजपर्यंत लोकांनी जें भूमिदान केलें तें अशा भावनेनें केलें कीं जमीन त्याची च होती, अर्थात् जमिनीचे मालक ते च होते. आणि अशी जमीन मंदिराकरिता, मशिदीकरिता किंवा अशा च कांहीं योग्य कारणाकरिता दिली गेली होती. 'जमीन देवाची', 'जमीन सर्वांची', जमीन ही व्यक्तिगत संपत्ति असते ही कल्पना च सोडून देऊन ती गरीब भूमिहीनांकरिता देऊन टाकणें हें आपलें कर्तव्य आहे. गरीब भूमिहीनांना त्यांचा अधिकार परत द्यावयाचा आहे या जाणिवेनें गरिबांना जमीन देणें ही गोष्ट जगात प्रथम च होत आहे. इतक्या थोड्या दिवसात इतकें क्रांतिकारी भूमिदान मिळणें ही गोष्ट अहिंसेचा मार्ग यशस्वी होत आहे याचा स्पष्ट इशारा आहे. अहिंसेची क्रिया, प्रेमाची क्रिया लोकांच्या डोळ्यांसमोर स्पष्ट दिसू लागली आणि तिला अपूर्व यश मिळालें तेव्हां जग आश्चर्य-चकित होऊन गेलें. ओरिसामध्यें समग्र ग्रामदानाचें जें अपूर्व दृश्य दिसून आलें त्याच्या योगानें भूमिक्रांतीचा दरवाजा उघडला ही गोष्ट अहिंसेची प्रक्रिया शक्य आहे याचें मोठें सूचक आहे. भूदान यज्ञाचें आजचें यश कल्पनातीत असलें तरी तिचा हिशोब माणसाच्या गणितानें च केला जात आहे. परमेश्वराच्या गणिताची क्रिया अजून दृष्टिगोचर झालेली नाहीं. ती क्रिया अदृश्यपणें होत असते. ती जेव्हां प्रकाशात येईल त्या वेळीं भूदान यज्ञाच्या अपूर्व यशानें जग अधिक च आश्चर्यचकित होईल.

## ( २९ ) हिंसामार्गाचा विचार

जमिनीचा प्रश्न सोडविण्याकरिता, तसें च आर्थिक समता स्थापन करण्या-करिता, हिंसेचा आश्रय घेतला पाहिजे असें ज्यांना वाटतें त्यांच्या मनात अशी विचारधारा असते कीं, मनुष्य आज जसा आहे तसा च तो चिरकाल राहणार आहे. परंतु येथपर्यंत जें विवेचन केलें त्यावरून हें स्पष्ट आहे कीं, या म्हणण्याला कांहीं आधार नाहीं. मनुष्य विचारशील आहे. मनुष्याला सद्विचार समजावून दिला तर समजेल आणि आज नाहीं तरी उद्या तो त्याप्रमाणें आचरण करील. मनुष्य पशु नाहीं म्हणून हिंसेचा आश्रय घेण्याची आवश्यकता नाहीं. हिंसेचा मार्ग घेतला तर हा प्रश्न समाधान-

कारक रीतीनें सुटण्याचा संभव आहे का? असें समजा कीं, हिंसेच्या मार्गानें श्रीमंताजवळची जमीन काढून घेऊन गरिबांना देता येणें शक्य आहे; परंतु त्यायोगें जमीन तेवढी मिळेल परंतु प्रेम मिळणार नाहीं अर्थात् हृदयपरिवर्तन होणार नाहीं, विचारक्रांति होणार नाहीं. हृदय परिवर्तन आणि विचारक्रांति न करता ज्या ठिकाणीं जमीन श्रीमंतांच्या हातातून काढून घेतली जाते त्या ठिकाणीं प्रतिक्रांति किंवा हिंसक प्रतिक्रिया होण्याचा संभव असतो. हिंसेनें एखादा प्रश्न सुटला तर एका समस्येच्या ठिकाणीं आणखी पुष्कळ समस्या उत्पन्न होतात. हिंसेनें समस्या वास्तविकपणें सुटत नाहीं; उलट समस्या अधिक जटिल, अधिक अवघड होऊन बसते. हिंसेच्या निष्फलतेची गोष्ट समजावून देताना विनोबा म्हणतात, " परशुराम पृथ्वी निःक्षत्रिय करायला गेला, परंतु त्या प्रयत्नात तो स्वतः च क्षत्रिय झाला. यावरून हिंसेची निष्फलता सिद्ध होते. आणखी एका दृष्टीनें परशुरामाच्या उदाहरणावरून हिंसा सफल होत नाहीं हें दिसून येईल. परशुरामानें २१ वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली. एकदा निःक्षत्रिय केल्यानंतर पुन्हा निःक्षत्रिय करण्याचा प्रसंग अशू शकतो का? याचा अर्थ असा कीं, प्रथमपासून च निःक्षत्रिय होण्याचा संभव नव्हता आणि असणें शक्य नाहीं. यावरून हिंसेची निष्फलता सूचित होत आहे. हिंसेच्या मार्गानें प्रश्न सुटो किंवा न सुटो, सध्याच्या परिस्थितींत आपल्या देशात हिंसेच्या मार्गानें जमीन मालकाच्या हातून काढून घेऊन भूमिहीनाना कायमची देणें संभवनीय आहे का? तेलंगणामध्यें जमीनदाराच्याकडून बलात्कारानें जमीन काढून घेऊन दरिद्री शेतकऱ्याना दिली होती, परंतु ती जमीन पुन्हा त्याचें अधिक नुकसान करून त्याच्याकडून काढून घेऊन जमिनीच्या मालकाना परत देण्यात आली. जोंपर्यंत सुप्रतिष्ठित सरकारचें अस्तित्व आहे तोंपर्यंत हिंसेच्या मार्गानें जमीन काढून घेणें आणि ती कायमची हातात राखणें शक्य नाहीं." म्हणून विनोबा कम्युनिस्टाना उद्देशून म्हणतात, त्याना जर आपल्या हिंसेच्या मार्गानें गरीब लोकाना जमीन द्यावयाची असेल तर कम्युनिस्टानीं लहान लहान खून, जाळपोळ करायचें सोडून देऊन टोटल वॉर ( Total war ) करण्याला उद्युक्त व्हावें. टोटल वॉरमध्यें सर्व देश जर कम्युनिस्टाच्या ताब्यात आला तर च त्याचा उद्देश सिद्ध होऊ शकेल

नाही तर कोठें तरी रहून, एखाद्या ठिकाणीं जाळपोळ, वगैरे करून त्याचें काम झालें, तरी लागली च त्याच्यापेक्षा अधिक शक्तिशाली हिंसेच्या साधनांनीं ती जमीन त्यांचेकडून काढून घेतली जाईल यांत संशय नाहीं. काल, परिस्थिति, देशाचा इतिहास आणि संस्कृति, देशाच्या क्रांतीचा स्वभाव नियमित आणि नियंत्रित करीत असतात. रशियाच्या त्या वेळच्या परिस्थितीमध्यें आणि त्या काळीं ज्या तऱ्हेची क्रांति घडून आली तशी च क्रांति भारतांत हि होईल अशी गोष्ट नाहीं. उलट, काल, परिस्थिति, इतिहास आणि संस्कृति हि याच्या उलट दिशेला च बोट दाखवीत आहेत. भारतांतली क्रांति भारताच्या स्वतःच्या मार्गानें च घडून येईल. विनोबा यासंबंधीं म्हणतात, "क्रांति शब्दाचा अर्थ साम्यवादी लोकांपेक्षा मी अधिक चांगल्या तऱ्हेनें जाणतों. क्रांतीचा स्वभाव देश आणि कालाला अनुसरून बदलत असतो. मार्क्सनें ज्याप्रमाणें लिहिलें त्याप्रमाणें क्रांति प्रत्येक देशांत सर्व काळीं होणें शक्य नाहीं. भारताची क्रांति त्याच्या स्वतःच्या मार्गानें च होईल. भारताच्या संस्कृतीचा अभ्यास करून मी या सिद्धान्ताला पोंचलों आहें कीं, दुसरे देश भारतापासून अनेक विषयांचे धडे घेऊं शकतील. मी ज्या क्रांतीची खटपट करीत आहें ती भारतीय संस्कृतीला अनुकूल आहे. ती छापील हिंसक क्रांति नाहीं. हा विचार पूर्णपणें समजून घेऊन आमच्या कार्यकर्त्यांनीं भूदान यज्ञाच्या कार्यांत आत्मसमर्पण करावें अशी माझी इच्छा आहे." समाजातल्या एका व्यक्तीकरिता दुसऱ्या व्यक्तीचा नाश केला पाहिजे ही गोष्ट केव्हा हि उचित नाहीं असें च भारतीय संस्कृतीचें सांगणें आहे. या संस्कृतीच्या पायावर क्रांति आधारली तर च भारतांत क्रांति होईल.

साधारणतः असें समजलें जातें कीं, मार्क्सच्या 'डायलेक्टिकल मटीरियालिझम्' चा स्वीकार केला तर साम्यवादाचा सिद्धान्त सिद्ध करायला आणि क्रांति घडवून आणायला हिंसेचा आश्रय घेणें अनिवार्य असतें. परंतु विनोबांना असें वाटत नाहीं. याबाबतीं त्यांनीं जें म्हटलें आहे त्यावरून अनेकांचे डोळे उघडतील यांत संशय नाहीं. ते म्हणतात, "मी डायलेक्टिकल मटीरियालिझम्ला (Dialectical Materialism) 'वैतर्किक वस्तुवाद' हें नांव देतों. त्याला 'भौतिकवाद' हें नांव योग्य नाहीं.

खाणेंपिणें, चैन करणें हें जीवनाचें सार आहे असें जे मानतात त्याना भौतिकवादी म्हणतात. वितर्कवाद ही एक विचारपद्धति मात्र आहे. तिच्यातून क्रांतीचा सिद्धान्त उद्भवू शकतो तसा उपक्रांतीचा सिद्धान्त हि निघतो. आंब्याच्या झाडावर कलम करून ज्याप्रमाणें त्याला गोड फळ आणता येतें, त्याप्रमाणें आंबट फळ आणता येईल असें हि करता येतें. थिसिस, ॲन्टिथिसिस आणि सिंथिसिस ( Thesis, Antithesis, Synthesis ) याची अशी क्रिया चालते. या सिद्धान्तावरून क्रांतीबद्दल फसा उत्साह वाटेल आणि श्रीमंतांचें खून केले पाहिजेत असें कसें वाटेल हें मला समजत नाहीं.

" प्रत्येक वस्तूमध्यें गुण आणि दोष दोन्ही असतात. दोषयुक्त वस्तूवर गुणयुक्त वस्तूचें आक्रमण झालें तर तिसरी च एक वस्तु उत्पन्न होईल, जीमध्यें या दोन्हींचे दोष असणार नाहींत, परंतु या दोन्हींचे गुण मात्र असतील. आज समाजात एक विचार चालत आहे कीं, प्रत्येकाला त्याच्या योग्यतेप्रमाणे मेहनताना मिळाला पाहिजे. या म्हणण्यात एक गुण आहे तो असा कीं, त्यामुळें काम करायला उत्साह उत्पन्न होतो. पण त्यात एक दोष असा आहे कीं त्यामुळें दुर्बलाचा सर्वनाश होतो. म्हणून या विचाराच्या विरुद्ध समतेचा विचार उभा केला जातो, परंतु त्यात हि एक दोष आहे. त्याच्या योगानें आळशी लोकाचें फावतें. सर्व संपत्ति एका माणसाच्या हातात जमा करण्याची जी क्रिया चालते तिची प्रतिक्रिया म्हणून आत्यंतिक समतेची गोष्ट खडी होते, परंतु त्यात हि दोष आहेत. याचा परिणाम हा होईल कीं, एक तिसरा च विचार उत्पन्न होईल, ज्यामध्यें या दोन्हींतील ग्राह्य अंश असतील परंतु त्यातले त्याज्य अंश असणार नाहींत. यापुढें या नवीन वस्तूमध्यें जर काहीं दोष राहतील तर त्याविरुद्ध आणखी एखादी तिसरी गोष्ट उभी राहील. तेव्हा पुन्हा अशी प्रक्रिया सुरू होईल. याप्रमाणें वितर्कवाद ही एक विचारप्रणाली मात्र आहे. तिच्यातून, मार्क्सनें तसें म्हटलें आहे तरी, एखादी विशिष्ट आचारप्रणाली उत्पन्न होण्याचा संभव नाहीं. साम्यवादाचा सिद्धान्त वितर्कवादाच्या विचारप्रणालींतून च उत्पन्न होतो; आणि केवळ साम्यवाद च या विचारप्रणालींतून उत्पन्न होणें शक्य आहे.

दुसरें काहीं नाहीं. परंतु एका विचारप्रणालींतून एक विशिष्ट सिद्धान्त उत्पन्न होणें अनिवार्य आहे ही गोष्ट मला मान्य नाहीं.

जमीन काढून घेऊन म्हणजे Expropriation करून रशिया वगैरे देशात क्रांति झाली, परंतु भारतामध्यें क्रांतीनें अपरिग्रहाची ( Non-possession ) दीक्षा घेतली आहे. या गंभीर तत्त्वाचे विवरण विनोबांनीं असें केलें आहे : "मी जो विचार प्रस्थापित करू इच्छितों, त्याच्या विरोधी जो विचार आज समाजात प्रचलित आहे त्याला 'अपहरण' म्हणतात. या 'अपहरण' विचारावर ज्याचा विश्वास आहे त्याचें मत असें कीं, व्यक्तीचें अस्तित्व समाजाकरिता आहे आणि समाजाच्या हिता-करिता व्यक्तीच्या संपत्तीचें 'अपहरण' करण्यात दोष नाहीं. उलट जे व्यक्तीच्या संपत्तीचें 'अपहरण' करण्यात अडचण आणतील, त्यांची विचारप्रणाली भ्रममूलक आहे या विचाराकडे आज पुष्कळ देश आकर्षित झाले आहेत. या विचाराविरुद्ध मीं 'अपरिग्रह' विचार उभा केला आहे. साधारणतः लोकाना असें वाटतें कीं 'अपरिग्रह' गांधी-विनोबासारख्या सन्यासी लोकाना योग्य आहे, सामान्य लोकाना 'अपरिग्रह' उपयोगाचा नाहीं. लोभ उपयोगी आहे. सन्यासाला श्रेष्ठ आदर्श म्हणून मानावें, परंतु गृहस्थजीवनात 'परिग्रह' आचरणात आणला जावा. धर्मविचाराचे या-प्रमाणें तुकडे केले तर त्याचें फल हि संकुचित च होईल. याचें फळ हें होईल कीं, निर्लोभी माणूस लोभी माणसाच्या विरुद्ध उभा राहील आणि स्वतः हि लोभी होईल. परशुराम क्षत्रियत्व दूर करावयाला निघाला तेव्हा स्वतः च क्षत्रिय होऊन गेला. हा दृष्टान्त तर आपल्या समोर च आहे. ज्याचा विरोध करायचा आहे त्याचें शस्त्र जर आम्हीं मान्य केलें तर त्याचें स्थूल रूप आपण नष्ट करू शकू; पण सूक्ष्म रूपानें त्याला आपण अमर करू. आज जगामधें लोभाचें आणि परिग्रहाचें राज्य चाललें आहे. परिग्रहाच्या आस-पास असा कायदा उभा केला गेला आहे कीं, परिग्रह अन्याय्य आहे असें कोणाला वाटत नाहीं. चोरीला आपण गुन्हा समजतों, परंतु जी व्यक्ति संग्रह करून चोरी करण्याची प्रवृत्ति निर्माण करते तिला आपण चोर म्हणत नाहीं. उपनिषदातल्या एका गोष्टींत राजा म्हणतो कीं, 'माझ्या राज्यात कोणी चोर नाहीं—कृपण हि नाहीं.' कारण कृपणामुळें च चोर

उत्पन्न होतो. चोराला आम्ही तुरुंगात पाठवतों आणि चोराच्या जन्मदात्याला मोकळा ठेवतों. उलट, त्या मानानं गादीवर बसतो. हा कसला विचार ? गीता हि अशाला चोर म्हणते परंतु आज संन्याशी लोकांचे प्रथ मनात आणून आपण गीतेचा त्याग करून बसलों आहोंत.

## ( ३० ) जमिनीचा प्रश्न इतके दिवस हातीं न घेण्याचें कारण

जमिनीचे मालक असें म्हणू शकतात कीं, दुसरे लोक पैसा मिळवून तो पैसा कारखान्यात, घरात गुंतवून किंवा बँकेमध्यें ठेवून आराम करत आहेत. आम्हीं त्याप्रमाणें आमचा साठविलेला पैसा जमिनीमध्यें गुंतविला आहे यात आमचा काय दोष ? सर्व जमीनमालकांनीं जमीन अन्यायानें च मिळविली आहे असें नाहीं. तो प्रश्न च येथें उत्पन्न होत नाहीं. न्यायानें असो, अन्यायानें असो, जी जमीन त्यांच्या ताब्यात आहे ती त्यांची नाहीं ती परमेश्वराची आहे त्या जमिनीवर सर्वांचा समान अधिकार आहे. युगेंच्या युगे निघून गेलीं आहेत, आजपर्यंत तो प्रश्न का उभा राहिला नाहीं म्हणून तर त्यांनीं याप्रमाणें भूमिसंग्रह केला, जमीन मिळविली. जोंपर्यंत लोकसंख्या कमी होती आणि जमीन पुष्कळ होती, तोंपर्यंत हा प्रश्न पुढें येण्याची आवश्यकता नव्हती, म्हणून हा प्रश्न उभा राहिला नाहीं. आज लोकसंख्या ज्यास्त आणि जमीन कमी आहे. दारिद्र्याच्या चरकात सर्व समाजाचा देह पिळून निघाला आहे, म्हणून हा प्रश्न उत्पन्न झाला आहे, म्हणून परिस्थितीच्या दाबानें हें मौलिक सत्य समाजामध्यें जाग्रत झालें आहे. अमेरिकेंत हा प्रश्न उद्भवला नाहीं, ऑस्ट्रेलियात हि नाहीं, कारण त्यांचे येथें प्रयोजन हि नाहीं. इंग्लंडमध्यें अजून हि तो उठलेला नाहीं. पण त्याचें कारण वेगळें आहे. त्या ठिकाणीं जमिनीच्या अभावानें उत्पन्न होणारें दारिद्र्य दूर करण्याची संधि दुसऱ्या उपायानें मिळालेली आहे. भारतात हें सत्य मानल्याशिवाय आणि ग्रहण केल्याशिवाय गत्यंतर नाहीं, म्हणून या प्रश्नाची आज सर्वापेक्षा ज्यास्त आवश्यकता आहे.

## (३१) दान शब्दाला विरोध

गरिबावर दया करणें, उपकार करणें, हें पुण्यकर्म आहे असें गणलें जातें. सामान्य लोक पुण्यकर्म कशाला समजतात? जी गोष्ट मनुष्याच्या व्यक्तिगत अथवा सामाजिक कर्तव्यामध्यें पडत नाहीं, परंतु जी गोष्ट मनुष्य दयेनें प्रेरित होऊन दुसऱ्याच्या उपकाराकरिता करतो, असें कांहीं केलें तर पुण्याचा लाभ झाला असें म्हटलें जातें. यामध्यें असा विचार अंतर्भूत आहे कीं, दारिद्र्य आणि दुःख याबद्दल श्रीमंत माणूस कोणत्या हि प्रकारें जबाबदार नाहीं, आणि लोकांतलें दारिद्र्य दूर करणें हें त्याचें मुळीं च कर्तव्य नाहीं. अर्थात् श्रीमंतापासून कांहीं मिळविण्याचा हक्क गरिबाला नाहीं. परंतु खरोखर पाहतां श्रीमंती आणि दारिद्र्य यांची एकदम च उत्पत्ति होते. तिचें कारण शोषण हें आहे. एकाकडून दुसऱ्याच्या उपजीविका करण्याचा स्वाभाविक अधिकार काढून घेतला जातो तेव्हां च एक जण श्रीमंत होतो आणि दुसरा गरीब होतो. म्हणून गरिबाकरिता त्याचा हक्क म्हणून च श्रीमंताकडून जमीन मागायची आहे. श्रीमंतानें दान दिलें आणि गरिबानें तें घेतलें म्हणजे श्रीमंताचे गरिबावर उपकार झाले असें होईल. यामुळें गरिबाचा मान राहणार नाहीं, ही गोष्ट भिक्षेच्या पायावर उभारलेली समाजाची सध्याची रीति आहे म्हणून महाभारतांत 'दरिद्रान् भर कौंतेय' अथवा खिस्ती धर्मांत 'चॅरिटी' आणि मुसलमानांमध्यें 'जकात' या पद्धतीमुळें गरिबांना खरा आशेचा किरण दिसत नाहीं कारण तें भिक्षेनें मिळालेलें अन्न दुसऱ्याच्या मेहेरबानीनें मिळतें. समाजांतल्या खालच्या थरांतल्या दुर्दैवी लोकांचें दैन्य श्रीमंतांच्यापुढें हात पसरून नाहींसें होणारें नाहीं. त्याच्यामागे शापणवत्र मूक रीतीनें काम करीत असतें म्हणून भूदान यज्ञामध्यें दान शब्दाचा उपयोग करण्याबद्दल कांहीं लोकांचा विरोध असू शकतो भूदान-यज्ञ तर गरीब भूमिहीनांच्या हक्काच्या भूमिकेवर च त्यांना जमीन देण्याचें आवाहन करतो. मग या ठिकाणीं दान शब्दाचा उपयोग कां करण्यांत आला आहे? यज्ञ, दान आणि तप या तीन शब्दांनें भारताच्या संस्कृतीच्या क्षेत्रांत फार मोठें स्थान आहे. या शब्दाच्या उपयोगानें भारतीय मनुष्याला महान् कार्य करण्याला न्यायमार्गें प्रेरणा दिली आहे तशी

देणें दुसऱ्या शब्दाच्या प्रयोगाने शक्य नाहीं. म्हणून भिन्न कालीं तशी च प्रेरणा मिळावी म्हणून त्या शब्दाचा विस्तार करण्यात आलेला आहे. गीतेमधें यज्ञ शब्दाचा अर्थ निःस्वार्थ सेवा. या अर्थानें त्याचा उपयोग करून त्याचा विकास करण्यात आला आहे. याला शब्दक्रांति म्हटलें जाईल. म. गांधींनी हि वर्णव्यवस्था, ट्रस्टीशिप इत्यादि शब्द नवीन अर्थानें उपयोग करून या शब्दाच्या भावार्थात क्रांति घडवून आणली आहे. म्हणून शास्त्रज्ञ विनोबांनी दान शब्दाचा त्याग न करिता एका क्रांतिकारक अर्थानें भूदान यज्ञात त्याचा समावेश केला आहे. शंकराचार्य म्हणतात, "दान संविभाग" दान शब्दाचा 'अर्थ सम्यग् विभाजन अथवा योग्य वाटप या अर्थानें च भूदान यज्ञातल्या 'दान' शब्दाचा व्यवहार करण्यात आला आहे. आपल्याजवळ जें काहीं आहे त्याचें योग्य वाटप करणें हा दान शब्दाचा अर्थ. अशा प्रकारच्या दानामधें जो दाता असतो त्याचें हृदयपरिवर्तन होत असतें. दानाचा प्रचलित अर्थ जो आपल्या स्मृतिपटलावर कोरून राहिला आहे तो हा "स्वस्वत्वध्वंसपूर्वकपरस्वत्वोत्पत्त्यनुकूलत्याग दान" अर्थात् आपलें स्वत्व नष्ट करून त्या ठिकाणीं दुसऱ्याचें स्वत्व म्हणजे मालकी उत्पन्न करण्याकरिता जें दिलें जातें त्याला 'दान' म्हणतात. दानाच्या या प्रचलित अर्थानें येथें तो वापरलेला नाहीं. विनोबा म्हणतात, 'दानाचा जो प्रचलित अर्थ आहे तो दानाच्या खऱ्या अर्थाची विकृति मात्र आहे. दानाचा खरा अर्थ आहे संविभाग.' त्यासंबंधीं विनोबा म्हणतात— "मी भिक्षा म्हणून दान मागत नाहीं. त्याप्रमाणें धर्म, विज्ञान, त्याग, नीति इत्यादि शब्दांचे अर्थ विकृत करण्यात आले आहेत, त्याप्रमाणें दान या शब्दाचा अर्थ लोकांनीं विकृत करून टाकला आहे या नवीन अर्थामधें गरिबांचा अधिकार म्हणून च श्रीमंताकडून जमीन मागणें हा भाव अंतर्गत आहे. जमीन ईश्वराची देणगी आणि उत्पादनाचें मौलिक साधन आहे, ही गोष्ट बाजूस टेविली तरी दुसऱ्या एका दृष्टीनें भूदान यज्ञातल्या दान शब्दातला वरील अर्थ अत्यंत उपयोगी आहे. मनुष्य हा एक सामाजिक प्राणी आहे मनुष्याला सध्या जें काहीं मिळालें आहे किंवा जें करण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें आहे तें मिळण्याच्या क्रिया करण्याच्या कामात सर्व समाजाचा प्रत्यक्ष किंवा

अप्रत्यक्ष साहाय्य त्याला मिळालेले असते. या कारणाकरिता मनुष्य समाजाचा ऋणी असतो, आणि समाज प्रत्येक मनुष्याकडे त्या सर्वांतला अंश मिळविण्याचा हक्कदार असतो. अर्थात् या दृष्टीने दान शब्दाचा हा अर्थ सहज लाभदायक आहे, म्हणून भूदान यज्ञाच्या द्वारा श्रीमंताजवळ विनोबा भिक्षेचा संदेश मात्र देत आहेत असे ज्यांना वाटते त्यांची ती धारणा भ्रममूलक आहे.

भूदान यज्ञातला दान शब्द त्याच्या प्रचलित अर्थाने वापरलेला नाहीं, वेगळ्या अर्थाने. ही गोष्ट विनोबांनी स्पष्ट सांगितली आहे. यासंबंधीं विनोबा म्हणतात, " भूदान-यज्ञातला दान शब्द कित्येक जणांना खटकतो. काहीं लोकांनीं एका नवीन विवाहविधीची रचना केली आहे. जेव्हा ते या विधीची रचना करू लागले तेव्हा ' कन्यादान ' शब्द त्यांना खटकू लागला. गाय म्हशींच्या दानाप्रमाणें कन्येचें दान का करायचें ? मूळ विवाहविधींत ' कन्यादान ' शब्द हि नाहीं. त्या ठिकाणीं ' संप्रदान ' हा अर्थवाही शब्द आहे. त्याचा अर्थ केवळमात्र ' दिली आहे ' एवढा च आहे. तिचें दान केलें आहे या अर्थी नाहीं. जी वस्तु आमच्या मालकीची आहे ती आज-पासून तुमच्या मालकीची झाली हा अर्थ त्यात नाहीं. केवळ "दिली आहे ' एवढें म्हटलें म्हणजे त्यात काहीं गौणत्व जाणवत नाहीं. म्हणून त्या नवीन विवाहविधीमध्ये कन्यासंप्रदान शब्द वापरण्यात आला आहे.

भूदान-यज्ञामध्ये अशा च प्रकारची कल्पना आहे. जमिनीचा मालक तिचा स्वामी नाहीं, तो कन्येच्या पित्याप्रमाणें तिचा प्रतिपालक मात्र आहे. सत्पात्र पाहून त्याला ही जमीन संप्रदान करायची आहे. अशा प्रकारे सत्पात्र शोधायचें हि आहे. असें करण्यात मालकीची कल्पना कोठे हि नाहीं.

## ( ३२ ) भूदान-यज्ञांतल्या यज्ञ शब्दाचा अर्थ आणि उद्देश

ग्रंथाच्या सुरुवातीस यज्ञ शब्दाच्या व्युत्पत्तीवरून निघणारा अर्थ देण्यात आला आहे. तो असा कीं, यजति पूजयति इत्यर्थः, अर्थात् यज्ञ म्हणजे पूजन. परंतु गीतेनें यज्ञ शब्दाच्या अर्थाचा विकास केला आहे. विनोबांनीं आपल्या गीताप्रवचनामध्ये यज्ञाच्या—गीतेंत सांगितलेल्या—अर्थाचें अतिशय

सुंदर विवरण केलें आहे, तें थोडक्यांत असें आहे :— आपण जन्मतां च तीन संस्था बरोबर घेऊन जन्म घेत असतों. कोणत्या त्या तीन संस्था ? (१) हें जें विशाल ब्रह्माण्ड आहे किंवा ही अपार सृष्टि आहे तिचा आपण एक अंशमात्र आहों. (२) ज्या समाजांत आमचा जन्म झाला आहे तो समाज आई-बाप, भाऊ-बहिणी, शेजारी इत्यादिकांनीं बनलेला आहे. (३) देह, मन आणि बुद्धि यांचें संगठन. रोजच्या व्यवहारात आपण आपल्याभोंवतींच्या सृष्टीचा उपयोग करीत असतों. त्यामुळें सृष्टीचा जो क्षय होतो तो भरून काढणें हा यज्ञाचा पहिला हेतु. हजारों वर्षांपासून जमिनीमध्यें शेती केली जात आहे. त्यामुळें तिच्या उत्पादकतेचा जो क्षय होतो तो भरून काढणें हा यज्ञाचा दुसरा हेतु. सृष्टीचा उपयोग केल्याकारणानें तेथें जी घाण जमत असते तिचें शुद्धीकरण. जसे विहीर वापरतांना तिच्याभोंवतीं जी घाण होते ती स्वच्छ करणें. तिसरा अर्थ कांहीं तरी प्रत्यक्ष निर्मितीचें कार्य करणें. जसें कापसापासून सूत कांतणें आणि विणून कापडाच्या उत्पन्नात भर घालणें किंवा नवीन वस्त्र तयार करणें. यज्ञात जें निर्माण करावयाचें तें स्वार्थासाठीं नव्हे. आपण जी झीज केली ती भरून काढण्याची कर्तव्यभावना तेथें असली पाहिजे. हा परोपकार नाहीं. आपण आधीं च ऋणी आहोंत. समाजामध्यें आई बाप, शेजारीपाजारी, गुरु, मित्र इत्यादि लोकांच्या सेवेमुळें आपलें पोषण झालें आहे. त्याची सेवा करून समाजाचें तें ऋण परत करण्याच्या प्रक्रियेला 'दान' म्हटलें आहे. मन, बुद्धि आणि इंद्रियें यांनीं बनलेल्या शरिराचा जो रोज ऱ्हास चाललेला आहे, त्यामुळें जे विकार किंवा दोष उत्पन्न होतात, ते शुद्ध करणें याला 'तप' म्हणायचें. परंतु यज्ञ, दान, तप असे वेगवेगळे करून दाखविण्याची आवश्यकता नाहीं. कारण मूलतः त्याच्यामध्ये कांहीं भेद नाहीं. तिन्ही मिळून एक च भव्य सृष्टिसंस्था होते. सृष्टीमध्यें च समाज आणि शरीर यांचा समावेश होतो; म्हणून यज्ञाचा जास्त व्यापक अर्थ असा होतो कीं, समाजाशीं संबंध आल्यामुळें जी दानक्रिया केली जाते तो हि यज्ञ आणि शरिराच्या संबंधीं जी तपःक्रिया केली जाते तो हि यज्ञ. विनोबांनीं भूदान-यज्ञाच्या पायावर जी क्रांतिकारी चळवळ केली आहे तिच्या योगानें यज्ञाचे हे तीन उद्देश सिद्ध होतील म्हणून या

आंदोलनाला ' भूदान यज्ञ ' हें नाव दिलें आहे. यामुळे क्षयपूर्ति, शुद्धीकरण आणि संगटन ते तीन्ही उद्देश साध्य होतील.

**( १ ) क्षयपूर्ति :** जमिनीच्या दुर्व्यवस्था आणि ग्रामोद्योगाचा नाश झाल्यामुळें दारिद्य, बेकारी, शिक्षणाचा अभाव वगैरे गोष्टी उत्पन्न होऊन समाजाचा जो क्षय होत आहे तो भूदान-यज्ञामुळें, भूमीचें योग्य वाटप आणि ग्रामीणकरण झाल्यामुळे, ग्रामोद्योगाचें पुनरुज्जीवन आणि मूलोद्योगी शिक्षण वगैरेंची सुरुवात केल्यानें तो नाश वा क्षय भरून येणार आहे. थोड्या च लोकांच्या हातीं जमीन राहिल्यामुळें जमिनीची मशागत चांगली होत नाहीं, जमीन पडून राहते आणि तिची चांगली मशागत न झाल्यामुळें सृष्टीचा जो क्षय होत आहे तो हि भूदान यज्ञामुळें भरून येणार आहे.

**( २ ) शुद्धीकरण :** भूदान दात्याच्या अंत करणात त्याग आणि प्रेमाचा भाव उत्पन्न करून त्यांची चित्तशुद्धि घडवून आणील. गरीब लोकांची दुसऱ्यावर अवलंबून राहण्याची वृत्ति सोडून देऊन त्यांचा स्वावलंबनावर आत्मविश्वास वाढून ते हि समृद्ध होतील. त्यांचें दारिद्य दूर होईल. व्यक्तिगत मालकीची कल्पना च नष्ट झाल्यामुळें सर्व समाजाचें हृदय च परिशुद्ध होईल.

**( ३ ) रचनात्मक कार्य :** भूदान यज्ञाचें शेवटचें काम साम्ययोगी समाजाची स्थापना करणें. हें सर्वांत मोठें रचनात्मक कार्य आहे.

अशा प्रकारें भूदान यज्ञाच्या माध्यमातून एका महान् यज्ञाचें अनुष्ठान होत आहे.

## ( ३३ ) तप

तपासवर्धी विनोबा म्हणतात, " प्राचीन ऋषि आणि गीता यांनीं तीन वस्तूंची व्यवस्था केली आहे. त्या म्हणजे यज्ञ, दान आणि तप. भूदान-यज्ञाच्याद्वारें मीं यज्ञाचें आणि दानाचें आवाहन केलें आहे; परंतु जर आम्हीं तपश्चर्या केली नाहीं तर दान आणि यज्ञ सिद्ध होणार नाहीं. या तीन गोष्टी मिळून एक संपूर्ण वस्तु आहे. त्या अविभाज्य आहेत. कार्यकर्त्यांनीं तप केलें पाहिजे. दान आणि यज्ञ लोकांनीं करावयाचा आहे. म्हणून आम्हीं कार्यकर्त्यांनीं पराकाष्ठा करून तपाचें साधन केलें पाहिजे."

## ( ३४ ) प्रजा-सूय यज्ञ

समाजामध्यें परंपरेनें कित्येक पुरातन महान् शब्द प्रचलित आहेत. ज्या शब्दावर लोकांची श्रद्धा बद्धमूल होऊन गेलेली असते ते शब्द सोडून न देता समाजाच्या सध्याच्या आवश्यकतेप्रमाणें त्यांना नवीन अर्थ देऊन त्यांचें रूप विकसित करून त्यामध्यें नवजीवन संचार करणें ही अहिंसक प्रयोगाची एक उत्कृष्ट प्रक्रिया आहे. हें इतक्या हळुवारपणें करायचें कीं जुन्या शब्दांतून नवीन अर्थ काढला जात आहे अशी लोकांना जाणीव होता कामा नये. भारतीय परंपरेमध्यें जो समन्वय साधला गेला आहे तो हि या अहिंसक प्रक्रियेमुळें च. गीतेंमध्यें यज्ञ शब्दाचा अर्थ अशा तऱ्हेनें विकसित केला आहे. म. गांधींनीं वर्णव्यवस्थेच्या जुन्या कल्पनेशीं समाजाच्या सध्याच्या आवश्यकतेनुसार नवीन अर्थ जोडून दिला. ट्रस्टी शब्दाचा उपयोग हि त्यांनीं अशा च प्रकारें नवीन केला आहे. विनोबा हि शब्दांचे असे प्रयोग करण्यांत सिद्धहस्त आहेत. ‘ भूदान-यज्ञ ’ शब्द हें त्यांचें उत्कृष्ट उदाहरण आहे. त्यामध्यें दान, यज्ञ, तप वगैरे परंपरागत गोष्टींचा वर्तमान समस्येशीं संयोग करण्यांत आला आहे. या प्रक्रियेनें च राजसूय यज्ञाच्या कल्पनेला सामान्य लोकांच्या सामाजिक, आर्थिक आणि राजकीय हक्काच्या प्रगतीच्या ध्येयाशीं जोडून देऊन भूदान-यज्ञाला ‘ प्रजासूय यज्ञ ’ असें नाव त्यांनीं दिलें आहे. राजसूय यज्ञाचा अर्थ आहे राजाचा अभिषेक, त्याप्रमाणें प्रजासूय यज्ञाचा अर्थ आर्थिक, राजकीय आणि सामाजिक क्षेत्रांत सामान्य लोकांचें सार्वभौमत्व.

## ( ३५ ) भू-कुरबानी–जमिनीचें बलिदान

भूदान यज्ञाला इस्लाम धर्माच्या भाषेंत ‘ भू कुरबानी ’ म्हणतां येईल. मुसलमान लोकांना हा शब्द सहज समजेल आणि त्यांच्या अंत:करणाला पटेल. बंगालचे पुढारी श्री. चारुचंद्र भंडारी १९५४ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत भूदान-यज्ञाचा प्रचार करण्याकरितां मालदा जिल्ह्यांत पदयात्रा करीत होते. तेव्हां त्यांच्या सभेमध्यें मुसलमान शेतकऱ्यांची संख्या जास्त प्रमाणांत हजर असे. ते मुसलमान लोक मोठ्या आग्रहानें आणि अंत:करण-पूर्वक भूदान-यज्ञाची भावधारा ऐकून घेत, पण भूदान यज्ञ शब्दाचा त्यांनीं

सहज बोध होत नसे, आणि त्याच्या अंतःकरणात तो तितका स्थिर नसे. ही गोष्ट लक्षात आली तेव्हा त्यांनीं भूदान यज्ञाच्या ऐवजीं भू कुरबानी म्हणायला सुरुवात केली. त्याचा फार उपयोग झाला. यासंबंधीं त्यांनीं विनोबांना लिहिलें तेव्हा विनोबांनीं त्यांना उत्तर दिलें, " मुसलमान लोकांना समजावून देण्याकरितां ' कुरबानी ' शब्दाचा उपयोग करणें हो फार उचित गोष्ट आहे. भूदान यज्ञापेक्षा मोठी कुरबानी म्हणजे आत्मसमर्पण आणखी मोठें कोणतें असू शकेल ?

## ( ३६ ) न समजतां दान देण्याचा निषेध

या आंदोलनात दात्याच्या अंतःकरणाचें परिवर्तन घडवून आणणें ही सर्वांत मोठी गोष्ट आहे. म्हणून विनोबांनीं प्रथमपासून च सर्वांना सावधानीचा इषारा दिला आहे कीं, कोणी हि भूदान यज्ञात अंतर्भूत असलेला उद्देश समजल्याशिवाय दान देऊ नये. कारण न समजता दान दिलें तर जमीन मिळेल खरी, परंतु समाजात क्रांति घडवून आणण्याचा भूदान यज्ञाचा उद्देश व्यर्थ होईल. म्हणून त्यांनीं ' भारतवासीयास ' या नावाचें पत्रक काढलें आहे त्यांत हा सावधानतेचा इषारा दिला आहे. त्यात ते म्हणतात, ' आमचीं तीन सूत्रें ' आहेत —

( १ ) आमचें म्हणणें न समजल्यामुळें जर कोणी आम्हाला जमीन दान देणार नाहीं तर त्याबद्दल आम्हाला दुःख नाहीं, कारण आम्ही मनात म्हणू, जो आज देणार नाहीं तो उद्या देईल. ' विचारबीजाला अंकुर फुटल्याशिवाय राहणार नाहीं '

( २ ) आमचें म्हणणें समजून घेऊन जो कोणी आम्हाला भूमिदान देईल तर आम्हाला आनंद वाटेल. कारण त्याच्या योगानें सद्भावना निर्माण होईल.

( ३ ) आमचें म्हणणें न समजता च कुणाच्या दडपणामुळें जर कोणी आम्हाला दान देईल तर त्याचें आम्हाला दुःख होईल. कारण कसल्या हि युक्तप्रयुक्त मार्गानें जमीन गोळा करणें हा आमचा उद्देश नाहीं आम्हाला सर्वोदयाची मनोवृत्ति निर्माण करायची आहे. असें असून हि कित्येक लोक

नीट समजून न घेता दुसऱ्यानीं दिलेलें पाहून दान दिलें आहे आणि पुढें हि देतील. हें सर्व दान भूदान-यज्ञात दिलेलें दान असें म्हणता येईल का? असलें दान दिलेलें 'श्रद्धेनें' दिलें आहे असें म्हणता येईल, कारण दुसऱ्यानें दिलेलें पाहून देणें याचा अर्थ च श्रद्धेनें देणे. कोणतें हि काम श्रद्धेनें करणें हें धर्माकडे तोंड वळल्याचें एक लक्षण आहे. म्हणून असलें दान भूदान-यज्ञात ग्राह्य आहे. तरी पण ज्यानीं दान दिलें आहे व जे देतील त्याना या दानाचा उद्देश जोंपर्यंत नीटपणे समजला नाहीं तोंपर्यंत भूदान-यज्ञ सफल झाला असें *म्हणता येणार नाहीं.*

## ( ३७ ) श्रीमंतांचें मन वळविण्याचा प्रश्न

असें म्हटलें जातें कीं, श्रीमतानीं जें दान दिलें आहे तें अंतःकरणपूर्वक दिलेलें नाहीं. त्यात त्याचें कपट आहे, असें समजण्याचें काहीं कारण नाहीं. यासंबधीं विनोबा म्हणतात, "मनुष्याच्या हृदयात सत् आणि असत् याचा सर्वदा झगडा चाललेला असतो. विचार करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला याचा अनुभव आहे. या द्वंद्वामुळें सताचें म्हणजे चांगल्याचें रक्षण आणि असताचा म्हणजे वाइटाचा नाश होत असतो. श्रीमताच्या हातून कोठें ना कोठें अन्याय झालेला असतो यात संशय नाहीं. अन्यायाचा मार्ग अवलंबन केल्याशिवाय का कधीं हजारों एकर जमीन मिळण्याची शक्यता आहे? ज्या श्रीमतानीं दान दिलें आहे त्याच्या हृदयात अशा प्रकारचें द्वंद्व सुरु होईल कीं 'आम्ही जें करीत आहों तें योग्य आहे का?' परमेश्वर त्याना सुबुद्धि देईल, ते अन्यायाचें परिमार्जन करतील आणि त्याचें हृदयपरिवर्तन घडून येईल.

## ( ३८ ) श्रीमंतांची प्रतिष्ठा वाढविण्याचा प्रश्न

कोणी असा आक्षेप घेतात कीं, विनोबा आपल्याला श्रीमताचा भाऊ, मुलगा असें म्हणवून घेऊन त्याना निष्कारण प्रतिष्ठा देत आहेत. पण ही गोष्ट बरोबर नाहीं. याला विनोबाचें असें उत्तर आहे कीं, "त्याना प्रतिष्ठा द्यायची नाहीं तर काय त्याची अप्रतिष्ठा करायची? त्याच्याकडून त्यानें कर्तव्य करून घेऊन त्याची प्रतिष्ठा मी वाढवू च

इच्छितो. यामुळें आपलं काय बिघडेल? यात आक्षेप घेण्यासारखें काय आहे? असें न करिता त्यांच्याकडून बदमाशी करून घेऊन त्यांना अपमान करून घेऊं की काय? आजपर्यंत त्यांच्या हातून बदमाशी झाली पुढें हि त्यांनीं बदमाशी करावी याकरिता का त्यांना माझें साहाय्य पाहिजे? त्याची आवश्यकता नाहीं. त्यांच्या हातून त्यांचें कर्तव्य करून घेणें ही च गोष्ट योग्य आहे. त्यांच्या प्रतिष्ठेला धक्का न लागता च त्यांचें प्रेम वाढवून दान घेतलें पाहिजे जे दान देतात आणि जे दान घेतात यात दोघांचें हि भलें आहे अशी भावना मनात धरून जर काम केलें तर कल्पवृक्षाप्रमाणें फळ लाभेल. नाहीं तर एक मूठ माती मात्र मिळेल धमकी देऊन काम करून घेण्यात आम्हाला आनंद नाहीं कोणत्या हि प्रकारच्या देण्याघेण्याचा भाव यामध्ये नाहीं आमच्यामध्यें अशी श्रद्धा असली पाहिजे कीं, जर आमच्यात त्याग करण्याची शक्ति आहे तर दुसऱ्या लोकांत हि त्याग करण्याची शक्ति का असणार नाहीं? ज्या परमेश्वराने आम्हाला मागण्याची प्रेरणा दिली आहे तो परमेश्वर दुसऱ्याला देण्याची प्रेरणा का देणार नाहीं?"

## ( ३९ ) वामन अवतार

तेलंगणात फिरत असताना तेथल्या वारंगळ गावाच्या गावीं भूदान-यज्ञाची भूमिका आणि उद्देश यांचें विवरण करताना विनोबा म्हणाले, 'भूदान यज्ञात दान मागताना मीं 'वामन अवतार' घेतला आहे' ते म्हणतात, "मी ब्राह्मण तर आहें च, या क्षणीं मीं वामन अवताराचें रूप घेतलें आहे आणि भूमिदान मागायला आरंभ केला आहे." पुढें एक वार वामन अवताराचा उल्लेख करून भूदान यज्ञासंबंधीं आपल्या तीन पदाचें विवरण करताना ते म्हणतात, "भूदानानंतर 'संपत्तिदान' हा वामनाचा दुसरा पाद आहे यानंतर तिसरा पाद हि टाकायचा आहे हें निश्चित आहे. तो पुण्यकाल येण्याकरिता लोकांनीं तयार असले पाहिजे. कारण त्या पुण्य कालीं त्यांना लोकांचे विनम्र सेवक व्हावयाचें आहे." यावरून लोकांच्या मनात असा प्रश्न उत्पन्न होईल कीं, ते अवतारवादावर विश्वास ठेवतात आणि त्यांना वाटत आहे कीं, आपण हि एक अवतार आहोत विनोबांनीं एका पत्रात यासंबंधीं विवेचन करून ही शंका दूर केली आहे "मी

कोणा हि जिवन्त मनुष्यासबंधीं अवताराची कल्पना कधीं करीत नाहीं. देह-मुक्त विभूतिसपन्न ज्ञानेश्वरासारख्या पुरुषाला हि, ज्याच्यावर माझी परम श्रद्धा आहे, त्याना हि मी अवतार म्हणून समजत नाहीं. त्याना मी श्रेष्ठ सत्पुरुष समजतों. राम आणि कृष्ण अवतार; कारण 'श्रीमद्भागवत', 'तुळशीरामायण' वगैरे ग्रंथानीं राम आणि कृष्ण याच्या मानवतेवर ईश्वरत्वाचा आरोप केलेला आहे. यामुळें हिंदुधर्मीयांना एक उपासनेचें स्थान मिळालें आहे. म्हणून मी त्याना अवतार मानायला तयार आहें. आणखी कोणते हि अवतार मी मानीत नाहीं. 'वामन-अवतार' ही व्यक्तिगत भाषा नाहीं. हें भूदान-यज्ञाचें वर्णन मात्र आहे. भूदान यज्ञाचें रूप वामनासारखें लहान आहे, परतु वामनानें ज्याप्रमाणें विराट् रूप धारण केलें त्याप्रमाणें च भूदान यज्ञाद्वन च अहिंसक क्रांतीची रचना होणें शक्य आहे. वामन भिक्षा मागत आहे असें वाटतें, परतु खरोखर महाता त्यानें बळीला दीक्षा च दिली. हें सर्व रूपक समजावून घेतलें पाहिजे. अशा तऱ्हेनें अवताराचा उल्लेख च न करणें शक्य नाहीं. कारण आमच्या समाजात असले संस्कार भरपूर झालेले आहेत. केवळ वामन अवताराचा उल्लेख करीत असतों नाहीं. 'प्रजासूय यज्ञ' 'भूदान-यज्ञाचा अश्व' 'नूतन धर्मचक्रप्रवर्तन' या सर्वांचा मी उल्लेख करीत असतों. हे सर्व काहीं लहान विषय नाहींत. परतु या सर्वांचा उल्लेख मी याकरिता करतों कीं, त्यामुळें आपल्याला लोकाना समजावून देता येतें. आपण क्षुद्र नाहीं, आपण हि महान् आहों, हें आपल्याला शिकवू इच्छितों. आपल्यामध्यें जो 'मी' आहे तो व्यक्तिगत 'मी' नाहीं. समग्र सर्वोदयसमाजाच्या पोटात प्रवेश करून घेऊन मी ही भाषा बोलत आहें."

काळ आणि परिस्थिति याच्या आवश्यकतेनुसार आत्म्याच्या एकेक गुणाचा विकास होतो आणि मत्ररूपानें तो प्रकट होतो. युगातल्या एका विशिष्ट माध्यमातून तो गुण विकसित होतो आणि तो मत्र फलद्रूप होतो. याप्रमाणें गुणाचा विकास आणि मत्राचा आविर्भाव च खरा अवतार. ती व्यक्ति अवताराला निमित्तमात्र. या विषयावर पूर्वी च सविस्तर विवरण करण्यात आलेलें आहे.

## (४० ) भूमिहीन गरीब श्रीमंताचा सहावा मुलगा

पूर्वी च सांगितलें आहे कीं, कुटुंबाच्या क्षेत्राच्या कल्पनेचा विस्तार करणें ही भूदान यज्ञातली मूलभूत गोष्ट आहे. परमेश्वर कुणाला एक मुलगा देतो, कुणाला दोन देतो; कुणाला तीन किंवा चार. ज्याला चार मुलगे आहेत त्याला वाटतें कीं, त्याच्या मुलांनीं त्याच्या धनसंपत्तीचे चार भाग करून वाटून घ्यावेत. जर त्याला पाचवा मुलगा झाला तर तो काय त्याला घालवून देईल ? तो त्याचा हि सत्कार च करील. त्याप्रमाणें च श्रीमंतांनीं हि मनात कल्पना करावी कीं, या युगात भूमिहीन दरिद्री त्याचा सहावा मुलगा आहे. हा या युगाचा इशारा आहे. हा युगधर्म आहे आणि युगकर्म आहे. दुसऱ्या ठिकाणीं ते म्हणतात, " जर आपल्याला चार मुलगे असतील तर मला पाचवा म्हणा आणि माझी वाटणी मला द्या. आज जे देत नाहींत ते उद्या देतील; ते दिल्याशिवाय राहणार नाहींत. भारतात असा कोणी नाहीं कीं जो आम्हाला भूमिदान देण्याचें कबूल करणार नाहीं."

विनोबा आणखी म्हणतात, " सहा एकरातला एक एकर मला द्या. एक एकर दिलात तरी पाच एकरातून तुम्हाला पीक कमी मिळणार नाहीं." या पाच एकरात सहा एकराचे च खात आणि परिश्रम मिळतील आणि परमेश्वराचा आशीर्वाद हि प्राप्त होईल. प्रत्येक शेतकऱ्याला समजून येईल कीं, सहा एकर जमिनींतून जें पीक येत होतें तितकें पाच एकर जमिनींतून हि काढणें शक्य आहे. म्हणून मी म्हणतों, सहा एकरांपैकीं एक एकर द्या. त्यामुळें परमेश्वराची कृपा मिळेल आणि गरिबांना खायला मिळेल.

## (४१ ) श्रीमंतांनो, निमित्तमात्र व्हा

श्रीकृष्णानीं अर्जुनाला सांगितलें आहे कीं, 'मी सर्वांना पूर्वींच मारलें आहे. हे सव्यसाची, तू निमित्तमात्र हो.' त्याप्रमाणें च गंभीर आत्म-विश्वासाच्या सुरात विनोबा श्रीमंताना उद्देशून म्हणतात, " जमीन श्रीमंताच्या हातून गरिबाच्या हातीं गेली च आहे. प्रश्न एवढा च आहे कीं, ती कोणत्या मार्गानें जायची ? श्रीमंतानो, तुम्ही निमित्तमात्र व्हा, म्हणजे शांतीच्या आणि प्रेमाच्या मार्गानें जमिनीचा प्रश्न सुटणें शक्य आहे."

जनशक्तीचा उदय निश्चित होणार च आहे. यावर विनोबाचा हा केवढा गाढ विश्वास आहे! त्याची दिव्य दृष्टि भविष्यकाळच्या परिस्थितीकडे बोट दाखवीत आहे याविषयीं संशय नाहीं. कालाचें परिवर्तन होत आहे. जमिनीवर स्वतः कष्ट करून जो पीक काढतो त्याच्या च मालकीची जमीन असली पाहिजे. 'कसेल त्याची जमीन' हा विचार समाजात उत्तरोत्तर दृढ होत चालला आहे. देशातल्या सामान्य लोकांची ही मागणी, हा दावा, क्रमाक्रमानें पुढे मांडला जात आहे. लोकानीं निवडून दिलेल्या प्रतिनिधीं-कडून जमीन वाटपाबद्दल सरकारवर उत्तरोत्तर दाब पडत आहे. सरकार-कडून जमिनीच्या वाटपाची आवश्यकता क्रमाक्रमाने मान्य केली जात आहे. देशातले बहुधा सर्व राजकीय पक्ष जमिनीचें योग्य वाटप व्हावें याबद्दल आग्रह धरीत आहेत. आपल्या देशातली परिस्थिति या कामाला अनुकूल आहे. म्हणून मन स्थिति आणि वस्तुस्थिति दोन्ही बाजूंनी काळाचा इशारा समजला जात आहे. जमिनीची योग्य वाटणी आता फार दिवस थांबवून धरता यायची नाहीं. श्रीमंत लोक ही गोष्ट अजून हि समजू शकणार नाहींत काय? वैशाख महिन्याच्या सुरुवातीला वाऱ्यानें कोठें कोठें ढग जमूं लागतात. वारा थांबला म्हणजे खूप ऊन भासू लागतें. उन्हाळा कडक होतो. त्याच्यावरून कोणी असें समजेल कीं, आता पाऊस पडणार नाहीं? तर त्याची बुद्धि त्याप्रमाणें चुकली आहे, भ्रांत झाली आहे, असें म्हणावें लागेल, त्याप्रमाणें च जर श्रीमंताना वाटत असेल कीं आमच्या हातात ती राहील च, जाणार नाहीं, तर त्याची बुद्धि ही भ्रांत झालेली आहे. जमीन-मालकानीं काळाचीं पावलें ओळखावींत. आज 'कालपुरुष' विनोबाच्या मुखाने हा इशारा देत आहे. आज युगदेवता विनोबाच्या द्वारा नवीन युगधर्माची स्थापना करीत आहे. धर्मचक्रप्रवर्तन सुरू होत आहे.

## (४२) श्रीमंतांची प्रतिष्ठा रक्षण करण्याचा प्रश्न

जमीन तर श्रीमंताच्या हातून जाणार च आहे, परंतु प्रश्न असा कीं, जमिनीबरोबर च त्याचा मान, प्रतिष्ठा आणि मनुष्यत्व हि निघून जावें कीं त्याचें रक्षण व्हावें? भूदान यज्ञाच्या मार्गानें शांति आणि प्रेमाच्या मार्गानें जर जमिनीचा प्रश्न सुटेल तर श्रीमंताची अब्रू वाचेल, त्याना मान वाढेल,

समाज त्यांना भाग्यासारखें लेखील. परंतु जमीन जर दुसऱ्या मार्गानें त्यांच्या हातांतून जाईल तर जमिनीबरोबर त्यांचा मान आणि मनुष्यत्व हि नष्ट होईल. कायद्यानें हि जमीन काढून घेतली गेली तर त्यांची अब्रू आणि व्यक्तित्व यांना धक्का लागल्याशिवाय राहणार नाहीं. म्हणून गया जिल्ह्यामध्यें एके ठिकाणीं विनोबांनीं जमीनदार लोकांना सावधान करतांना सांगितलें, "पाटण्यामध्यें जमीनदारांचे कांहीं प्रतिनिधी मला भेटायला आले होते. मीं त्यांना साफ सांगून टाकलें कीं, जर तुम्ही काळाचा ओघ समजून घेऊन अजून हि भूमिदान कराल तर च वांचाल. आज मी पुन्हा मोठ्या जमीनदारांना विनंति करतों कीं, तुम्ही केवळ जमीन दान करून चालणार नाहीं. भूदान-यज्ञाचें काम आपलें स्वतःचें च आहे असें मानून त्यांत भाग घेतला पाहिजे. तुम्ही मला किती दिवस फिरायला लावणार आहांत ? तुम्ही च या कामाची जबाबदारी घेतली पाहिजे, तेव्हां च मला संतोष होईल. यामुळें आपल्या अंतःकरणांतील सत्त्वगुणाचा विकास होईल आणि समाजाचें पुढारीपण, समाजाची सेवा करण्याची सुसंधि तुम्हांला मिळेल. यासरशीं इंग्रजांकडून धडा घेणें योग्य आहे. इंग्रजांनीं जेव्हां पाहिलें कीं, हिंदुस्थान सोडलें च पाहिजे, तेव्हां स्वतः च एक तारीख त्यांनीं ठरवून टाकली आणि भारत सोडून ते निघून गेले. जर त्यांनीं याप्रमाणें तें सोडलें नसतें तर अखेरीला हिंदुस्थान तर त्यांना सोडावें लागलें च असतें पण त्याबरोबर च ते आपला मान आणि आत्मविश्वास हि हरवून बसले असते. पण त्यांनीं शहाण्यासारखें काम केलें. त्यामुळें त्यांनी हिंदुस्थानच्या लोकांचें प्रेम राखलें आणि आपला व्यापार सांभाळला. गांधीजींनीं अहिंसेच्या द्वारा स्वराज्य प्राप्त करून घेतलें हें जसें इतिहासांत लिहिलें जाईल, त्याप्रमाणें च इंग्लंडबद्दल हि असें लिहिलें जाईल कीं, भारताच्या स्वातंत्र्ययुद्धांत इंग्लंडचा हि विशेष लाभ झाला आहे. मला वाटतें कीं, आमच्या स्वातंत्र्ययुद्धांत इंग्लंडचा नैतिक विजय झाला आहे. सत्याग्रह आणि अहिंसक युद्ध यांचें हें च महत्त्व आहे कीं, त्यामध्यें दोन्ही पक्षांचा जय होतो. हिंसक लढाईंत एका पक्षाचा जय आणि दुसऱ्या पक्षाचा पराजय होत असतो. म्हणून भाई हो, इंग्लंडपासून धडा घ्या आणि जर आपला मान, गौरव, प्रेम, सौहार्द आणि स्नेहभाव सुरक्षित राखूं इच्छीत असाल तर योग्य वेळीं योग्य

रीतीनें काम कराल पण दान देणार नाहीं तर जमीन तर जाईल च परंतु प्रेम आणि अब्रू गमावून बसाल. गरीब लोक आणखी किती दिवसपर्यंत वाट पहात बसतील ? वाट पहाण्याची आता अगदीं सीमा होऊन गेली आहे. आता गरीब लोक जागृत झाले आहेत. खुषीनें दान दिले तर त्यात शोभा आहे. योग्य वेळीं ' देशे काले च पात्रे च ' दान देणें उचित आहे, आणि मी योग्य पात्र नाहीं का ? योग्य वेळीं उचित काम केलें तर त्याचा चांगला परिणाम होईल. "

## ( ४२ ) भीतीनें दिलेलें दान

असे म्हटलें जाते कीं, जमीन-मालक आज जें दान देत आहेत तें भीतीने देत आहेत. अशा स्थितींत त्यांची अब्रू आणि मान कसा राहील ? अशी हि तक्रार केली जाते कीं, भूदान-यज्ञाचा प्रचार करितांना जी भाषा वापरली जाते तिच्यामुळें जमीन-मालकाच्या मनात भय च उत्पन्न होतें. जमीन मालकांना ज्या भीतीच्या गोष्टी सांगितल्या जातात, ती अगदीं वाईट च अशी गोष्ट नाहीं. याला नैतिक भय म्हणता येईल. अशी नैतिक भीति वाटून देणें योग्य च आहे. शास्त्रात म्हटलें आहे–" श्रद्धया देयम्, अश्रद्धया देयम्, ह्रिया देयम्, भिया देयम्. " ' भिया देयम् ' याचा अर्थ भीतीनें हि पण दान द्यावें. याविषयीं विनोबा म्हणतात, " याप्रमाणें च आम्ही म्हणतों कीं, भय वाटून हि भूदान द्या. याचा अर्थ असा नाहीं कीं, जर तुम्ही दान देणार नाहीं तर तुमचा लूट करूं. अशा तऱ्हेनें हिंसेच्या भयानें कोणीं दान द्यावें असे माझें म्हणणें नाहीं. पण आम्हीं जर कोणाला सांगितलें कीं, ' तुझ्या बिछान्याखालीं साप आहे, बिछाना सोडून बाहेर ये ' तर जें खरोखरीचें संकट आहे, भय आहे, तें त्याला दाखवून दिलें असें होईल. मनुष्याला त्याचें भय असणें योग्य, तें त्याला दाखवून देणें चांगलें च. पण जेथें भीति बाळगणें योग्य नाहीं तेथें न भिणें च चांगलें. भय ही एक चांगली वस्तु आहे. भयामुळें का होईना, एखादा माणूस वाईट गोष्टीपासून परावृत्त झाला तर त्यानें योग्य च केलें असें म्हटलें पाहिजे. पण कोणी मला असा प्रश्न करतील कीं, " आपण असें कसें म्हणता कीं, असत्य बोलाल तर नाश होईल. हिंसा कराल तर ती वाईट

अनिष्ट गोष्ट आहे. दुनियेचा विनाश होईल. ही गोष्ट तुम्ही कशी म्हणता ?" पण हें भय दाखविणें नाहीं. हा एक विचार आहे. वाईट कर्माचें वाईट फळ मिळेल, म्हणून वाईट काम करूं नका, ही गोष्ट लोकांना समजावून देण्याकरिता च मी सांगत असतों. हें जर भय असेल तर तें धर्मभय आहे. समाजाला समजावून दिलें च पाहिजे कीं, कालाची परिस्थिति ओळखून जर उदार अंतःकरणानें तुम्ही दान देणार नाहीं तर संकट आहे. लोकांना भय दाखविण्याकरिता, धमकी देण्याकरिता, मी असें सांगत नाहीं, परंतु या म्हणण्यानें मी विचार च समजावून देत असतों. वाईटाचें फळ वाईट होईल. समजावून सांगणें म्हणजे भीति दाखविणें नव्हे. हा कर्मविपाक किंवा कर्म परिणाम सांगणें आहे. ही काय धमकी झाली ? ही जर धमकी असेल तर वेदानें हि अशी धमकी दिली आहे.

" मोघमन्नं विंदते अप्रचेताः
सत्यं ब्रवीमि वध इत् स तस्य,
नार्यमणं पुष्यति नो सखायम्
केवलाघो भवति केवलादि । "

'मूर्ख अन्नाचा निष्कारण ढीग करितो. वेद म्हणतो, मी सत्य सांगतो. तो अन्नाचा संग्रह करीत नाहीं तर स्वतःच्या मृत्यूचा. जी व्यक्ति अन्नाचा संग्रह करिते ती आपल्या मृत्यूला च बोलावीत असते. जी व्यक्ति एकटी बसून अन्न खाते ती व्यक्ति पुण्याचा नाहीं— पापाचा च संग्रह करिते.'

म्हणून, भाई हो, जें संकट आहे तें आपण ओळखलें पाहिजे, आणि तें शीघ्र ओळखलें पाहिजे. जी व्यक्ति तरुणपणीं च आपल्याला म्हातारपण येणार आहे हें ओळखील त्या व्यक्तीची च आयु वाचेल. संकट येण्यापूर्वी च तें याप्रमाणें जाणलें तर त्याचा मान राहील."

## ( ४४ ) श्रीमंतांचें हृदयपरिवर्तन

श्रीमंतांच्या हृदयपरिवर्तनासंबंधीं थोडें विवेचन करणें जरूर आहे. कांहीं लोक श्रीमंतांचें हृदयपरिवर्तन होईल यावर विश्वास ठेवीत नाहींत. ते या गोष्टीची थट्टा, टर च उडवितात. पण हें योग्य नाहीं. बाहेरच्या परिस्थितीमुळें मनुष्याचें हृदयपरिवर्तन होऊं शकतें, झालेलें हि आहे.

याप्रमाणें त्याचें हृदय परिवर्तन झालें त्याच्या अंतःकरणात तें विचारबीज सुप्त होतें बाहेरच्या परिस्थितीचें त्याला पाणी मिळता च त्याला अंकुर फुटला. कारण एक च परिस्थिति दुसऱ्याच्या हृदयावर सारखा च प्रभाव पाडीत नाहीं. अत्यंत अनुकूल परिस्थिति असून हि दुसऱ्याचें अंतःकरण एखादे वेळीं परिवर्तित होणार नाहीं. याविषयीं विनोबा म्हणतात, "एखादा माणूस वृद्ध झाला आणि तद्यात त्याला पुत्रवियोग झाला, या कारणामुळें त्याला वैराग्य आलें. म्हातारपण आणि मुलाचा मृत्यु यामुळें वैराग्य आलें तर तें वैराग्य खोटें काय? तें खरें वैराग्य आहे. जेव्हा हा माणूस तरुण होता आणि त्याचा मुलगा जिवंत होता त्या वेळीं त्याला आसक्ति होती. एखाद्या वृद्ध माणसाला त्याच्या मुलाचा मृत्यु होऊन हि वैराग्य येणार नाहीं. याचें कारण असें कीं, पहिल्या व्यक्तीला वैराग्य आलें याचें कारण त्याच्या हृदयात प्रथमपासून च तसा भाव होता आणि मुलाचा मृत्यु हें एक निमित्त मात्र झालें, त्यामुळें त्याच्या अंतःकरणातला सुप्त भाव जागृत झाला. म्हणून प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणात चांगला भाव असतो असा आपण विश्वास ठेवला पाहिजे.

## ( ४५ ) कोणीं किती दान द्यावें ?

आता पहिला प्रश्न असा आहे कीं, भूमिदान कोणीं द्यावें ? यज्ञामध्यें सर्वांनीं च आपआपल्या हविर्भागाची आहुति द्यायची असते. भूदान यज्ञामध्यें गरीब, श्रीमंत अशा सर्वांना च भूमिदान देण्याकरिता आवाहन केलेलें आहे. सर्वांजवळून जमीन मागायची म्हटलें तरी सगळ्यांपासून सारखी च जमीन मागायची नाहीं. मध्यम व गरीब शेतकऱ्याकडून हि जमीन मागितली जाते. जे मोठमोठे शेतकरी व जमीनदार आहेत त्यांना सांगितलें जातें, तुम्ही आपल्याकरिता काहीं जमीन ठेवून घेऊन बाकी सर्व जमीन गरिबांकरिता दान द्या जे अत्यंत गरीब आहेत त्यांच्याजवळून दानाची मागणी म्हणून काहीं मागण्यात येत नाहीं. त्यानीं प्रेमपूर्वक जें दिलें असेल तें प्रसाद म्हणून ग्रहण करायचें आहे. ज्याप्रमाणें सुदाम्याकडून मूठभर पोहे मिळाल्यानें भगवान् प्रसन्न झाले त्याप्रमाणें ज्याच्याजवळ अगदीं थोडी जमीन आहे अशा गरीब शेतकऱ्यानें जर प्रेमानें आणि श्रद्धेनें काहीं थोडें दान दिलें

तरी त्यामुळें भारतमाता प्रसन्न होईल. म्हणून श्रीमत मनुष्याचें भूमिदान हें ' दान ' होतें आणि गरिबाचें भूमिदान हा ' यज्ञ ' होतो.

आणखी एका गोष्टीचा उलगडा करणें जरूर आहे. भूदान यज्ञामध्यें एका क्रांतिकारक विचारानें सर्व समाजजीवन बदलून टाकायचें आहे. म्हणून जरी थोड्या लोकांकडून जरूर तितकी जमीन मिळण्याचा संभव असला तरी त्यामुळें भूदान यज्ञाचा उद्देश साध्य होणार नाहीं. किती जमीन मिळवावयाची याचा केवळ निर्देश करून काहीं विनोबा संतुष्ट नाहींत. दात्यांच्या संख्येचा हि निर्देश त्यांनीं केला आहे. म्हणजे विनोबांनीं बिहार-कडून आठ लक्ष दात्यांकडून ३२ लाख एकर जमीन मागितली आहे.

## ( ४६ ) गरिबांनीं कां भूमिदान द्यावें ?

असा आक्षेप घेतला जातो कीं, गरीब शेतकऱ्याकडून जमीन घेणें हा अन्याय आहे. साम्यवादी तर असा आक्षेप घेतात च पण ज्यांचा कोणत्या राजकीय पक्षाशीं किंवा कोणत्या आर्थिक मतवादाशीं संबंध नाहीं असे ग्राम-सेवक रचनात्मक कार्यकर्ते हि अशा आक्षेपाच्या सुरात हा प्रश्न करतात कीं, गरीब शेतकऱ्याच्याजवळ सध्या जितकी जमीन आहे तेवढ्यात च त्याचें पोट भरत नाहीं. अशा स्थितींत त्याच्याकडून जमीन मागणें आणि त्याची जमीन घेऊन त्याला आणखी गरीब करणें हें योग्य आहे का ? वरवर पाहता हा आक्षेप योग्य आहे असें वाटतें, परंतु गंभीरपणें विचार केल्यास या आक्षेपाला आधार नाहीं असें दिसून येईल

आजपर्यंत मनुष्याचें आत्मज्ञान साधारणपणें आपल्या कुटुंबाइतकें च विकसित झालें आहे. मनुष्य आपली पत्नी, मुलगा, आप्तजन यांच्याकरिता कितीतरी त्याग आणि दु:खकष्ट सहन करीत असतो. परंतु कुटुंबा बाहेरच्या मनुष्याबद्दल त्याला काहीं वाटत नाहीं मनुष्य आपल्या कुटुंबांत आत्मज्ञानसंपन्न माणूस असतो, परंतु कुटुंबाच्या बाहेर साधारणत त्याचें आचरण पशुसारखें च असतें. जमिनीचा प्रश्न उत्पन्न होण्याचें मूळ कारण मनुष्याची आपल्या कुटुंबाच्या बाहेरच्या लोकांशीं सहृदयता नाहीं हें आहे. या बाबतींत श्रीमंत आणि गरीब यामध्यें फरक नाहीं. आपल्यापेक्षा जे जास्त

गरीब आहेत त्याच्याबद्दल गरीब शेतकऱ्याला सहानुभूति नाहीं. ते गरीब असले तरी भूमिहीन गरिबाच्या तुलनेनें ते सुखी आहेत. सुखी आणि दु:खी एकमेकाशीं तुलना करून च ठरवायचें आहे. एकजण दु:खी असेल परंतु दुसऱ्या दु:खी माणसाशीं तुलना करिता त्याला सुखी च म्हटलें पाहिजे. भूमिहीन दरिद्री आज समाजात सर्वांपेक्षा दु:खी आहे. समाजात आज कोणाशीं हि त्याची तुलना केली तरी त्याला सुखी म्हणता येणार नाहीं. म्हणून तो समाजात सगळ्याच्या दृष्टीनें हि दु:खी आहे. समुद्र सर्वांत खोल आहे म्हणून जमिनीवरील सर्व पाणी त्याच्याकडे वाहत असतें. त्याप्रमाणें आज समाजातल्या दुसऱ्या सर्वांचें दान भूमिहीन गरिबाकरिता अर्पण होणें उचित आहे. त्याच्याजवळ थोडी जमीन आहे अशा शेतकऱ्यानीं त्याच्याकरिता थोडेसें तरी भूमिदान देणें जरूर आहे. दुसरी गोष्ट भूदानयज्ञाचा उद्देश स्वामित्वविसर्जनाची दीक्षा देणें हा आहे. ज्याच्याजवळ दोन हजार एकर जमीन आहे तो आपल्याला जसा त्या जमिनीचा मालक म्हणवितो त्याप्रमाणें च ज्याच्याजवळ दोन एकर जमीन आहे तो हि आपल्याला त्या जमिनीचा मालक समजतो. म्हणून श्रीमंत शेतकऱ्याप्रमाणें च गरीब शेतकऱ्याच्या हि शुद्धीची जरूरी आहे. नाहीं तर क्रांतीचा पाया कधीं हि बळकट होणार नाहीं. मालकीच्या मोहानें च मनुष्याला भांडवलवादाचें गुलाम केलें आहे. मग तो मोठा मालक असो किंवा छोटा मालक असो. त्याची संपत्ति दोन लंगोट्याइतकी च असते त्या दोन लंगोट्यावर हि त्याची आसक्ति असू शकते. पुंजीवादाचें, भांडवलशाहीचें हें मूळ आहे. म्हणून काहींना काहीं दान भूदान यज्ञात अर्पण करून गरीब शेतकऱ्याकरिता मालकीचें विसर्जन करण्याची दीक्षा घेणें अवश्य आहे.

अत्यंत थोडी जमीन असलेल्या जमिनीचा गरीब मालक मनातून मोठ्या जमिनीच्या श्रीमंत मालकाविषयीं द्वेष बाळगीत असतो. कशाकरिता? समाजातून श्रीमंतीचें च उच्चाटन व्हावें हें त्याला नको असतें. त्याला आपण श्रीमंत व्हावें असें वाटत असतें. आणि हजारों एकर जमीन मिळविण्याची लालसा तो बाळगीत असतो. भूदान यज्ञात जमिनीची आहुति देऊन गरीब शेतकरी या लालसेंतून मुक्त होऊ शकेल. अगदीं थोडी असली तरी जेव्हा हजारों गरीब शेतकरी भूमिदान देतील तेव्हा अशी एक नैतिक हवा निर्माण होईल कीं, तीमुळें मोठे शेतकरी आणि जमीनदार हि दान देण्याला प्रवृत्त होतील.

बिहारमध्यें आणि इतर ठिकाणीं हि राजेरजवाडे यांनीं जी हजारों, लाखों एकर जमीन दिली व देत आहेत, त्याच्यामागें देखील ही च भूमिका राहिलेली आहे. बिहारमध्यें दोन वर्षेपर्यंत गरीब लोकांनीं विनोबांच्यावर दानाचा अभिषेक केला त्यामुळें ही गोष्ट श्रीमंत लोकांना स्वतःला लिज्य झाली. विनोबा म्हणतात, “ ज्यांना लज्जा नाहीं त्यांना लज्जा वाटू लागणें ही चांगली गोष्ट आहे. शास्त्र म्हणतें, ‘ भिया देयम् ’ नैतिक शक्ति प्रकट करण्याची ही एक पद्धति आहे.” श्री. दादा धर्माधिकारी यांनीं एक सुंदर उपमा देऊन हा विषय समजावून दिला आहे. ते लिहितात, “ शेतकरी खाण्याकरिता जें धान्य राखतात तें वेगळें ठेवतात आणि बियाण्याकरिता राखतात तें हि वेगळें ठेवतात. खाण्याकरिता ठेवलेल्या धान्यापेक्षा बी-बियाण्याकरिता ठेवलेल्या धान्यात अधिक गुण असतो. श्रीमंताच्या दानामुळें मालकीची वाटणी होईल, परंतु मालकीच्या विसर्जनाची क्रांति गरिबाच्या दानातून च होणें शक्य आहे. गरिबाच्या दानात क्रांतीचा बीजधर्म अंतर्भूत आहे. म्हणून अहिंसक क्रांतीच्या प्रक्रियेमध्यें गरिबाचें स्वामित्वविसर्जन ही एक मूलभूत वस्तु आहे.”

गरीब लोक तत्त्व समजून घेऊन अंतःकरणपूर्वक लहानांत लहान जें दान देत आहेत त्याचें मूल्य त्याच्या प्रमाणावर अवलंबून नाहीं. तें अमोल आहे. कारण तें दान अभिमंत्रित आहे. तें महान् दान समाजातली हवा पवित्र, शुद्ध करून टाकील आणि त्यामुळें विचारक्रांति निर्माण होण्याची महान् प्रेरणा मिळेल. त्याचें हें अमोल अभिमंत्रित दान समाजाला परिसाप्रमाणें होईल. त्या परिसाच्या स्पर्शानें सर्व समाजाचें सोनें होऊन जाईल. महाभारतांतील राजसूय यज्ञातल्या मुंगसाची गोष्ट ध्यानांत आणा. त्यावरून ही गोष्ट नीटपणें लक्षात येईल. देशात भयंकर दुष्काळ होता. एक दरिद्री ब्राह्मणाचें कुटुंब कित्येक दिवस उपाशी होतें. ब्राह्मणानें अतिशय कष्टानें थोडेसे सातू गोळा करून आणले होते. कुटुंबात चार माणसें—ब्राह्मण, त्याची पत्नी, मुलगा आणि सून. त्या सातूतून त्या चौघा जणांचें पोट भरण्याची गोष्ट दूर च, परंतु घासभर मिळणें हि कठीण होतें. चार जणांकरिता चार भाग केले. स्नान करून ब्राह्मण आपला भाग खाण्याकरिता सिद्ध झाला.

इतक्यात दुष्काळानें पीडलेला, भुकेनें गांजलेला, हाडांचा सापळा झालेला असा एक माणूस उभा असलेला त्याला दिसला. ब्राह्मणानें कांहीं न खातां आपला सर्व भाग अत्यंत श्रद्धापूर्वक आणि विनयानें त्याला खायला दिला, आणि आपण उपाशी राहिला. भुकेलेला आगंतुक तेंवढें खाऊन टाकून म्हणू लागला, हें खाल्ल्यामुळें आपली भूक तर राहिली नाहीं च, उलट त्यामुळें पोटांत भूक वाढली च आहे. तेव्हां ब्राह्मणपत्नीनें अत्यंत प्रेमपूर्वक आपला भाग हि त्याला देऊन टाकला. तो खाऊन हि तो म्हणू लागला कीं, आपल्या पोटांतील आग शमली नाहीं. तेव्हां मुलानें अति सहानुभूतीनें आपला भाग त्याला दिला. तो हि त्यानें खाऊन टाकला तरी हि त्याची भूक भागली नाहीं. तेव्हां सुनेनें परम भक्तिपूर्वक आपला अंश त्याला खायला दिला. तो भाग त्यानें खाल्ला तेव्हां त्याच्या भुकेची शांति झाली. तो तृप्त होऊन निघून गेला. एक मुंगूस जवळच्या च एका झाडावरून हें सर्व पहात होता. खाऊन पडलेलें कांहीं असेल तर तें खाण्याकरितां मुंगूस झाडावरून ती व्यक्ति ज्या ठिकाणीं बसली होती त्या ठिकाणीं आला. परंतु तेथें त्याला एक कण हि मिळाला नाहीं तेव्हां त्या ठिकाणीं तो गडबडा लोळला. तेव्हां त्याला दिसून आलें कीं, त्याचें अर्धें शरीर सोन्याचें झालें आहे. त्या आनंदांत त्याची भूक नाहींशी झाली. त्याला वाटलें, ज्या ठिकाणीं अतिथीला वाढलें जातें त्या ठिकाणीं लोळलें म्हणजे शरीर सोन्याचें होतें. म्हणून तेव्हांपासून ज्या ठिकाणीं अतिथीला भोजन दिलेलें त्याला दिसेल त्या ठिकाणीं जाऊन तो लोळण घेऊं लागला. शेवटीं तो राजसूय यज्ञांत आला. तेथें हजारों, लाखो अतिथी भोजन करीत होते. मोठ्या आदरानें दिवस रात्र त्या राजसूय यज्ञाच्या भोजनशाळेत एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणापर्यंत तो लोळण घेऊं लागला. परंतु आणखी एक केस हि सोन्याचा झाला नाहीं. धर्मराज वगैरे सर्वांनीं त्या मुंगसाच्या मुखांतून त्याची सर्व कहाणी ऐकली. राजसूय यज्ञ केल्यामुळें धर्मराजाच्या मनांत अहंकार उत्पन्न झाला होता. मुंगसाची कहाणी ऐकून तो नाहींसा झाला आणि त्याच्या अंतःकरणांत असा ज्ञानाचा उदय झाला कीं, गरिबानें दुसऱ्या गरिबाला अंतःकरणांतल्या सहानुभूतिपूर्वक लहानांतलें लहान दान दिलें तरी त्या दानाच्या महिम्याला तुलना नाहीं. असें दान जेथें दिलें जातें त्याच्या आसपासची हवा पवित्र होऊन जाते.

आणखी एका कारणाकरितां हि ज्याची जमीन थोडी आहे अशा मालकाकडून हि जमीन मागायची आहे. त्यासबंधीं विनोबा म्हणतात, " मीं तर कितीं वेळा म्हटलें आहे कीं, मी आमची सेना तयार करीत आहें. उच्च नीच भेद आम्हाला दूर करावयाचा आहे. आणि अशी सेना उभारावयाची कीं, जिच्या आधारावर लढा चालवा आम्ही समर्थ होऊ. ज्यानीं दान दिले आहे, किंवा त्याग केला आहे, किंवा ज्यानीं आमच्या कार्याला सहानुभूति दाखविली आहे ते च आमचे सैनिक होतील. आमची सेना हिंसेवर आधारलेली नाहीं. हिंसक सेनेमध्यें ज्याची छाती ३२ असेल अशांना च सैन्यामध्यें भरती करतात. आमच्या सैन्यात भरती व्हायला त्यागाची छाती पाहिजे."

भूदान यज्ञात गरिबाकडून भूमिदान ग्रहण करण्याच्या प्रश्नासबंधीं विनोबानीं आणखी हि असें म्हटलें आहे कीं, " भूदानयज्ञात दान देणें हें धर्म-कार्य आहे. धर्माचें आचरण श्रीमंत लोकानीं करावें आणि गरिबानीं करूं नये असें नाहीं. श्रीमंताजवळ पैसा आहे म्हणून गाडीनें प्रवास करून काशीला जाऊन तो विश्वनाथाचें दर्शन घेईल, परंतु गरिबाजवळ गाडीभाडें देण्याकरिता पैसा नाहीं म्हणून त्यानें विश्वनाथाचें दर्शन न घेता परतायचें कीं काय ? तो पायीं जाऊन दर्शन घेईल." हा युक्तिवाद हि कित्येकाना पटणार नाहीं परंतु आज असा संशय येण्यास हि कारण नाहीं. अत्यंत दरिद्री व्यक्तींनीं हि विनोबाना सर्वस्व अर्पण करून आपणाला धन्य मानलें आहे. ज्या ठिकाणीं कोणत्या हि उन्हेच्या फायद्याची आशा न ठेवता शुद्ध अंतःकरणानें शेंकडों गरीब लोक आपलें लहानसें दान करीत आहेत त्या ठिकाणीं विचारक्रांति गरिबांतून च समाजात प्रवेश करीत आहे या-विषयीं संशय राहिलेला नाहीं.

## ( ४७ ) या चळवळींत गरिबांचें कर्तव्य

सर्वस्पर्शी क्रांति घडवून आणण्याचा कार्यक्रम असा असला पाहिजे कीं, देशातल्या सर्व श्रेणींच्या लोकाना त्यात भाग घेता यावा. अर्थात् सर्व वर्गांतल्या लोकाना क्रांति करण्याकरिता सक्रिय भाग घेण्याची संधि मिळाली. नाहीं तर खरी क्रांति होण्याचा संभव नाहीं. भूमीबरोबर च संपत्ति अथवा

धनदौलत यातला अंश मागितला नाहीं तर भूदान-यज्ञाचा उद्देश असपूर्ण राहील म्हणून संपत्तिदान यज्ञ सुरु केला आहे. त्यामुळें ज्याच्याजवळ जमीन नाहीं अशा श्रीमंत व्यक्तींना ह्या क्रांतिकारक आंदोलनात भाग घेण्याची सुसंधि मिळणार आहे. परंतु या चळवळींत भूमिहीन गरिबाचें कर्तव्य काय आहे ?

विनोबा इच्छितात कीं, भूमिहीनानीं आपल्या जमिनीची भूक स्वतः च सांगावी. म्हणून त्याना वाटतें कीं, आता भूमिहीनाना जागृत करण्याचा समय आला आहे. ते म्हणतात, " मी १४ महिने बिहारमध्यें फिरत आहें. येथे बरें च कार्य झालें आहे, परंतु आता असा काळ आलेला आहे कीं, गरिबानीं आपली मागणी आपण च केली पाहिजे. आजपर्यंत मी त्यांच्या-करिता खटपट केली. आता त्यांनीं च खटपट केली पाहिजे. कोणी कोणी विचारतात, ' तुम्ही गरिबाना जागृत करूं इच्छिता आहा ना ?' मी सांगतों कीं, ' याकरिता च तर मी पायीं फिरत आहें.' बिहारमध्यें १३ लक्ष एकर जमीन मिळाली आहे महिन्याला एक लक्ष एकर या प्रमाणात मिळाली; त्याच्या किमतीसंबधीं मी विशेष काहीं विचार करीत नाहीं. परंतु भूमिहीन दरिद्री जागृत होत आहेत आणि त्यांना अशी जाणीव होत आहे कीं, जमिनीवर त्यांचा हक्क आहे. केवळ हक्क आहे एवढें च नव्हे, तर त्या जमिनीची शेती करणें त्याचें कर्तव्य आहे. या गोष्टीचें मोल फार आहे असें मला वाटतें." विनोबांची इच्छा आहे कीं, गांवोगावीं जमिनीची मागणी आता भूमिहीनानीं च केली पाहिजे. यासंबधीं विनोबा म्हणतात " मूल रडूं लागलें म्हणजे च त्याला काहीं पाहिजे आहे असें समजतें. आई आणि मूल यांच्यामध्ये किती प्रेमाचा संबंध असतो ! परंतु मूल रडूं लागेल तेव्हा च आई त्याच्याकडे लक्ष देते आणि त्याला पाजते. याकरिता भूमिहीनाकडून च त्याची मागणी उठवण्याची आवश्यकता आहे. मी त्यांचा प्रतिनिधि होऊन च मागत आहें, परंतु त्यानीं स्वतः हि गांवोगावीं सभा भरवून जमिनीची आपली मागणी जाणवून दिली पाहिजे तेव्हा च त्यांना जमीन मिळेल. आपल्या हक्काची जाणीव उत्पन्न होऊन त्यानीं अशी ही मागणी केली पाहिजे. ती प्रेमानें पण आग्रहाने करावी. गरिबानें म्हटलें पाहिजे कीं, पुढें केव्हा लढाई सुरू झाली तर देशाचें रक्षण करण्याकरिता गरीब लोकांना हि प्राण द्यायला

तयार असलें पाहिजे अशी आशा केली जाते. असे असेल तर त्या मातृभूमीची सेवा करण्याचा अधिकार आम्हाला नाहीं असें म्हणणें कसें न्याय्य होईल ? म्हणून गरिबाची मागणी पूर्ण केली च पाहिजे आणि ही मागणी गरिबानीं स्वतः च उठविली पाहिजे.

भूमिहीन गरिबाचीं आणखी हि कांहीं कर्तव्यें आहेत. त्यासंबंधीं विनोबा म्हणतात, "पहिलें कर्तव्य गरिबानीं आत्मशुद्धि केली पाहिजे. त्याच्यामध्यें जीं व्यसनें आहेत तीं सोडून देऊन त्यानीं शुद्ध झालें पाहिजे. तेव्हा च त्याची शक्ति वाढेल, नाहीं तर नाहीं. समजा, उद्या गरिबाना जमीन वाटून दिली. त्याना अशा प्रकारें जमीन मिळाली असेल ते जर दारू पीत असतील तर ती त्याच्या हातात टिकणार नाहीं. याकरिता शहरातून जीं व्यसनें खेड्यात आलीं आहेत त्यापासून त्यानीं मुक्त झालें पाहिजे हें आत्मशुद्धीचें काम गरिबानीं करणें जरूर आहे.

"दुसरी गोष्ट म्हणजे आळस सोडला पाहिजे. माझें हें म्हणणें ऐकून तुम्ही आश्चर्यचकित झाला असाल. तुम्ही म्हणाल, 'गरीब लोक तर नेहमीं च श्रम करीत असतात.' मी म्हणतों, 'ते श्रम करीत असतात ही गोष्ट सत्य आहे. परंतु जे श्रम करितात ते जेव्हा अंगावर पडतात, भाता सुटका नाहीं, तेव्हा च करतात. पण या कामात हि होईल तितका आळस करतात. सकाळपासून संध्याकाळपर्यंत ते जें काम करितात तें पाहिलें तर असें दिसून येईल कीं, सकाळीं शेतात जाऊन संध्याकाळपर्यंत सुमारें आठ तास काम' होतें. तो वेळ सोडून बाकी सर्व वेळ ते आळसात च घालवितात. आळस हा एक मोठा रोग च आहे. श्रीमंतात तर तो आहे च, पण त्यान गरिबात हि प्रवेश केला आहे. याकरिता गरिबानीं आळस सोडून आपल्याला सदैव कामात गुंतविलें पाहिजे. तिसरी गोष्ट, गावात पंचायत स्थापन केली पाहिजे. गावातले तंटेबखेडे गावात च मिटले पाहिजेत. भाऊबंदकीमुळें शक्तीचा क्षय होतो. म्हणून आपसात तंटेभांडणें होऊं नयेत याकडे लक्ष दिलें पाहिजे. लोकात मतभेद असतील च; त्यातून अनेक समस्या हि उद्भवतील; पण त्या गावातल्या कोणा सज्जनाकडून सोडवल्या पाहिजेत. आपआपसात न्याय भांडण मिटलें तर बाहेर कशाला जावें लागेल ? घरातलीं भांडणें घरात च मिटणें ही किती शोभादायक गोष्ट आहे ? प्रत्येक गावात

कोणी ना कोणी वजनदार सज्जन असतो च. म्हणून त्याच्याकडे जाऊन त्यानें दिलेला न्याय मानणें योग्य आहे.

## (४८) साम्यवाद आणि भूदान-यज्ञ

साम्यवादी म्हणजे कम्युनिस्ट लोक. त्यांचें आंदोलन हाणून पाडण्याकरिता च भूदान-यज्ञाची चळवळ सुरू करण्यात आली आहे असा आक्षेप घेतात. ही गोष्ट खरी नाहीं. भूदान-यज्ञाची चळवळ यशस्वी झाली तर हिंसक-क्रांतीचें निवारण होईल यात शंका नाहीं. पण केवळ त्या उद्देशानें भूदान-यज्ञ सुरू झालेला नाहीं. हा एक स्वतंत्र विचार आहे. तो विधायक म्हणजे positive आहे. निषेधात्मक (negative) नाहीं. साम्यवादी ज्या मार्गानें जात असतात त्यापेक्षा दुसरा कोणता हि मार्ग भारतांतला जमिनीचा प्रश्न सोडविण्याला नाहीं, असें असून हि त्या मार्गानें जमिनीचा प्रश्न न सोडविता हिंसक क्रांति रोखून धरण्याकरिता मात्र जर भूदान यज्ञ खटपट करीत असेल तर ती भीरुता होईल. परंतु साम्यवादी लोक जी गोष्ट संघर्ष, अशांति आणि रक्तपात या साधनांनीं साध्य करूं पहातात ती च गोष्ट भूदान-यज्ञ शांति आणि प्रेमाच्या मार्गानें करण्यास प्रवृत्त झाला आहे. हिंसक क्रांतीमुळे फक्त बाह्य परिवर्तन घडून येईल; पण अहिंसक क्रांतीनें आंतरिक आणि बाह्य असें दुहेरी परिवर्तन होईल. हिंसक क्रांतीच्या द्वारा जमिनीची वाटणी होऊन कदाचित् लक्ष्मीचा लाभ होईल. पण समाजात विचारक्रांति होणार नाहीं, प्रेमाची शक्ति निर्माण होणार नाहीं. अहिंसक क्रांतीमुळें लोकांच्या अंतःकरणात चिंतनाची आणि विचाराची क्रांति होऊन जाईल. 'सर्व भूमि गोपालकी' – 'जमिनीवर सर्वांचा समान अधिकार' हा विचार समाजात प्रस्थापित होईल आणि या विचाराच्या टोंचणीमुळे च जमिनीचे मालक आपण केलेल्या अन्यायाचें प्रायश्चित्त म्हणून च स्वेच्छेने आपली मालकी सोडून देतील आणि त्यामुळें समाजात क्रांति घडून येईल. डा. राधाकृष्णन् याला Revolution by consent म्हणजे स्वेच्छाकृत क्रांति म्हणतात. समस्येच्या मानानें अगदीं थोडी असली तरी चार वर्षांत ४० लक्षाहून अधिक एकर जमीन भूमिदानांत मिळाली आहे. या चळवळींवर देशातल्या बहुधा सर्व वर्गांतल्या

लोकांचें सगळीकडे उत्तरोत्तर प्रेम वाढत आहे. देशातली हवा बदलत आहे. शिवाय केवळ जमिनीचा च प्रश्न या चळवळीनें सुटेल एवढे च नाहीं. जमिनीचा प्रश्न शांततेनें सुटल्यामुळे अहिंसक समाजरचनेचा पाया घातला जाईल आणि अहिंसक समाज प्रस्थापित होईल. जर या पवित्र मार्गानें भारतातला प्रश्न सुटण्याचा संभव आहे तर भारतानें कोणत्या हि वाईट उपायाचें अवलंबन का करावें? विनोबा म्हणतात, "कोणाला तहान लागली असेल आणि त्याला स्वच्छ पाणी मिळेल तर तो घाण पाणी पिणार नाहीं. पण त्याला जर स्वच्छ पाणी मिळालें नाहीं तर तो घाण पाणी प्याल्याशिवाय राहणार नाहीं भारतामध्ये चांगल्या मार्गानें गरिबांचा प्रश्न सुटला तर वाईट मार्ग स्वीकारला जाणार नाहीं." थोडक्यात सांगायचें म्हणजे ज्या ठिकाणीं दारिद्र्य असतें त्या ठिकाणीं च साम्यवाद डोकें वर काढतो. हिंदुस्थानात हि तो येऊं शकेल. जगात कोठें हि असूं शकेल. त्याकरिता बाहेरून त्याचें आक्रमण होण्याची आवश्यकता नाहीं.

साम्यवादी असा आक्षेप घेतात कीं, भूदान यज्ञ हा सावकाश जाण्याचा रस्ता आहे, त्यावर विनोबा म्हणतात, "ज्या ठिकाणीं आजपर्यंत फक्त घेण्याचा च अभ्यास केला होता त्या ठिकाणीं मी तर समाजाला दान देण्याच्या अभ्यासाचें शिक्षण देत आहें. असा अभ्यास होणें, संघ निर्माण करणें, हें हळूहळू घडणारें आहे. माझी इच्छा तर सर्व जगात हि जमिनीचें पुन्हा वाटप व्हावें. आज जगातले सर्व लहानमोठे देश भयग्रस्त आहेत. या भयातून मुक्त होण्याचा कोणाला च उपाय सापडत नाहीं. असा मुक्त होण्याचा उपाय बाहेरून सापडणार नाहीं. तो अंतःकरणात सापडणार आहे. हा मार्ग मीं शोधून काढला आहे पण लोक म्हणतात कीं, आमचा अहिंसेचा मार्ग फार लांब आहे. जर त्यांना तातडतोब पोंचण्याचा रस्ता पाहिजे असेल तर तो रस्ता त्यांना मृत्यूच्या वाटेला च नेईल हें त्यांनी विसरूं नये."

बिहारमध्यें कम्युनिस्टांनीं आणि फॉरवर्ड ब्लॉकच्या लोकांनीं सामान्य लोकांना विनोबांच्या कार्यक्रमाबद्दल सावध राहण्याबद्दल इशारा दिला आहे. याविषयीं विनोबा म्हणतात, त्यांच्या मतें संघर्ष हें च जीवनाचें मूळ आहे. सर्व जीवन च संघर्षमय आहे. आई पाजायला घेते तो हा हि मातेच्या स्तनाबरोबर मुलाचा संघर्ष चालतो, असें का म्हणायाचें? सर्व जग संघर्षानें चालत

नाहीं; प्रेमानें चालतें. मरणारा माणूस मृत्यूच्या वेळीं आपल्या प्रियजनांना समक्ष पाहू शकला तर त्याला शांतीनें मरण येतें. तेव्हा त्याच्या डोळ्याचा त्याच्या प्रिय जनांशीं संबंध असतो असें का म्हणायचें? हे लोक नीट विचार च करीत नाहींत म्हणून त्यांचें सर्व काम निष्फळ होत आहे.

"ते म्हणतात कीं, लोकांनीं माझ्या मोहजालात सापडू नये पण त्यांना लोकांना काय सांगायचें आहे कीं, ज्यांना जमीन मिळाली आहे किंवा मिळणार आहे त्यांना ते असें सांगणार आहेत कीं, त्यांनीं ती जमीन घेऊ नये किंवा जे भूमिदान देत आहेत त्यांनीं ती देऊ नये! अशा करण्यानें ते एक उत्तम संधि गमावीत आहेत. स्वातंत्र्याच्या लढ्यात हि कम्युनिस्टांनीं सहकार्य दिलें नाहीं. तेव्हा हि त्यांनीं अशी च चांगली संधि फुकट घालविली. म्हणून त्यांना मी आमंत्रण करीत आहें कीं, त्यांनीं या वेळीं तरी ही संधि साधावी आणि या आंदोलनाला सहकार्य द्यावें. त्यांनीं आपल्या हृदयाचें आणि बुद्धीचें दार बंद करून टाकलें आहे. या विज्ञानाच्या युगात तर बुद्धीचा दरवाजा नेहमीं खुला राखला पाहिजे.

## (४९) कम्युनिस्टांच्या आक्षेपाचें खंडन

१९५३ सालच्या ३१ ऑक्टोबर या दिवशीं बिहारमध्यें मोंगीर जिल्ह्यातल्या बिहट गावीं कम्युनिस्ट कार्यकर्त्यांकडून विनोबांना एक पत्र देण्यात आलें होतें. त्या पत्रात भूदान यज्ञ आंदोलनाविरुद्ध कित्येक प्रश्न उपस्थित करण्यात आले होते. विनोबांनीं आपल्या एका प्रार्थनोत्तर भाषणात त्या प्रश्नांना उत्तर दिलें आहे. मार्क्सच्या अनुयायांकडून भूदान-यज्ञाविरुद्ध सामान्यतः जे आक्षेप घेतले जात त्या सर्वांचें विनोबांनीं त्यात खंडन केलें आहे. विनोबा म्हणतात, "कम्युनिस्ट लोक भूदान यज्ञ काळ बुद्धीचा च आहे एवढें च म्हणत नसत, तर हें आंदोलन त्यांच्याविरुद्ध आहे असें हि त्यांचें म्हणणें होतें. पण आनंदाची गोष्ट आहे कीं, जसजशी भूदान यज्ञाची भावना सामान्य लोकांत पसरू लागली, तिचा विकास होऊ लागला, दानपत्रं मिळूं लागलीं, हिंदुस्थानात सर्वत्र जागृति दिसूं लागली आणि त्यांचा प्रभाव जगावर हि पडूं लागला, तसतसे कम्युनिस्ट लोकांच्यामधले हि कित्येक लोक जागे होऊं लागले आहेत;

आणि आम्हाला त्याचेकडून सहकार्य मिळत आहे. कित्येक ठिकाणीं त्यानीं मला दानपत्रें दिलीं आहेत आणि मानपत्रें हि दिलीं आहेत. आणि आता तर एक मोठे कम्युनिस्ट पुढारी श्री. गोपालन् यानीं अशी घोषणा केली आहे : 'भूदान यज्ञाच्या चळवळीपासून विनोबा जितकी आशा बाळगीत आहेत तितकी जरी आम्हाला वाटत नसली, आणि कायद्याशिवाय हा प्रश्न सुटणार नाहीं असें आमचें मत असलें, तरी हे आंदोलन एक चांगलें आंदोलन आहे असें मला वाटतें.' मला वाटतें, *श्री. गोपालन् याची ही उक्ति त्याच्या हृदयपरिवर्तनाचें चिह्न आहे.* कुणाचें हि हृदयपरिवर्तन होणें शक्य नाहीं असें मानणें योग्य नाहीं. हृदयपरिवर्तन होणें शक्य आहे असें ज्याना वाटतें ते गौरवाला पात्र आहेत. जे आपलें हृदयाचे कधीं परिवर्तन होणार नाहीं असें मानतात ते जड आहेत. कारण असें समजणें हें जडाचें च लक्षण आहे, चेतनाचें नाहीं. मला माहीत आहे कीं, कम्युनिस्ट चेतन आहेत, जड नाहींत. म्हणून च त्याचें काहीं थोडें हृदयपरिवर्तन झालें आहे. प्रथम ते लोक ही चळवळ निरुपयोगी आहे असें म्हणत होते, एवढें च नाहीं तर ती चुकीची आहे, भ्रांत आहे, असें मानीत होते. आज ते ती ही चळवळ निरुपयोगी समजत असले तरी चुकीची आहे असें म्हणत नाहींत एवढा तरी त्याच्यांत बदल झाला आहे.

कम्युनिस्टाचा असा आक्षेप आहे कीं, भूदान यज्ञाची चळवळ यशस्वी झाली तर जमिनीचे लहान लहान तुकडे होतील, त्यामुळे देशाचें नुकसान होईल. भांडवलदाराना हि असें च वाटतें. यासंबंधीं त्या दोघाचें एकमत आहे. विनोबा म्हणतात, "कम्युनिस्ट आणि भांडवलवाले या दोघाना हि उत्पादनव्यवस्था केंद्रीभूत व्हायला पाहिजे आहे. पण ती वाटण्याच्या विषयात मात्र दोघाचें मत एक नाहीं. भांडवलवाले म्हणतात, दक्षतापूर्वक योग्य माणसाच्या हातात जमीन दिली पाहिजे. कम्युनिस्ट म्हणतात, तिचं समान वाटप झालें पाहिजे. एवढा च या दोघामध्यें मतभेद आहे. परंतु आम्हाला उत्पादन हि विकेंद्रित व्हायला पाहिजे आहे. ह्याविषयीं आमच्याशीं विरोध करायला दोघे हि एकत्र झाले आहेत. याप्रमाणें जे परस्परविरोधी असतात, परस्पराचे शत्रू असतात, ते हि परमार्थाविषयीं

एकत्र येऊं शकतात. या ठिकाणीं कम्युनिस्ट आणि भांडवलवाले दोघे हि उत्पादनव्यवस्थेचें केंद्रीकरण करूं इच्छितात म्हणून त्यांना जमिनीचे तुकडे मोठे मोठे असणें सोयीचें वाटतें परंतु उत्पादनव्यवस्था विकेंद्रीकृत असेल तर जमिनीचे तुकडे लहान झाले तरी शास्त्रीय पद्धतीनें आणि जरूर तितकी पाण्याची व्यवस्था केली आणि योग्य खत दिलें तर शेतीच्या उत्पन्नाचें प्रमाण केंद्रित उत्पादनापेक्षा कमी होणार नाहीं, उलट कित्येक ठिकाणीं जास्ती होईल.

कम्युनिस्टांनीं आपल्या पत्रात लिहिलें आहे कीं, ' तुमच्या चळवळींत कित्येक दोष आहेत म्हणून त्यावर आमचा विश्वास नाहीं.' त्याच्या उत्तरात विनोबा म्हणतात, " याचा अर्थ असा कीं, त्यातले दोष काढून टाकले तर या चळवळीवर त्याचा विश्वास बसेल."

कम्युनिस्टाचा असा आक्षेप आहे कीं, विनोबा गरीब लोकांचें संघटन मोडून टाकीत आहेत त्यावर विनोबाचें असें उत्तर आहे कीं, " माझ्या-संबधीं त्यांची ही धारणा चूक आहे. उलट मी असा दावा करतों कीं, माझ्या या दोन वर्षांच्या चळवळीमुळें भूमिहीनामध्यें जी जागृति उत्पन्न झाली आहे अशी जागृति दुसऱ्या कोणत्या हि चळवळीनें झालेली नाहीं. मजकडे हजारों भूमिहीन येतात आणि ते कबूल करतात कीं, मी त्यांच्या वतीनें च, त्यांचा प्रतिनिधि होऊन च, त्यांची मागणी करीत आहें."

विनोबा जमिनीची भिक्षा मागून गरीब भूमिहीनांच्या हक्कावर गदा आणीत आहेत या कम्युनिस्टांच्या आक्षेपावर उत्तर देताना विनोबा म्हणतात, " मी हक्क च मागत आहें, भिक्षा नाहीं. मी है जमिनीची च मागणी करीत असतां एवढ्यानें काम यशस्वी झालें नाहीं तर अधिक मागेन. मला इतकें दिलें पाहिजे अशी मागणी काहीं भिकारी करीत नाहींत. जे काहीं मिळेल त्यावर भिकारी संतुष्ट असतो. मी एखाद्या आश्रमा करिता जर जमीन मागत असतों, तर काहीं थोडी जमीन लोकांनीं मला दिली असती, आणि मीं त्यांचे आभार मानले असते, आणि आश्रमाच्या अहवालात त्यांच्या दानाचा उल्लेख करून लिहिलें असतें कीं, ' मी त्यांचा फार ऋणी आहें.' परंतु भूदान यज्ञाची गोष्ट वेगळी आहे जर कोणीं मला

हजार एकर भूमिदान दिलें, आणि त्याच्याजवळ त्याच्या अनेकपट जर जमीन असेल तर ती हजार एकर जमीन हि मी स्वीकारीत नाहीं. मी म्हणतों कीं, हें तर भिक्षा दिल्यासारखें होतें. मी भिक्षा घ्यायला आलेलों नाहीं, तर दीक्षा द्यायला आलेलों आहें"

कम्युनिस्टांचें असें म्हणणें आहे कीं, श्रीमंत लोक विनोबांना फक्त शेतीला निरुपयोगी पडीक जमीन देत आहेत. याला उत्तर देताना विनोबा म्हणतात, "मी हनुमानाचें काम करीत आहें सगळा पर्वत च मी रामाजवळ आणून देत आहें. त्यांतून जरुरीची वनस्पति शोधून घेता येईल. मी श्रीमंताना मागत आहें कीं, त्यांच्याजवळून बत्तीस लक्ष एकर उत्तम जमीन मला मिळाली पाहिजे. तिच्याशिवाय पहाड दिलात तरी तो हि मी घेईन. कारण तो हि आमच्या मातृभूमीचा भाग आहे. आमचें त्याच्यावर हि प्रेम आहे. शिवाय खराब जमीन देताना हि ते कांहीं तरी त्याग करीत च असतात. कांहीं का देईनात, जेव्हा ते कांहीं तरी देतात तेव्हा त्यांच्या अंगणात माझा प्रवेश होतो. तेथून एकेक पाऊल पुढें सरकत त्यांच्या स्वैंपाकघरात हि मी शिरेन आणि म्हणेन, हा मी तुमचा मुलगा आलों आहें, मला खायला द्या. तेव्हा त्यांना मला खायला देणें भाग पडेल."

भूदान यज्ञाच्या कार्यपद्धतीसंबंधीं जे आक्षेप होते त्याला उत्तर देण्याच्या प्रसंगीं विनोबा म्हणतात कीं, 'श्रीमंतामध्यें जे कोणी सज्जन आणि उदार आहेत त्यांना दान देण्याची आणि मालकीचा त्याग करण्याची प्रेरणा देऊन, त्यांच्याकडून भूमिदान ग्रहण करून, त्यांना भूमिदानाच्या भावनेची दीक्षा देत आहें आणि श्रीमंतातले जे कोणी कृपण आणि संकुचित अंतःकरणाचे आहेत त्यांना या सज्जन लोकांपासून वेगळें काढून टाकीत आहें.' कम्युनिस्ट लोक श्रीमंताना गरिबांचे शत्रु समजून त्यांच्याबरोबर गरिबांचा संघर्ष आणि लढाई लावून देत आहेत. म्हणून कम्युनिस्ट लोक भेद, विरोध, लढाईची भाषा करतात म्हणून त्यांच्या मार्फत च त्यांना समजावून देणें सुलभ होतें भेदाची भाषा ते सहज समजतात म्हणून विनोबा अभेदवादी असून हि भेदाची भाषा, लढाईची भाषा, कित्येक वेळीं उपयोगात आणीत असतात "मीं गरिबांच्या शत्रूंच्या फळीमध्यें फूट पाडली आहे. कम्युनिस्ट लोक गरिबांच्या सर्व शत्रूंना एक करीत आहेत. त्यांच्यामुळें

सज्जन आणि दुर्जन पण होतात आणि त्यामुळे दुर्जनांची शक्ति वाढते. श्रीमंतात शेकडा दहा तरी लोक सज्जन असतील च ना? हे दहा लोक जरी त्यांना मिळाले तरी त्यांच्या पुण्याने फळ बाकीच्या नव्वद लोकांना हि मिळेल म्हणून त्यांच्यातले जे सज्जन आहेत त्यांना मी अहिंसक उपायाने त्यांच्यातून फोडून बाहेर काढण्याची खटपट करीत आहे भेदनीतीचा उपयोग करण्याची कुशलता त्यांच्याजवळ नाहीं त्यांना राजनीति समजत नाहीं, नीतिशास्त्र हि समजत नाहीं" ते आणखी हि म्हणतात कीं, कुस्ती लढण्याच्या वेळीं समोरच्या पेलवानाशीं हात मिळवावे लागतात, मग जय कोणाचा हि होवो यासाठी च विनोबांनीं मोठमोठ्या जमीनदारांशीं, राजे लोकांशीं, कुस्ती खेळण्याकरितां हात मिळविले आहेत जर त्यात विनोबांचा पराजय झाला तर श्रीमंतामध्ये शेकडा शंभर लोक दुर्जन आहेत हें कम्युनिस्टांचें म्हणणें सिद्ध होईल. पण जर विनोबांचा जय होईल तर गरिबांचें मंगल साधलें जाईल अर्थात् विनोबांनीं जमीनदारांपुढें जो हात पुढें केला आहे त्यामुळें कम्युनिस्टांचें कांहीं नुकसान नाहीं.

सध्याच्या स्थितींत कायद्याचे द्वारा जमिनीचा प्रश्न सुटण्याची शक्यता आहे कीं नाहीं याविषयीं ते म्हणतात, "प्रभाव तीन प्रकारचा असतो. पहिला—लूट करू, जमीन द्या, नाहीं तर गोळी चालवू हा. दुसरा—कायद्याचा प्रभाव. तिसरा—नीतीच्या द्वारा लोकमताचा प्रभाव. मला नैतिक प्रभाव पाहिजे. नैतिक दबावाशिवाय हृदयपरिवर्तन करू शकेन असा दावा मी करीत नाहीं. यानतर हि कायद्याची तयारी करता येईल तुमचा कायद्यावर विश्वास आहे पण कायद्यात शक्ति कोठून येते? कायद्याला जनतेकडून नाहीं तर सैन्याकडून शक्ति मिळते. जर २५ एकराचें सीलिंग— व्यक्तिगत जास्तींत जास्ती जमीन ठेवण्याचें प्रमाण— ठरविलें तर हजारों मध्यमवर्गीयांच्या कडून जमीन काढून घ्यावी लागेल जगात सध्या मध्यमवर्गीयांचें राज्य आहे. ते शिक्षित आहेत वर्तमानपत्रें ते च चालवतात. म्हणून या मध्यम वर्गीयांच्याकडून कायद्याच्या बळावर मोबदला न देता जमीन घेता येणार नाहीं. त्यांच्या हातून जमीन काढून घ्यावयाची असेल तर रक्तमय क्रांति व्हावी लागेल. अशी क्रांति या ठिकाणीं होणें संभवनीय नाहीं मला असे हि दिसून आलें आहे कीं, जेव्हा सीलिंगची गोष्ट उठते तेव्हा लोक आपापसात

भूमि वाटून घेतात म्हणून कायद्यानें जमिनीचा प्रश्न सोडवायचा असेल तर तो तेव्हा च शक्य होईल कीं जेव्हा मोबदला न देता जमीन काढून घेण्याचा दुसरा कांहीं उपाय सापडेल ही गोष्ट हि मध्यमवर्गाच्या संमतीनें च करावी लागेल भारताच्या घटनेंत मोबदला देण्याची गोष्ट आहे ही कांहीं अनुचित गोष्ट नाहीं कारण कायदा लोकमताच्या आधारावर च केला गेला आहे कम्युनिस्टांचें म्हणणें आहे कीं, ही चुकीची तयारी आहे परंतु जी चूक लोकमतानें होते तिला चूक म्हणणें योग्य नाहीं. म्हणून सध्याच्या परिस्थितींत कायदा करून हि जमीन गरिबांकरिता मिळणार नाहीं लोक आपापसांत जमीन वाटून घेतील आणि जी काय थोडी मिळेल ती खराब उरलेली मिळेल मी खराब जमिनीबरोबर चांगली जमीन हि लोकांच्याजवळ मागत च आहें.

मनुष्याच्या हृदयाची मौलिक समता आणि समाजाला अखेर सरकारची अनावश्यकता यासंबधीं विवेचन करतांना विनोबा म्हणतात, " कम्युनिस्ट भाईंनीं सज्जनतेवर विश्वास ठेवला नाहीं तर त्यांच्या गुरूनें त्यांना जें शिक्षण दिलें आहे तें सफळ होणार नाहीं त्यांचा गुरु कार्ल मार्क्स म्हणतो कीं, प्रथम गरिबाचें राज्य होईल आणि त्यानंतर सरकार च मुळीं राहणार नाहीं. याचा अर्थ असा होतो कीं, कोणाच्या हि हातीं कसली हि सत्ता नसली तरी राज्य चालू शकतें. यावर जर विश्वास ठेवायचा असेल तर सामान्य लोकांवर हि विश्वास ठेवावा च लागेल. हे लोक म्हणतात, अखेरीला सरकार लय पावेल, कसल्या हि अधिकाराचें कारण उरणार नाहीं आणि सर्व लोक सद्भावानें आपलें जीवन घालवितील असें असेल तर सज्जनतेवर विश्वास ठेवला पाहिजे. मार्क्सनें जें सांगितलें आहे तें लाखों वर्षांनंतर घडायचें आहे असें नाहीं तें आता च घडलें पाहिजे जर सज्जनतेवर विश्वास ठेवला नाहीं तर सरकार कायमचें राखावें लागेल आणि असें कबूल करावें लागेल कीं, State will wither away अर्थात् सरकारचा लय घडून येईल, सरकार विरून होऊन जाईल, हा सिद्धान्त चूक आहे. सरकार अनवश्य आहे असें म्हणणारे लोक केवळ कम्युनिस्टांत च आहेत असें नाहीं, तर काँग्रेसमधें आणि सर्वोदयावर विश्वास असणाऱ्या लोकांत हि आहेत. या कल्पनेसंबधीं तीन भिन्न मतें आहेत. (१) कम्युनिस्टांचें म्हणणें आहे अखेरीस सरकारचें

अस्तित्व राहणार नाहीं. परंतु वर्तमान स्थितींत सरकार अत्यंत बळकट, मजबूत असणें जरूर आहे, म्हणून सध्या सर्व सत्ता केंद्रित असायला पाहिजे. याला ते Dictatorship of Proletariate म्हणजे गरिबांची हुकूमशाही असें म्हणतात. त्यांना वाटतें कीं, सध्या हुकूमशाही असली तरी सत्ता क्षीण होत जाईल. ( २ ) दुसरें मत आहे आमचें. आम्हाला वाटतें कीं, सरकारची आवश्यकता राहणार नाहीं आणि आतापासून च ते क्षीण करण्याच्या कामाला आरंभ करणें जरूर आहे हळूहळू सत्तेचें विकेंद्रीकरण केलें पाहिजे. विकेंद्रीकरणाशिवाय सत्ता विलुप्त होण्याचा संभव नाहीं. ( ३ ) ही गोष्ट स्वीकार करणारे लोक जगांत पुष्कळ आहेत कॉंग्रेस आणि प्रजा सोशॅलिस्ट मध्यें हि अनेक लोकांना ही गोष्ट कबूल आहे, परंतु त्यांचें म्हणणें असें कीं, कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत सरकार कायमचें राहील च. म्हणून मी कम्युनिस्टांना म्हणतों, त्यांच्या आणि आमच्या कल्पनेंत एका ठिकाणीं तरी मेळ आहे, तो असा कीं, शेवटीं सरकारची सत्ता राहणार नाहीं. ही गोष्ट जर त्यांना मान्य करायची असेल तर ती ते कोणत्या सिद्धान्तावर मान्य करतील ? तो सिद्धान्त हा च कीं, मनुष्याच्या अंतःकरणांत सज्जनता आहे, म्हणून च शेवटीं राज्याची आवश्यकता राहणार नाहीं या च सिद्धान्तावर असेल ना ? अशा अवस्थेमध्यें माणसाच्या सज्जनतेवर विश्वास ठेवणें भाग आहे.''

## ( ५० ) साम्ययोग

पूर्वीं सांगितलें च आहे कीं, सर्व लोकांचा चांगल्या प्रकारें समान विकास करणें हें सर्वोदयाचें ध्येय आहे. अधिकांतल्या अधिक लोकांचें अधिकांत अधिक हित साधणें एवढ्यानें भागणार नाहीं. कारण त्याचा अर्थ असा होतो कीं, उरलेले जे लोक असतील त्यांना दुःख होवो, त्यांचा नाश होवो, याबद्दल उद्वेग किंवा चिंता वाटण्याचें कारण नाहीं उलट, अधिकांत अधिक लोकांचा चांगला विकास करण्याचा मार्ग सुलभ करण्याकरितां थोड्या लोकांचा नाश करणें जरूर आहे, ही गोष्ट तर कधीं हि मान्य केली जाणार नाहीं. कारण मी कोण याचा जर आम्ही गंभीरपणें विचार करूं लागलों तर आम्हाला समजून येईल कीं, मी जसा आहे तसे च दुसरे आहेत.

मी दुसऱ्यामध्यें आणि दुसरे माझ्यामध्यें समान भावानें आहेत जोंपर्यंत दुसऱ्याचा हि विकास आणि अभ्युदय पूर्ण होणार नाहीं तोंवर माझा हि विकास आणि अभ्युदय पूर्ण होणार नाहीं. याचें कारण हें कीं, सर्व माणसामध्यें एक च आत्मा अनंतगुणसंपन्न आणि अनेक भावानीं विकासशील आहे. सर्वांमध्यें एक च आत्मा म्हणून सर्वांचा समान विकास होऊं शकतो एका च जन्मात तसें घडणार नाहीं जीवनाच्या सर्व क्षेत्रात ही गोष्ट आणली पाहिजे जीवनाचे विभाग करून पाहता येणार नाहीं, म्हणून आध्यात्मिक, नैतिक, सामाजिक, आर्थिक, राजकीय वगैरे क्षेत्राकडे आपण सारख्या च दृष्टीनें पाहिलें पाहिजे आणि समता स्थापन करण्याचा प्रयत्न केला पाहिजे आज जर आपण व्यक्तिगत जीवन, तसें च सामाजिक आणि जागतिक जीवन याच्या प्रवाहाकडे दृष्टि टाकली तर आपण व्यावहारिक क्षेत्रात हि ही गोष्ट सिद्ध करणें आपल्यास शक्य होईल. आज जगामध्यें वेगवेगळ्या देशात इतका द्वेष, हिंसा आणि झगडे का आहेत? एका देशाला दुसऱ्या देशाकडून इतकें भय का वाटत ? याच्या मुळाशीं ही च गोष्ट आहे कीं, एक देश आपल्याला दुसऱ्या देशापेक्षा मोठा समजतो, आणि दुसऱ्याला सोडून आपली च तेवढी उन्नति करू इच्छितो आणि सुख भोगू इच्छितो. कारण या देशाला वाटतें कीं, दुसऱ्या देशाची उन्नति झाली तर ती आपल्या देशाच्या उन्नतीच्या मार्गांत एक विघ्नरूप होईल. या भ्रांत मनोवृत्तीपासून हिंसा आणि द्वेष उद्भवतात आणि स्वत च्या नाशाला हि आमंत्रण देतात. समाजाकडे दृष्टि टाकली तर दिसून येईल कीं, ज्या ठिकाणीं मनुष्य उच्च जातींत जन्म झाल्यामुळें आपल्याला उच्च आहे असें मानून दुसऱ्याच्या स्पर्शापासून आपल्याला दूर राखतो, त्या ठिकाणी तो स्वत. च संकुचित होऊन जातो. आणि ही मनोवृत्ति जीवनाच्या अन्य क्षेत्रात हि त्याला संकुचित करून टाकते. मी ज्याला खाली दडपून वा दाबून राखू पाहता तो हि आपल्याला खाली ओढण्याचा प्रयत्न करितो. जर आपल्या आजूबाजूचे सर्व लोक नैतिक दृष्ट्या अधःपतित जगतील तर त्यांची प्रतिक्रिया आपल्या नैतिक जीवनात काही ना काहीं प्रमाणात झाल्याशिवाय राहणार नाहीं.. धार्मिक क्षेत्रात हि व्यक्तिगत, कौटुंबिक, राष्ट्रीय, समाजगत, आर्थिक उन्नतीच्या मानावर च बरीचशी अवलंबून असते. सर्वांभूतीं एक

आत्मा या मौलिक विचारावर विश्वास ठेवला तर च आपल्याला सर्वांमध्यें आणि सर्वांना आपल्यामध्ये पाहण्याची दृष्टि मिळते आणि त्यापासून सुख-दुःखात सर्वांना आपल्याबरोबर वाटेकरी च पहाण्याचें शिक्षण मिळत. विनोबा याला ‘ साम्ययोग ’ म्हणतात. साम्ययोग च भूदान-यज्ञाची मूळ विचारधारा आहे गीतेच्या सहाव्या अध्यायात २९ ते ३२ या चार श्लोकात हा साम्ययोग सांगितला आहे. ते चार श्लोक असे :

२९ भूतात भरला आत्मा भूतें आत्म्यात राहिलीं
योगानें जोडिला देखे हें नि सर्वत्र दर्शन

३० मज सर्वांत जो पाहे पाहे माझ्यात सर्व हि
त्याचा मी आणि तो माझा एकमेकास अक्षय

३१ स्थिर होऊनि एकत्वीं सर्व भूतीं भजे मज
राहो कसा हि तो योगी माझ्यामध्यें चि राहतो

३२ जो आत्मौपम्यबुद्धीनें सर्वत्र सम पाहतो
जसें सुख तसें दुःख तो योगी थोर मानिला.

साम्ययोगाची ही च समग्र दृष्टि आहे. विनोबा यौवनाच्या सुरुवाती-पासून च नैष्ठिक सन्यासी आहेत. म्हणून आध्यात्मिकतेच्या पायावर च त्यांची प्राथमिक दृष्टि आहे. साम्ययोग किंवा साम्याचें समग्र दर्शन हा मौलिक आध्यात्मिक सिद्धान्त त्यांच्या जीवनाच्या विशेष क्षेत्रात प्रवेश करीत असलेला दिसतो. त्यांची समदृष्टि सामान्यातून विशेषा-कडे, समष्टीतून व्यष्टीकडे संक्रमित होते आध्यात्मिकतेची समग्रता अर्थात् आत्म्याच्या एकत्वाच्या ज्ञानातून विशिष्ट विशिष्ट व्यावहारिक क्षेत्रात हें एकत्वाचें ज्ञान पोंचले आहे दुसरीकडे महात्मा गांधींना रस्किनच्या ‘अन्टु धिस् लास्ट’ या ग्रंथातून आर्थिक क्षेत्रात अर्थात् जीवनाच्या एका विशिष्ट क्षेत्रात समदृष्टीची प्रेरणा मिळाली. क्रमानें ही समदृष्टि जीवनाच्या दुसऱ्या हि विशिष्ट विशिष्ट क्षेत्रात प्रसार पावली आणि शेवटीं ती साम्ययोगात म्हणजे च साम्याच्या समग्र दृष्टींत परिणत झाली म्हणून म. गांधींच्या जीवनदर्शनाच्या प्रगतीची प्रणाली inductive म्हणजे आरोहात्मक आहे, आणि विनोबाच्या जीवनदृष्टीच्या प्रगतीची प्रणाली *deductive* म्हणजे

अपरोहात्मक आहे. त्यांच्या आपआपल्या प्रारंभिक जीवनाच्या वैशिष्टयातून या प्रणालीमध्यें फरक पडला आहे.

## ( ५१ ) साम्यवाद आणि साम्ययोग

या भूदान यज्ञाच्या मूळ विचारधारेला विनोबांनीं ' साम्ययोग ' हें नाव दिलें आहे. याचें कांहीं विवेचन पूर्वी च करण्यात आलेले आहे. साम्ययोगाच्या पायावर च सर्वोदयसमाजाची उभारणी झाली आहे. आज जगात जे सर्व विचारप्रवाह चालू आहेत त्यांच्याशीं तुलना करून ' साम्ययोगा 'चें विवेचन करणें जरूर आहे म्हणजे साम्ययोगाचें वैशिष्टय आणि त्याची प्रगति समजून घेणें सोपें होईल. शिवाय जीवनाच्या वेगवेगळ्या क्षेत्रात साम्ययोगानें क्रांतिकारक परिवर्तन कसे घडवून आणलं आहे याचें हि अधिक विवेचन करणें जरूर आहे.

जगात आज तीन मुख्य विचारप्रवाह चालत आहेत. ( १ ) भांडवलशाही म्हणजे पुंजीवाद, (२) लोकमतावर आधारलेला Democratic समाजवाद, आणि ( ३ ) साम्यवाद Communism. यामध्यें भांडवलशाही सर्वांत जुनी आहे. योग्यता आणि कार्यक्षमता वाढविणें एवढें च भांडवलशाहीचें ध्येय. विनोबा म्हणतात, " भांडवलशाहीचा फक्त कार्यक्षमतेवर विश्वास आहे. तिच्या मतें ज्याची कार्यक्षमता कमी त्याना कमी मिळेल, ज्याची कार्यक्षमता ज्यास्त त्याना ज्यास्त देणें जरूर आहे. कार्यक्षमतेच्या प्रमाणात वेतन देऊन भांडवलशाहीची समाजात योग्यता वाढविण्याची खटपट आहे. भांडवलशाहीमुळें कांहीं लोकांचें जीवनमान अत्युच्च कोटीला गेलें आहे हें खरें आहे, पण तिच्यामुळें च बहुसंख्य लोकांचें जीवनमान अत्यंत अवनत होऊन गेलें आहे भांडवलशाही या गोष्टीचा प्रतिकार करू शकत नाहीं. भांडवलशाही स्पष्टपणें म्हणते जे कार्यक्षम नाहींत ते अवनत स्थितींत राहणार च, त्याला इलाज नाहीं. आणि ज्याना योग्यता आहे त्याना च सुखोपभोग घेण्याचा अधिकार असणें ही गोष्ट अनिवार्य आहे. या कारणामुळें जगात आज दु:ख आहे. म्हणून भांडवलशाहीचें समर्थन

करणारे लोक हि आज फार कमी आहेत. आज ना उद्या तिचा निश्चित-पणें लोप व्हावयाचा आहे."

लोकशाही समाजवादामध्यें प्रत्येकाला मताचा अधिकार हा समाज-कल्याण साधण्याचें मोठें हत्यार आहे. परंतु मताच्या बळावर काम करायचें म्हटलें तर पुष्कळ क्षेत्रामध्ये अल्पमतवाल्याचें हित पाहिलें जात नाहीं. या अडचणीचें लोकशाही समाजवादात निराकरण नाहीं म्हणून विनोबा म्हणतात, "लोकशाहीमध्यें प्रत्येक व्यक्तीला एक 'व्होट' आहे. त्या ठिकाणीं मताच्या बळावर काम चालतें. त्यामुळें अल्पसंख्यावाल्या हितांचें रक्षण होत नाहीं. बहुसंख्यावाल्यांचें कल्याण साधलें जातें. लोकशाही समाजवाद असा दावा करतो कीं, लोकशाहीमध्ये सगळ्यांचें हितरक्षण करण्याची व्यवस्था करण्या-सारखी आहे. परंतु लोकशाहीत जे दोष घडून येतात ते दूर करण्याचा उपाय समाजवादाच्या हातात नाहीं. जोंपर्यंत अल्पसंख्याकांच्या हितांचें रक्षण बहुसंख्यावाल्यांच्या मतावर अवलंबून असतें तोंपर्यंत पूर्ण समाजवाद प्रस्थापित होणार नाहीं."

येथें समाजवादाचें थोडें विवेचन करणें जरूर आहे. विनोबा म्हणतात, "साम्यवाद म्हणतो, उच्च वर्गाचा नाश केल्याशिवाय समता स्थापन करणें शक्य होणार नाहीं. वर्गसंघर्ष आणि आज ज्यांच्या हातात सत्ता आहे त्यांचा नाश याशिवाय अन्य उपाय नाहीं. येथपर्यंत हिंसेचा आश्रय घेणें आवश्यक आहे आणि हा च खरा धर्म आहे. पण यांच्यामुळें जगात शांतीची स्थापना होणार नाहीं हें सर्वांना माहीत आहे. कारण हिंसेमुळें प्रतिहिंसा होते–जरी हिंसेच्या साहाय्यानें ती कांहीं दिवस दाबून ठेवणें शक्य आहे–एवढें च नाहीं तर यामुळें मानवतेच्या मूल्याला च धक्का लागतो आणि मनुष्याची प्रतिष्ठा नष्ट होते."

म्हणून साम्ययोगाचा विचार सर्वांनीं गंभीरपणें समजून घेणें जरूर आहे. साम्ययोग म्हणजे काय हें सांगताना विनोबा म्हणतात, "साम्ययोग म्हणतो, सर्व माणसामधें एक च आत्मा समानभावें अधिष्ठित राहिला आहे. मनुष्या-मनुष्यात कांहीं भेद आहे असें साम्ययोग मानीत नाहीं एवढें च नाहीं तर मनुष्याचा आत्मा आणि प्राणिमात्राचा आत्मा यामध्यें हि कांहीं मौलिक

भेद नाहीं. तरी पण साम्ययोग एवढें मान्य करितो कीं, मनुष्याचा आत्मा जितका विकसित होणें संभवनीय आहे तितका इतर प्राण्याचा नाहीं. अभ्यासानें जरी मनुष्याच्या आत्म्याचा विकास करितां येतो तरी सर्व मनुष्याचा सारखा च विकास होत नाहीं. प्राणिमात्रांत हि एक च आत्मा *अधिष्ठित आहे. म्हणून शक्यतोंवर सर्व प्राणिमात्रांचें रक्षण करण्याचा* प्रयत्न करणें मनुष्याचें कर्तव्य आहे.

"साम्यवाद आणि साम्ययोग यामध्यें असा फरक आहे कीं, साम्यवाद आत्म्याच्या अभिन्नत्वावर विश्वास ठेवीत नाहीं, परंतु साम्ययोगाचा त्यावर विश्वास आहे. साम्ययोग केवळ आत्म्याच्या अभिन्नत्वावर विश्वास ठेवून थांबत नाहीं. तो या श्रद्धेच्या पायावर च आणखी हि पुढें पाऊल टाकतो. आणि त्या योगानें नैतिक, आर्थिक, सामाजिक आणि राजकीय क्षेत्रांत क्रांतिकारक बदल घडवून आणतो.

"जेव्हां आपण एखादा मौलिक आध्यात्मिक सिद्धान्त मान्य करतों तेव्हां तो जीवनाच्या अनेक शाखांमधें प्रवेश करून कार्य करीत असतो. आमच्या स्वतःच्या बुद्धिवृत्तीचे मालक आपण नाहीं. तिचा मालक एकमात्र परमेश्वर च आहे. आमच्याजवळ जे काहीं गुण आहेत ते सर्व समाजाकरितां आहेत. म्हणून आम्हांला जी काहीं शक्ति मिळालेली आहे ती समाजाच्या सेवेला च लावली पाहिजे. आपण तर आपल्या स्वतःच्या शरिराचे हि मालक नाहीं. आपण फक्त त्याचे विश्वस्त आहों. आमच्याजवळ जी काहीं संपत्ति आहे, तिचे आम्ही मालक नाहीं. तिचा मालक परमेश्वर. ट्रस्टीशिप म्हणजे विश्वस्तपणाचा विचार मान्य केला तर विचारांत पूर्ण क्रांति घडून येते. आमच्याजवळ जें काहीं आहे तें सर्व समाजाच्या सेवेसाठीं आहे. व्यक्तिगत स्वार्थ समाजाच्या चरणीं अर्पण करण्याकरितां च साधायचा आहे. साम्ययोग आणि साम्यवाद यांच्यामध्यें हा अत्यंत मोठा फरक आहे."

साम्ययोगाचा सिद्धान्त मान्य केला तर तो आर्थिक क्षेत्रांत कसें क्रांतिकारक परिवर्तन घडवून आणतो याचें विवरण करतांना विनोबा म्हणतात, "जी व्यक्ति आपली पूर्ण शक्ति लावून समाजाचें काम करील तिला च आपल्या जीवनभर निर्वाहाला ज्याची जरूरी आहे ती वस्तु मिळण्याचा

अधिकार राहील. त्या व्यक्तीला डोळे नाहीत, तरी जेवढें काम करणें शक्य आहे तेवढें तो करीत असेल तर त्याला त्याचें पूर्णपणें पोषण करण्याकरिता लागणाऱ्या वस्तूवर त्याचा हक्क आहे. जो आंधळा आहे त्यानें आपल्या शक्तीप्रमाणें काम केलें तर ज्याला डोळे आहेत त्याच्यापेक्षा त्याच्या कामाचें प्रमाण कमी असेल, म्हणून त्यानें केलेल्या कामाच्या *प्रमाणात च त्याचें पोषण करण्याची व्यवस्था करणें हें न्यायाचें नाहीं.* पोषण ही भौतिक वस्तु आहे, सेवा ही नैतिक वस्तु आहे नैतिक वस्तूचें मूल्य भौतिक वस्तूच्या मूल्यावरून ठरविता येणार नाहीं. एखादा मनुष्य बुडू लागला त्या वेळीं त्याला बाहेर काढण्याकरिता जीं दहा मिनिटें लागलीं असतील त्या दहा मिनिटांच्या सेवेचें मूल्य मजुरीच्या हिशोबानें मागता येईल का? आई आपल्या मुलाची, मुलगा बापाची, शिष्य गुरूची, आणि मंत्री समाजाची सेवा करतात, परंतु या सर्व सेवाकार्याची किंमत पैशाच्या हिशोबात ठरविली जात नाहीं. त्या सेवेमध्यें अंतःकरण ओतलेलें असतें त्या सेवेची किंमत पैशाच्या हिशोबात कशी मागता येईल? मुलगा आपल्या आईला जें देतो, विद्यार्थी गुरूला, त्याप्रमाणें शेतकरी जे समाजाला देतो तें अमूल्य आहे. नैतिक मूल्याप्रमाणें च आर्थिक क्षेत्रात हि श्रमाची किंमत समान असली पाहिजे परंतु आज सर्व विपरीत झालें आहे. शारीरिक कामापेक्षा बौद्धिक कामाला जास्त किंमत दिली जाते. त्याला मान हि ज्यास्त दिला जातो. परंतु अशा प्रकारच्या विषमतेला कसला हि आधार नाहीं. साम्ययोगाचा विचार आत्म्याच्या समत्वावर आधारलेला आहे म्हणून तो आर्थिक क्षेत्रात हि कसल्या प्रकारची विषमता मान्य करीत नाहीं. तरी सेवकाच्या भूमिकेप्रमाणे सेवेच्या प्रकारात भेद होऊ शकेल. जी सेवा आई करू शकते ती मुलाच्या हातून होणार नाहीं, आणि जी सेवा मुलगा करू शकतो ती आईच्या हातून होणार नाहीं. जी सेवा मालकाच्या हातून होईल ती सेवकाच्या हातून होणार नाहीं व जी सेवकाच्या हातून होईल ती मालकाच्या हातून होणार नाहीं जी सेवा भाऊ करू शकेल ती बहीण करू शकणार नाहीं, आणि जी बहीण करू शकेल ती भाऊ करू शकणार नाहीं. याप्रमाणें व्यक्तीच्या वेगळ्या भूमिकेप्रमाणें आणि वेगळ्या शक्तीप्रमाणें प्रत्येकाच्या

सेवेत पुष्कळ वेगळेपणा असू शकेल; परंतु सर्वांची काळजी सारखी च घेतली पाहिजे.

"हाताचीं बोटें लहानमोठीं आहेत परंतु तीं सर्व सारखीं आहेत. एका बोटाने जें काम होतें तें काम दुसऱ्या बोटाला करता येणार नाहीं. म्हणून हें समजणें आवश्यक आहे कीं, समाजामध्यें एकाची सेवा दुसऱ्याच्या सेवेहून वेगळी असू शकेल, परंतु तिचें आर्थिक मूल्य समान असलें पाहिजे.

"आम्ही असें समजलों आहों कीं, साम्ययोगाच्या सिद्धान्ताप्रमाणें जसा नैतिक मूल्यात कांहीं फरक नाहीं तसा च आर्थिक क्षेत्रात हि फरक असणें योग्य नाहीं. आपला विकास करण्याकरिता प्रत्येकाला समान संधि मिळाली पाहिजे. शिक्षणाची हि संधि सर्वांना सारखी असली पाहिजे. विद्यार्थी त्याच्या ग्रहणशक्तीप्रमाणें शिक्षण मिळवू शकतो ही गोष्ट खरी, म्हणून वेतनाच्या प्रमाणात कमीजास्ती केल्यास समाजाची उन्नति योग्य प्रमाणात होणार नाहीं. याच्यामुळें आज होत आहे त्याप्रमाणें एक क्षेत्र सोडून ज्या ठिकाणीं वेतन जास्त मिळतें त्याचें आकर्षण वाढतें. समान वेतनाची व्यवस्था केल्यास ही मनोवृत्ति नाहींशी होईल. आर्थिक क्षेत्रात साम्ययोगाचा परिणाम असा होईल कीं, प्रत्येक गाव संपूर्णपणें स्वावलंबी होऊन जाईल. अन्नधान्य, कापड, दूध, तूप वगैरे ज्या वस्तु जीवनाला आवश्यक आहेत त्या सर्व प्रत्येक गांवात भरपूर प्रमाणात उत्पन्न केल्या जातील, आणि त्यामुळें गाव स्वावलंबी होईल. हे गाव स्वावलंबी असेल आणि ते हि गाव स्वावलंबी असेल. याप्रमाणें दोन्ही गावें स्वावलंबी झालीं म्हणजे समता स्थापन होईल. जर हे गाव अपूर्ण असेल आणि ते हि अपूर्ण असेल तर दोन्हींच्या अपूर्णतेमुळें समता स्थापन होणार नाहीं. ज्या वस्तूंची मौलिक आवश्यकता आहे त्या सर्व वस्तूंचें गावात उत्पादन होणें आवश्यक आहे. परमेश्वराने सर्वांना परिपूर्ण निर्माण केले आहे. बुद्धि आणि शक्ति कमीज्यास्ती असतील, परंतु परमेश्वराची व्यवस्था अशी विकेंद्रित आहे कीं, तीमुळे सर्वांचा च विकास होऊ शकतो. याप्रमाणें विकेंद्रित व्यवस्था आर्थिक क्षेत्रात हि होणें जरूर आहे."

राजकीय क्षेत्रात साम्ययोगाचा परिणाम सांगताना विनोबा म्हणतात, "साम्ययोगामुळें राजकीय क्षेत्रातल्या सध्याच्या मूल्यात परिवर्तन होईल.

आम्हाला केवळ शोषणहीन समाज पाहिजे असें नाहीं. आम्हाला शासनहीन समाज हि पाहिजे आहे. साम्ययोगाच्या सिद्धान्ताप्रमाणे राजनीय सत्ता गावा-गावात वाटली जाईल, अर्थात् गावागावात त्यांचें स्वत-चें राज्य च प्रस्थापित होईल. केंद्रराज्याकडे नाममात्र सत्ता राहील आणि असें होता होता शेवटीं शासनहीन समाज घडला जाईल."

साम्ययोग सामाजिक क्षेत्रात जी क्रांति घडवून आणील तिचें वर्णन करताना विनोबा म्हणतात, "सामाजिक क्षेत्रात हि जातिभेद किंवा उच्च-नीच भेदाभेद राहणार नाहीं. जर कोणाच्या अंगीं ब्राह्मणाचे गुण असतील तर त्याला योग्य असें काम दिलें जाईल, पण म्हणून तो इतरांपेक्षा उच्च आहे असें मानलें जाणार नाहीं. त्याप्रमाणें च भंगी किंवा चांभार वगैरेंना नीच गणलें जाणार नाहीं, कारण त्याच्याशिवाय समाज चालणार नाहीं."

साम्ययोगानें च खरी क्रांति घडून येईल असा दावा करून विनोबा म्हणतात, "याप्रमाणें नैतिक, आर्थिक, राजनीय, सामाजिक व्यवस्थेमध्यें असें परिवर्तन घडवून आणणें हें साम्ययोगाचें ध्येय आहे याला च क्रांति म्हणता येईल. आजकाल हिंसेला च क्रांति म्हटलें जातें. परतु ज्या ठिकाणीं मौलिक विषयात क्रांति होत नाहीं त्या ठिकाणीं वरवर परिवर्तन झालें असलें तरी त्याला क्रांति म्हणणें चुकीचें आहे. क्रांति तेव्हा च होईल कीं जेव्हा आम्ही आमच्या नैतिक जीवनात क्रांतिकारक परिवर्तन करण्यास समर्थ होऊ. माझा असा दावा आहे कीं, साम्ययोग हें नैतिक परिवर्तन करू शकतो कारण साम्ययोगाचा पाया आध्यात्मिक आहे आणि तो जीवनाच्या सर्व शाखामध्यें क्रांति घडवून आणतो." अर्थात् आत्म्याची एकता मान्य केली तर च नैतिक क्षेत्रात समतेची मनोवृत्ति निर्माण होऊ शकेल नाहीं तर नाहीं. ज्या ठिकाणीं नैतिक क्षेत्रात समतेची वृत्ति असणार नाहीं त्या ठिकाणीं जीवनाच्या इतर क्षेत्रात हि मूलभूत समता होणार नाहीं

साम्ययोगाची व्यापक दृष्टि वर्णन करताना विनोबा म्हणतात, "साम्य-योगाचा विचार अत करणात प्रथम मोह आणि ममतेपासून मुक्त झालें पाहिजे असे सागतो. मोह आणि ममतेपासून मुक्त होण्याचा उपाय भूदानयज्ञ

हा आहे. मुक्त कसें होता येईल? जमिनीची मालकी सोडून दिली म्हणजे या मुक्तीच्या साधनेला सुरुवात होईल. भूमिदान देऊन आम्ही कोणावर कृपा करीत नाहीं. मी आणखी एक पाऊल पुढें जाऊन असें म्हणेन कीं, एखाद्या प्रदेशात जर जमीन कमी असेल आणि लोकसंख्या जास्त असेल तर एका प्रदेशातल्या लोकाना दुसऱ्या प्रदेशात जाऊन वसती करायला मिळाली पाहिजे. त्याप्रमाणें च एका देशातल्या लोकाना दुसऱ्या देशात जाऊन वसती करायला मिळाली पाहिजे. पृथ्वीमातेचें दार सर्वांना मोकळें पाहिजे. ज्याना जेथें राहण्याची इच्छा असेल त्याना तेथें राहता आलें पाहिजे. याप्रमाणें आम्ही जगाचे नागरिक होऊ इच्छितों. आणि सर्व प्रकारे आर्थिक, सामाजिक आणि राजकीय भेद दूर करू इच्छितों. जमीन थोडी असो, तिचे लहान किंवा मोठे तुकडे असोत, ती सर्व परमेश्वराची देणगी आहे. आम्हीं तिचे मालक होऊ शकत नाहीं. भारताचे रहिवासी भारताचे मालक, जर्मनीचे रहिवासी जर्मनीचे मालक, ही धारणा चुकीची आहे पृथ्वीवर जितकी हवा आहे, जितकें पाणी आहे, जितका प्रकाश आहे, जितकी भूमि आहे, ती सर्व लोकांची संपत्ति आहे. ही साम्ययोगाची व्यापक दृष्टि आहे."

## (५२) आतां सख्यभक्तीचें युग

अनादि कालापासून मानवसमाजाचा विकास होत आला आहे. आत्मा अनंतगुणसंपन्न आहे. एकेका युगात आवश्यकतेनुसार आत्म्याच्या एकेक गुणाचा विकास होण्याची जरूरी असते तेव्हां त्या गुणाचा विकास होतो. आणि त्या काळीं समाजामध्यें त्या गुणाचें चिंतन आणि मनन होत असतें. याप्रमाणें एका काळीं समाजात स्वच्छता या गुणाच्या विकासाची आवश्यकता होती. त्या युगात समाजामध्यें स्वच्छतेला च धर्म म्हणून मानलें गेलें. दुसऱ्या युगात कामनियमनाची आवश्यकता होती तेव्हां कामनियमन करण्याकरिता विवाहप्रथा निर्माण केली गेली. सर्व गुणाचा लोक आदर करतात हें खरें आहे. परंतु कालाप्रमाणें आणि परिस्थितीप्रमाणें समाजात ज्या गुणाच्या विकासाची विशेष आवश्यकता असेल त्या गुणाचा प्रयोग करण्याकरिता समाज उत्सुक असतो. माणूस स्वच्छतेचा आदर करतो, कामनियमनाचा हि आदर करतो, परंतु आज समाज त्याचा विशेष विकास करण्याकरिता

उत्सुक नाहीं. त्या गुणाचा प्रयोग किंवा विकास करण्याकरिता समाज आज उत्सुक आहे ते कोणते आहेत? विनोबा म्हणतात, आज तीन गुणाची जरूरी आहे. ( १ ) निर्भयता, ( २ ) समता, आणि ( ३ ) समाजनिष्ठा. समतेविषयी प्रथम आपण विचार करूं. एका काळीं चांगल्या उद्देशानें च वर्ग निर्माण करण्यात आले. यासंबंधीं विनोबा म्हणतात, "अशी व्यवस्था होती कीं, प्रत्येकजण आपआपल्या योग्यतेनुसार शिक्षण मिळवूं शके. त्या काळीं मनुष्याची योग्यता पाहिली जाई. त्या काळच्या लोकांना वाटलें कीं, ज्याची बुद्धि कमी आहे त्याना शिकण्या वाचण्याची काय जरूरी आहे? ते जर श्रमाच्या कामाला लागतील तर चांगलें होईल. त्याना जर बुद्धीचें काम दिलें तर त्यांच्या हातून बुद्धीचें काम होणार नाहीं आणि श्रमाचें हि काम होणार नाहीं." म्हणून श्रेणी किंवा वर्ण निर्माण करण्यात आले. कोणावर राज्य करण्याचा, देशाचें रक्षण करण्याचा भार टाकण्यात आला, कोणावर व्यापार व्यवहार करण्याचें काम सोंपविण्यात आलं, आणि कोणाला शरीरश्रमाचें काम देण्यात आलें. वेगवेगळ्या वर्णांची सेवा करण्याचें काम आणखी एका वर्गाकडे दिलें गेलें. आता आपल्याला वाटतें कीं जातिभेद उत्पन्न करण्याचा उद्देश चांगला नव्हता. पण तें बरोबर नाहीं. कोणत्या वाईट उद्देशानें जाति किंवा वर्ण याची स्थापना झाली नाहीं. विनोबा म्हणतात, "पुढें असमता वाढली आणि लोकांना वाटलें कीं, प्रत्येकाची हि योग्यता वाढविता येणें शक्य आहे. ज्या काळीं विज्ञान वाढलें नव्हतें त्या काळीं जाति उदयास आल्या. परंतु जेव्हा विज्ञानाचा विकास होऊं लागला तेव्हापासून वाटूं लागलें कीं, विज्ञानाच्या साह्यानें सर्व माणसांचा समान विकास होऊं शकतो. म्हणून जातिवर्णांचें आता कारण उरलें नाहीं." समाजात असमतामूलक आणि समतेला अडथळा आणणाऱ्या ज्या ज्या व्यवस्था होत्या किंवा निर्माण केल्या होत्या त्यासंबंधीं हि ही च स्थिति आहे. अर्थात् आजच्या विज्ञानाच्या युगांत ही असम व्यवस्था राखण्याचें कांहीं कारण नाहीं. म्हणून आज समाजात समतेची तीव्र भूक जागृत झाली आहे. समतेच्या विरोधी असलेली कोणती हि गोष्ट समाजाला चांगली वाटत नाहीं. समाजात समता आणणा-

करिता जी कांहीं चळवळ असेल तिच्यात च सामान्य लोकांना उत्साह वाटतो; कारण ही च आजच्या काळाची मागणी आहे.

आज समतेचें युग आलें आहे म्हणून समाजात, वर्गावर्गात, व्यक्तिव्यक्तीत जें प्रेम, श्रद्धा आणि भक्ति होती त्या भूमिकेंत क्रांतिकारक परिवर्तन होण्याशिवाय गत्यंतर नाहीं. एकमेकांत जसा संबंध वाढेल तसे च एकमेकांत प्रेम, भक्ति आणि श्रद्धा हि वाढेल. एकमेकांशीं संपर्क येण्याच्या भूमिकेंत च क्रांतिकारक परिवर्तन होत आहे. म्हणून प्रेम, श्रद्धा आणि भक्ति यांच्या स्वभावांत च क्रांतिकारक फरक झाला आहे. समतेच्या युगांत भक्तीचा प्रकार असतो. 'सख्यभक्ति' शास्त्रामध्यें पांच प्रकारचे प्रेमभाव अथवा भक्तिभाव यांविषयीं वर्णन आहे. शास्त्र म्हणतें, भक्तिभाव पांच प्रकारचा आहे. जसा–शांत, दास्य, सख्य, वात्सल्य आणि मधुर. ऋषिमुनींचा भाव होता शांत भाव. 'स्वानंदमावे परितुष्टः' 'आत्मन्येवात्मना तुष्टः' हा त्यांचा भाव होता. आईचा आपल्या मुलाविषयीं जो भाव असतो तो वात्सल्य भाव. जसा श्रीकृष्णाविषयीं यशोदेचा. मधुरभाव असतो तो जसा गोपींचा भाव. दास्यभाव असतो तो जसा आपल्या धन्याकरिता सेवकाचा भाव. रामाविषयीं हनुमंताचा भाव होता तो दास्यभाव. भावाविषयीं भावाला वाटणारें प्रेम, मित्राला मित्राविषयीं वाटणारें प्रेम हा सख्यभाव. श्रीकृष्णाविषयीं अर्जुनाची जी भक्ति, श्रद्धा वा प्रेम होतें ती सख्यभक्ति. एक व्यक्ति दुसऱ्या व्यक्तीकडे ज्या भावनेनें पाहते, दुसरी व्यक्ति हि तिच्याकडे त्या च भावनेनें पाहते. जो ज्या दृष्टीनें पाहतो त्याचा भाव हि तसा च, आणि ज्याचा जसा भाव तसा च तो स्वतः हि.

'यो यः श्रद्धः स एव सः।' ज्याची जशी श्रद्धा तसा च तो असतो. आज समतेचें युग आहे. याचें विस्तारपूर्वक विवरण करून ते म्हणतात, "अर्जुन आणि भगवान् श्रीकृष्ण यांच्यामध्यें सख्यभक्तीची भूमिका होती. एक दुसऱ्याच्या बरोबर या भावनेनें च दोघेजण काम करीत असत. श्रीकृष्ण ज्ञानाचें भांडार होता. अर्जुनाचें ज्ञान मर्यादित होतें. तो पराक्रमी होता खरा, परंतु त्याची शक्ति परिमित होती. श्रीकृष्णाची शक्ति अमर्याद होती परंतु त्या दोघांमध्यें सख्यता होती व मित्रत्व होतें. दोघांमधला संबंध

समतेचा होता. श्रीकृष्णाविषयीं अर्जुनाच्या मनात आदर होता, श्रद्धा होती; पण तिचें मूळ समता च होतें. यापूर्वी एक युग असें होतें कीं, तें दास्यभक्तीचें होतें. त्या युगात स्वामी आणि सेवक असा भाव होता. स्वामी आणि सेवक यांच्या मनात एकमेकांविषयीं प्रेम होतें. परंतु स्वामी सेवकाचें पालनपोषण करी आणि सेवक धन्याची भक्ति करी. हें हनुमानाचें युग होतें. हनुमान रामावर जी भक्ति करीत होता ती भक्ति दास्यभक्ति होती. आज जगामध्यें सख्यभक्तीची भूक विशेष आहे. याचा अर्थ असा नाहीं कीं, जो पूज्य पुरुष आहे त्याच्यावर भक्ति असणार नाहीं परंतु भक्तीच्या बरोबर समतेचा संबंध राहील. जेव्हा युद्ध सुरु झालें तेव्हा अर्जुनानें श्रीकृष्णाला विचारलें कीं, "तुम्ही, मला साहाय्य कराल ना? तुम्ही माझे सारथी व्हा आणि माझ्या घोड्याची देखरेख करा." याप्रमाणें अर्जुनानें आपल्या परमपूज्य व्यक्तीला घोड्याची सेवा करायचें काम दिलें मित्रत्वाचा संबंध होता म्हणून च तो असें करू शकला.

"हनुमानाच्या काळीं समाजाची घटना अशी होती कीं, बलवान् व्यक्ति स्वामी होत असे आणि सेवापरायण व्यक्ति दास होत असे. प्रभु आणि दास याच्यामध्यें प्रेम होतें, आदर होता. कोणत्या हि तऱ्हेचा विवाद नव्हता. परंतु त्या युगात विकासाची मर्यादा एवढी च झाली होती." श्रीरामचंद्र राजाराम होते, परंतु श्रीकृष्ण राजाकृष्ण नव्हता. तो गोपाल कृष्ण होता. भाऊ हि होता. सध्याच्या युगात एकमेकाबद्दल कितीं हि प्रेम असो, तरी प्रभु आणि सेवक असा संबंध मानला जाणार नाहीं. आज स्वामी आणि सेवक यांचे संबंध चांगले असू शकतील, परंतु आजच्या युगाची मागणी सख्यभक्ति आहे. स्वामी सेवक संबंध आजच्या युगाला चालणारा नाहीं

"म्हणून मी जेव्हा दान मागतों तेव्हा असें म्हणत नाहीं कीं, 'आपण मोठे, आपण स्वामी, आपण मालक आम्हाला दान द्या. आम्ही तुमची सेवा करू. आम्ही तुमच्याशीं कृतज्ञ राहू.' मी तर सांगतों कीं, तुम्ही आम्ही भाऊ भाऊ आहोंत. मला माझी वांटणी द्या तुमचा माझा भाग सारखा आहे. दानाचा अर्थ आहे समविभाजन. समान वाटणी हा शंकराचार्यांचा अर्थ आहे. म्हणून जर कोणी शंभर एकरांतून दोन एकर

दान देऊं लागला तर तें मी घेत नाहीं. जर मी सेवकाच्या मनोवृत्तीनें मागत असतों तर दोन एकर हि मीं घेतले असते आणि त्याला नमस्कार केला असता, त्याच्याशीं कृतज्ञ राहिलों असतों आणि त्याचे आभार मानले असते. परतु आज मी मित्रत्वाच्या नात्यानें जमीन मागत आहे. आजची समाजरचना सख्याच्या नात्याला च मानते. आज गुरुशिष्य एकमेकाचे मित्र असतात. एकमेकामध्यें प्रेम असेल. गुरु शिष्याला शिकवील आणि शिष्य हि गुरुला शिकवील. त्याच्याजवळ जें असेल तें तो दुसऱ्याला देईल. दोघे हि एकमेकाचे उपकार मानतील. याप्रमाणे समतेचा संबंध मान्य करून गुरु-शिष्य राहतील, मालक-मजूर राहतील, आणि स्वामी-सेवक राहतील.

"एक समय असा होता कीं, पत्नी पतीला देव मानीत असे आणि आपल्याला दासी मानीत असे. तो काळ काहीं वाईट नव्हता. परतु आज आम्ही एक पाऊल पुढें गेलों आहोंत. वर्तमानयुगात पत्नी पतिव्रता असेल आणि पति पत्नीव्रत घेईल. एक दुसऱ्याला देवता मानील. ज्याची योग्यता जास्त तो आदरणीय होईल. जर पतीची योग्यता जास्त असेल तर पत्नी त्याच्यावर श्रद्धा ठेवील. आणि पत्नीची योग्यता जास्त असेल तर पति तिच्यावर श्रद्धा ठेवील परतु दोघाचा संबध समान भावाचा असेल. याला च मी सख्यभक्तीचें युग म्हणतों." सध्याच्या युगात ह्या परिवर्तनाचे लक्षण आणखी एक दोन कुटुंबांतल्या संबधाच्या क्षेत्रात दिसून येतें. पूर्वी बगाली कुटुबात लहान भावजयीला मुलीचे ठिकाणीं समजत आणि भावजय वडील दिराला पित्याप्रमाणें मानीत असे आणि त्याप्रमाणे च एकमेकाना संबोधीत. आजच्या चालीप्रमाणें भावजय वडील दिराला दादा म्हणून हाक मारू लागली आहे आणि वडील दीर आपल्या भावजयीला तिच्या नावानें हाक मारतो. एकमेकामध्यें श्रद्धा आणि भक्तीचा भाव नाहीं. तरी तिचें आज सख्यभक्तींत रूपांतर झालें आहे. आज गुजराथी कुटुंबात मुलगा पित्याला नावानें हाक मारतो. वडिलाचें नाव जर मनूभाई असेल तर मुलगा त्याला मनूभाई या नावानें च संबोधतो. यावरून येथें पितापुत्रातला संबध कमी झाला आहे असें नाहीं. काळ बदलल्यामुळें हा एवढा बदल झालेला आहे.

विनोबा आणखी म्हणतात: "युगाच्या मागणीप्रमाणें आपल्याला समाजरचना केली पाहिजे. आज आम्हीं हें समजणें जरूर आहे कीं, पूर्वींच्या युगात जें मूल्य होतें तें आता टिकून राहणार नाहीं. तुळशी-रामायणाच्या काळीं त्याचें जें मूल्य होतें तें आजच्या काळीं मूल्य असणार नाहीं. त्या काळीं ब्राह्मण श्रेष्ठ होते; परंतु वर्तमानकाळीं ब्राह्मण श्रेष्ठ आहेत असें मानलें जाणार नाहीं. जे चांगले असतील ते च श्रेष्ठ गणले जातील, परंतु संबंध समतेचा च असेल.

"सध्याच्या काळीं कारखान्यामध्यें मालक आणि मजूर असतील. एकाची बुद्धि अधिक आहे, दुसऱ्याची शारीरिक शक्ति जास्त आहे. तुम्ही मालक आणि आम्ही तुमचे चाकर हा संबंध यापुढें चालणार नाहीं. आता तर दोघे हि भागीदार होतील. बौद्धिक कामाकरिता मालकाला जें वेतन मिळेल त्या च प्रमाणात शारीरिक कामाकरिता मजुराला हि वेतन मिळेल. वेतन सारखें च असेल, परंतु ज्याची योग्यता जास्त तो आदरणीय होईल एक दुसऱ्याचा मित्र असेल, साथी असेल

"वर्तमानयुगात भावाभावाचे, गुरुशिष्याचे, पतिपत्नींचे संबंध नवीन प्रकारचे असतील. त्यात नवीन गोडी आहे. पूर्वींच्या युगात परस्पराच्या या संबंधात एक गोडी होती. परंतु ती आता विकृत होऊन गेली आहे. पतिराज बिघडून गेले असले तरी त्याला देवता मानलें जात असे आणि पत्नी साध्वी असली तरी तिला मान नसे. अशी परिस्थिति नवीन युगात चालणार नाहीं.

"आज जर स्वतः रामचंद्र पृथ्वीवर आले आणि ते राजाराम होण्याची इच्छा करूं लागले तर ती गोष्ट आम्ही मान्य करणार नाहीं. म. गांधी असले तरी त्यांना आम्ही राजा गांधी करणार नाहीं, ते म. गांधी च राहतील. पूर्वींच्या काळीं चांगले राजे होऊन गेले. पण त्यापेक्षा ज्यास्त राजे वाईट होते. पूर्वी प्रजेचा विकास मर्यादित होता. परंतु आज काल पुढें गेला आहे. जी व्यक्ति बदललेल्या काळाप्रमाणे वागायला शिकणार नाहीं ती व्यक्ति हार खाईल, मार हि खाईल. प्रवाहात पडल्यानंतर माणूस जरी स्वस्थ बसला तरी प्रवाह च त्याला आपल्याबरोबर घेऊन जातो.

परतु तो प्रवाहाच्या उलट जाण्याची खटपट करू लागला तर काहीं थोडा व्यायाम होईल खरा, पण तो पुढें जाऊं शकणार नाहीं.

" मनुष्य केवढा हि मोठा असो परतु त्याला पूर्वीची प्रतिष्ठा मिळणार नाहीं, त्याचा पूर्वीचा थाट चालणार नाहीं. माझ्याजवळ त्याचें उदाहरण आहे. परशुराम केवढा मोठा महापुरुष होता! त्याची कीर्ति हि मोठी होती. त्यानें एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली. तो अवतार होता. पण रामचंद्र आल्यानंतर परशुरामानें ओळखून घेणें जरूर होतें कीं, हा नवीन अवतार आहे. त्यानें तें ओळखलें नाहीं, आणि तो रामाशीं लढायला उभा राहिला. त्यात त्याचा पराजय झाला परशुरामाप्रमाणें शक्तिशाली पुरुष काळाच्या विरुद्ध जाऊं लागला तेव्हा तो टिकूं शकला नाहीं. तेव्हा दुसरा कोण कसा टिकूं शकेल? पूर्वीची चाल किती हि चांगली असो, ती नवीन काळात उपयोगी पडणार नाहीं.

" आज कार्यकर्त्यांच्या बरोबर बोलत होतों तेव्हा मी त्याना म्हणालों, मी जेव्हा हें मागतों तेव्हा तो काहीं दैवस म्हणून मागत नाहीं. मी तर विचार समजावून देत असतों कीं जमीन, संपत्ति आणि उत्पादनाचीं साधनें यावर सर्वांचा समान अधिकार आहे. युगाची मागणी जी व्यक्ति सांगूं लागते, तिला लोक उद्दट समजतात. जर त्याला आपण उद्दट मानलें तर तो उद्दट दिसेल, परतु काळाची भूक ओळखून घेतली तर जे मागायला येतील ते नम्रतेनें मागतील आणि एहान मोल्यावर श्रद्धा टेवतील. आईबापाचे मुलाशीं जे संबंध असतात त्याविषयीं बोलताना विनोबा म्हणतात, " लोक म्हणतात कीं, आजकाल मुलें आईबापाचें ऐकत नाहींत, परतु मूल बाल्पणापासून आईवर पूर्ण श्रद्धा ठेवून च चालत असतें. आईनें सांगितलें कीं हा ' चादोबा ' आहे, तर मूल तो चादोबा च आहे असें मानतें. तो असें म्हणत नाहीं कीं, तो खरोखर चादोबा च आहे कीं नाहीं याचें मी संशोधन करून पाहतों. मग मी तो चादोबा आहे असें म्हणेन. मुलाची एवढी श्रद्धा असून हि लोक म्हणतात कीं, मुलें ऐकत नाहींत! मी तर असें म्हणतों कीं, आईबाप काळाचा ओघ समजत नाहीत. आईबापानी मुलाच्याशीं समानतेचा संबंध ठेवून चालावें आणि समतेच्या पायावर च प्रेम करावें. आपण वडील म्हणून त्याना हुकूम करूं नये. सगा

द्यावा, आज्ञा करू नये, आणि मार हि नये. पूर्वी आईबाप मुलाला मारीत असत. मनात प्रेम ठेवून च मारीत असत. तें आता चालणार नाहीं. या युगात आई म्हणेल, '*मी तुझ्या शासन करणार नाहीं, मी मला च दंड करीन, मी उपाशी राहीन.*'

"प्रत्येकाची आपली आपली काहीं विशेषता असते. मजुराची बुद्धि कमी असली तरी त्याच्या हृदयातली भावना मोठी असू शकते. कोणा-करिता ते जीव द्यायला हि तयार होतील. आमची बुद्धि मोठी असेल पण देह दुर्बल आहे, प्रत्येकामध्यें काहीं ना काहीं दुर्बलता असते तसें च काहीं वैशिष्ट्य हि असतें, म्हणून समतेच्या पायावर च एकमेकामध्यें प्रेम असावें."

या दृष्टीनें जर भूदान यज्ञाकडे पाहिलें तर ती युगाची मागणी आहे ही गोष्ट सहज समजून येईल. जर ती युगाची मागणी नसती तर गरिबापर्यंत लोकानीं दान दिलें नसतें आणि श्रीमंत लोकानीं विनोबाना उपद्रव दिला असता, त्याच्या मार्गात विघ्नें आणलीं असतीं. म्हणून विनोबा यासबंधीं म्हणतात, "हे नवे विचार मीं माझ्या थैलींतून बाहेर काढलेले नाहींत. कालाच्या प्रवाहातून च मीं ते घेतले आहेत. या विचाराचा प्रसार करायचा आहे ही दृष्टि ठेवून काम करा. कोटा पूर्ण करण्याचे दृष्टीनें करू नका. केवळ कोटा पूर्ण करून चालणार नाहीं जेव्हा तुम्ही सामान्य लोकाना हा विचार समजावून देऊ शकाल, सत्यभक्तीचें युग आहे हें त्याना पटवाल, तेव्हा च आपलें काम यशस्वी झालें असें मला वाटेल."

## (५३) साम्याचें स्वरूप

सध्याची समाजरचना निसर्गाला सोडून आहे विनोबा म्हणतात कीं, तें सघटन नाहीं, विघटन आहे यातला सर्वात मोठा दोष भयकर विषमता हा आहे. ही विषमता दूर करून समाजात समता स्थापन केली पाहिजे. ती समता कशा प्रकारची असेल? विनोबा म्हणतात, "आम्हाला नवीन रचना करायची आहे, त्याकरिता हाताच्या पाच बोटापासून आपल्याला शिकलें पाहिजे. हीं बोटें सर्व अगदीं समान असत नाहींत परतु अगदीं च असमान हि असत नाहींत. प्रत्येक बोट वेगळें असतें परंतु दुसऱ्या बोटाच्या साह्यानें तें काम करू शकतें. या पायावर च आपल्याला समाजरचना

करावयाची आहे. म्हणजे नवीन समाजात अत्यंत असमता असणार नाहीं आणि अत्यंत समता हि असणार नाहीं. या समाजात प्रत्येक व्यक्तीला वेगळें वेगळें व्यक्तित्व राहील. प्रत्येकाच्या व्यक्तित्वाचा विकास होईल, आणि प्रत्येकजण दुसऱ्याशीं सहकारितेनें काम करील, हें समजून देण्याकरिता मी दारोदार फिरत आहे. समाजात समता स्थापन करताना आपल्याला विवेकानें चाललें पाहिजे, तर च आपण आपल्या हाताच्या पाच बोटाकडून शिकलों असें होईल." विनोबानीं एक उदाहरण देउन ही गोष्ट समजावून दिली आहे. आई आपल्या मुलाला गणितानें हिशोब करून काहीं सारखें खायला देत नाहीं. सर्वांत लहान मुलाला फक्त दूध देते, त्याच्यापेक्षा मोठ्याला थोडें दूध, थोडी भातभाकरी देते, आणि सर्वांत मोठ्याला फक्त भात भाकरी देते. ही च विवेकयुक्त समता आहे अहिंसेच्या मार्गांत अशी च समता असते. दुसऱ्या देशामध्यें हिंसेनें जी समता स्थापन करण्याची खटपट करण्यात आली ती सफल झाली नाहीं विनोबा म्हणतात, "अशा प्रकारें त्याची भूक भागविण्याची आणि त्याच्या पचेंद्रियाच्या शक्तीचा विकास करण्याची व्यवस्था केली पाहिजे. ज्या ठिकाणीं हिंसेच्या द्वारा समता स्थापन करण्यात आली आहे त्या ठिकाणीं सर्वांना एका च साच्यात घालून पाडण्यात आलें आहे. आम्ही अशा प्रकारें सर्वांना एका च साच्यात घालणें केव्हा हि पसत करीत नाहीं आम्ही विवेकानें च समता आणू इच्छितों. आध्यात्मिक समता स्थापन करणें हें आमचें ध्येय आहे" मालकीच्या मोहाचा त्याग करणें हा आध्यात्मिक समतेचा पाया आहे. ही माझी जमीन, हें माझें घर, हें माझें शेत, असला मोह सोडून दिला पाहिजे हें जें सारें माझें आहे तें सर्वांच्या सेवेकरिता आहे. मी त्याचा फक्त रक्षक आहे, मी केवळ ट्रस्टी आहे, अशा तऱ्हेचा विचार समाजात स्थापन झाला पाहिजे तेव्हा च आम्ही आमचे ध्येय गाठलें असें होईल आपल्याजवळ जेवढी सपत्ति आहे तेवढी सगळ्याना जर पुरेशी नसेल तर सर्वांनीं च ती थोडी थोडी कमी घतली पाहिजे. एका रोटीनें पोट भरतें, आठ माणस आहेत. परतु सहा च भाकऱ्या आहेत. एकाला तीन दिल्या, दुसऱ्याला दोन दिल्या आणि उरलेली एक सहा जणात वाटून दिली असें आता चालायचें नाहीं. या व्यवस्थेंत बदल केला पाहिजे सगळ्यानीं च थोडें कमी खायचें कबूल

केले पाहिजे आणि धार्मी पाऊण रातीपेक्षा ज्यास्ती घेता उपयोगी नाही. अशा तऱ्हेची समतेची मनोवृत्ति लोकामध्ये यायला पाहिजे यासंबंधी विनोबानी एक दृष्टान्त दिला आहे "एक तामील साधू एका अगदी टाचक्या झोपडीत राहत असे. रात्री बाहेर भिजत असे एके दिवशी पाऊस पडल्यामुळे तो उठून झोपडीत जाऊन निजला इतक्यात कोणी तरी बाहेरून दार ठोठाविले साधू म्हणाला, 'ये बुवा आत घरामध्ये निजायला एका-पुरती च जागा आहे, परंतु आपण दोघे बसू शकतो' असे म्हणून त्याने त्याला आत घेतले आणि दोघेजण बसून राहिले. इतक्यात तिसरा एकजण दारावर खटखट करू लागला साधु म्हणाला, 'एकाला निजण्यापुरती जागा आहे, पण दोघेजण बसू शकतो परंतु उभे राहिलो तर तिघाची हि सोय होईल, तेव्हा आत ये आपण तिघे हि जण उभे राहू त्याला हि त्याने आत घेतले आणि तिघे हि जण उभे राहिले" भारतामध्ये समतेचा हा आदर्श ठेवून समाजरचना केली पाहिजे या प्रसंगी रूमी मसनवी याची एक गोष्ट आठवते एक सुफी साधु होता तो त्याच्या भावाच्या घरी गेला आणि त्याने त्याच्या दरवाज्यावर ठोठावले भाऊ घरात होता त्याने आतून विचारले, कोण आहे? सुफी म्हणाला, 'मी आहे' भावाने उत्तर दिले, निघून जा माझ्या टेबलावर दोघाच्या जेवणाची सोय नाही तेव्हा त्या सुफी भावाला मनात फार दु ख वाटले आणि त्याला निघून जावे लागले परंतु त्या दु खाने त्याचे अत करण जळू लागले तेव्हा तो भयाने आणि श्रद्धेने परत आला आणि पुन्हा त्याने दार ठोठावले आतून पुन्हा शब्द आला, कोण आहे? सुफीने उत्तर दिले, तुझा आवडता तू च आला आहे (Thou beloved thou) तेव्हा दरवाजा उघडला आणि भाऊ म्हणाला, Since thou art I, come in there is no room for two I s in this room (तू जेव्हा माझ्याशी एक होशील, तुझे मीपण जेव्हा नाहीसे होईल, तेव्हा आत ये, कारण माझ्या घरी दोन 'मी'ना जागा नाही)

## (५४) स्मशान-शांति

एके ठिकाणी असा आक्षेप घेतला गेला आहे की, ज्या ठिकाणी शांति नांदत होती त्या ठिकाणी विनोबाच्या आंदोलनामुळे स्थानिक लोकात

भूमीची भूक उत्पन्न झाली आहे. त्यामुळें अशांतता होण्याचा संभव दिसत आहे. त्याविषयीं विनोबा म्हणतात कीं, "ही शांति स्मशानशांततेसारखी आहे. असल्या शांतीपेक्षा कसली हि अशांतता निर्माण झाली तर ती मी सहन करून घेईन कारण जनता निद्रित असण्यापेक्षा ती जागृत होणें अधिक श्रेयस्कर आहे."

## ( ५५ ) विफलतेची प्रतिक्रिया

भूदान यज्ञाची चळवळ जर यशस्वी झाली नाहीं तर सामान्य लोकांवर आणि भूमिहीनांवर त्याची कशी प्रतिक्रिया होईल याविषयीं अनेक लोक चिंता व्यक्त करीत आहेत आणि चर्चा करण्याचा हि त्यांचा आग्रह आहे. परंतु आता च याविषयीं चर्चा करीत बसण्यात काहीं फायदा नाहीं, उलट नुकसान च होईल. दृढ विश्वास ठेवून अत्यंत निष्ठेनें, एकाग्र चित्त करून शांतीच्या कार्याला लागलें पाहिजे. नाहीं तर चळवळीचें पूर्ण फल मिळणार नाहीं. चळवळ यशस्वी होणार नाहीं कीं काय अशी चिंता आणि चर्चा करीत बसण्यामुळें तिची प्रतिक्रिया होते. ती शक्ति क्षीण करणारी आहे, घातक आहे काहीं असो, यासंबंधीं एवढें मात्र म्हटलें पाहिजे कीं, ज्या अर्थीं या चळवळीचा उद्देश शांतीच्या मार्गानें मनुष्याच्या अंत:करणांत शेजाऱ्या विषयीं प्रेम जागृत करणें आणि कुटुंबाच्या मनोवृत्तीचा विस्तार करणें हा आहे त्या अर्थीं हें कार्य काहीं थोड्या प्रमाणात का होईना जर सिद्धीस गेलें तर तिचें फल आणि प्रतिक्रिया चांगली च होईल. गीतेच्या भाषेंत सांगायचें झालें तर असें म्हणता येईल कीं, या महान् धर्मकार्याचा नुसता आरंभ देखील विफल होणार नाहीं. 'जोडा स्वल्प हि हा धर्म तारी मोठ्या भयातुनी.' अल्प प्रमाणात हि हा धर्म अनुसरल्यास त्याच्यामुळें महाभयापासून रक्षण होईल.

परंतु ही चळवळ अयशस्वी झाली तर स्वत: विनोबांच्यावर तिची प्रतिक्रिया कशी होईल यासंबंधीं विवेचन करणें जरूर आहे. चौकस लोक मधून मधून विनोबांना प्रश्न करतात कीं, भूदान यज्ञ जर पूर्णपणें सफल झाला नाहीं तर तुम्ही काय कराल? त्याला विनोबांनी एक दोन वेळा असें

उत्तर दिलें आहे कीं, त्यामुळें ते सत्याग्रह करतील असा आभास उत्पन्न व्हावा. या बाबतीत विनोबा ज्या सत्याग्रहाचा आग्रह करतील त्याचें स्वरूप कशा प्रकारचें असेल हें समजून घेणें जरूर आहे. हा सत्याग्रह कशा प्रकारचा राहील यावाबत विवरण करतांना विनोबा म्हणतात, "जर श्रीमंतांचें अंतःकरण द्रवलें नाहीं तर मी आणखी एक पाऊल पुढें टाकीत जाईन. आज मी जें काहीं करीत आहे त्यापेक्षा थोडें हि पुढें सरकायचें नाहीं असा प्रकारचें बंधन किंवा मर्यादा मी पाळून घेतलेली नाहीं. असल्या बंधनावर माझा विश्वास हि नाहीं. आमच्याजवळ प्रेमाची शक्ति असली पाहिजे. आईनें आपल्या मुलाकरितां किती हि त्याग केला असला तरी जेव्हां मुलगा वाईट मार्गाला लागतो, त्यामुळें तिला जेव्हां दुःख होतें, तेव्हां ती काय करते? तेव्हां ती सत्याग्रह करते. ती उपाशी हि राहते आणि मुलाला समजावून हि देते. दुसऱ्याला दुःख द्यायचें नाहीं, स्वतः दुःख सहन करीत दुसऱ्याला समजावून सांगायचें, याचें च नाव सत्याग्रह." परंतु आजकाल चहूंकडे सत्याग्रहाच्या नांवाखाली ज्या काहीं लहानमोठ्या गोष्टी करण्यात येत असतात तो सत्याग्रह नाहीं. सत्याग्रहाचें नाव ऐकतां च लोकांच्या मनात हा घुमीचा सत्याग्रह उभा राहतो. असल्या सत्याग्रहाची प्रतिक्रिया चांगली होत नाहीं. ज्यांना उद्देशून सत्याग्रह करण्यात येतो त्यांच्या मनात प्रेमभाव उत्पन्न होण्याऐवजीं विरोधाची भावना च उत्पन्न होते. यासंबंधीं विनोबा म्हणतात, "सत्याग्रहाचा प्रश्न उभा करून मी कोणाला भय दाखवीत नाहीं. मला माहीत आहे कीं, सत्याग्रहाचा 'दुरुपयोग' होऊं शकतो आणि आजकाल सर्व ठिकाणीं तो तसा होत आहे. परंतु मला विश्वास आहे कीं, आग्रह-पूर्वक सत्याचें आचरण केलें तर त्यामुळें सभोंवतालच्या सर्वांचें हृदय द्रवेल; याकरितां जो काहीं त्याग करावा लागेल तो करायला तयार होणें याचें नाव सत्याग्रह, आणि माझा असा हि विश्वास आहे कीं, पृथ्वीवर असा एक जरी सत्याग्रही असेल तरी त्याचा प्रभाव साऱ्या जगावर पडेल आणि सर्व जगाचें अंतःकरण विरघळून जाईल, परंतु त्याच्या मनात सर्व जगावर प्रेम असलें पाहिजे."

ज्या उपवासाच्या योगानें सगळ्यांच्या हृदयात प्रेमभाव उत्पन्न होईल तो च खरा उपवास. परंतु ज्यातून विपरीत प्रतिक्रिया उत्पन्न होईल, द्वेष

आणि विरोध वाटेल तो उपवास चुकीचा. ज्याला उद्देशून उपवास केला असेल त्याला वाटलें पाहिजे कीं, आपली चूक झाली आहे म्हणून. सत्याग्रहाची गोष्ट ऐकून कोणाला हि भय वाटण्याचें कारण नाहीं. ते म्हणतात, " मी माझा विचार स्पष्ट करण्याकरिता च सत्याग्रहाचा उद्योग करीत असतों आणि माझें असें हि मत आहे कीं, मी जें काम गेलीं दोन वर्षे करीत आहें तो एक प्रकारचा सत्याग्रह च आहे. सत्याग्रहाचा मीं अभ्यास केला आहे म्हणून सत्याग्रह म्हणजे काय हें मी थोडेंबहुत जाणतों. सत्याग्रहाचा अर्थ असा नाहीं कीं कोणती एखादी गोष्ट कोणाच्या विरुद्ध करायची. हा च काय तो सत्याग्रह असें नाहीं. म्हणून पायीं पायीं फिरून गावागावात लोकाना विचार समजावून देऊन जमीन गोळा करणें हें माझें जें कार्य चाललें आहे तो सर्व सत्याग्रह च आहे.

## (५६) उग्र सत्याग्रह

कित्येकाना वाटतें कीं, जमिनीचा प्रश्न सोडविण्याकरिता अहिंसक चळवळ करायची असेल तर स्वातंत्र्य मिळविण्याकरिता ज्या प्रकारचा सत्याग्रह करण्यात आला तसला सत्याग्रह जमीन मालकाच्या विरुद्ध करायला काय हरकत आहे ? अशी भिक्षा मागण्याच्या चळवळीनें क्रांति होणें शक्य नाहीं. त्याच्या या म्हणण्याला आमचें उत्तर असें कीं, स्वातंत्र्य आंदोलनात इंग्रज सरकारविरुद्ध जो सत्याग्रह करण्यात आला तो उग्र सत्याग्रह होता. परंतु पूर्वीं जें विवेचन केलें आहे त्यावरून हें स्पष्ट होईल कीं, बाह्य शक्तीचा मात्र उपयोग न करिता कोणाच्या विरुद्ध काहीं करावयें याला च मात्र सत्याग्रह म्हणायचें असें नाहीं. दुसऱ्या तऱ्हेचा सत्याग्रह करिता येईल. कोणत्या कामात कोणत्या परिस्थितींत कसल्या प्रकारचा सत्याग्रह करायला पाहिजे याचा विचार करणें जरूर आहे. स्वराज्य किंवा स्वातंत्र्य मिळविण्याकरिता इंग्रज सरकारच्या विरुद्ध सत्याग्रह करण्यात आला होता. म. गांधींच्या आधींपासून स्वराज्य म्हणजे स्वातंत्र्य हें च काँग्रेसचें ध्येय होतें. पारतंत्र्याची बेडी तोडून टाकून स्वातंत्र्य मिळविलें पाहिजे हा विचार लोकाना नवीन नव्हता. अर्थात् या बाबतींत विचारक्रांति करण्याची आवश्यकता नव्हती. प्रश्न एवढा च होता कीं, कोणता मार्ग अवलंबन केला तर स्वातंत्र्य तातडतोब मिळेल.

म्हणून या क्षेत्रात तसल्या प्रकारचा सत्याग्रह उपयोगी होतो हें सहज समजून येईल. परंतु भारतातल्या जमिनीचा प्रश्न सोडविण्याकरिता नवीन विचार समाजात जागृत करण्याची जरुरी आहे. व्यक्तिगत संपत्तीच्या समजुतीवर सध्याचा समाज उभारलेला आहे. याच्याविरुद्ध विचार जनमानसात प्रस्थापित करायचा आहे. जमीन देवाची. जमिनीवर सर्वांचा सारखा हक्क. एवढें च नाहीं, आमचें जें काहीं आहे, जगात जी संपत्ति आहे, ती सर्व परमेश्वराची. म्हणून सर्व च परमेश्वराला अर्थात् समाजाला अर्पण करून उरलेलें थोडें प्रसाद-रूप म्हणून सेवन करायचें. अशा प्रकारचा क्रांतिकारक विचार समाजात प्रस्थापित करायचा असल तर कोणत्या हि तऱ्हेचा उग्र सत्याग्रह अगदीं निरुपयोगी आहे. अर्थात् जर प्रथमपासून च जमीनमालकाच्या विरुद्ध अथवा श्रीमंताच्या विरुद्ध उग्र सत्याग्रहाचा अवलंब केला असता तर ती जबरदस्ती मात्र झाली असती. त्यामुळें विचार प्रचार झाला नसता आणि तो विचार प्रस्थापित झाला नसता. उलट समाजात एक विपरीत भावना उत्पन्न झाली असती. दुसरा कोणता हि लाभ झाला नसता. सध्या जो मार्ग अवलंबिलेला आहे तो एक प्रकारचा सत्याग्रह च आहे. सध्याचा मार्ग पूर्णपणें यशस्वी झाला नाहीं तरी हा क्रांतिकारक विचार समाजात सर्वत्र पसरला जात आहे यात संशय नाहीं. हा विचार जनमानसात दृढ झाल्यानंतर कार्याची पूर्तता करण्याकरिता दुसऱ्या तऱ्हेचा सत्याग्रह हि करिता येईल. तरी तो कोणत्या हि प्रकारचा उग्र सत्याग्रह असणार नाहीं.

## ( ५७ ) सौम्य, सौम्यतर आणि सौम्यतम सत्याग्रह

ही गोष्ट पूर्वी च सांगितलेली आहे कीं, भूदान-यज्ञात उग्र सत्याग्रहाला स्थान नाहीं. आणि आता जें केलें जात आहे म्हणजे पायीं पायीं फिरणें, गावोगावीं जाऊन विचार समजावून सांगणें आणि प्रेमपूर्वक भूमिदान मागणें, हा हि एक सत्याग्रह च आहे. तो सौम्य सत्याग्रह आहे. हा जर यशस्वी झाला नाहीं तर त्यानंतरच्या मार्गाचें स्वरूप कसें असेल? बिहारमध्यें पदयात्रा करीत असताना विनोबांनीं यासंबंधीं सांगितलें आहे कीं, ते सध्या जें करीत आहेत त्याच्यापुढें ते एक हि पाऊल टाकणार नाहींत असें नाहीं. अर्थात् यात अयशस्वी झाले तर एक वा त्याहून अधिक हि पावलें ते पुढें जाण्यास

यावणार नाहींत. तें पाऊल कोणत्या प्रकारचें असेल त्याचा इशारा देताना ते म्हणाले कीं, "आई जेव्हा पाहते कीं, आपला मुलगा वाईट मार्गानें जात आहे तेव्हा ती उपाशी राहते आणि मुलाला समजावून सांगते. अर्थात् मुलाला दुःख न देता ती आपण दुःख सहन करून मुलाला समजावून सांगत असते. हा सत्याग्रह च आहे. याला सौम्य सत्याग्रह म्हणावयाचें." आजपर्यंत त्यांनी स्पष्ट करून सांगितलेलें नव्हते कीं, पुढच्या सत्याग्रहांनीं पावलें अधिकाधिक सौम्य असणें जरूर आहे म्हणजे पुढचे सत्याग्रह सौम्य, सौम्यतर आणि सौम्यतम होतील. परंतु पुरी सर्वोदय संमेलनामध्यें त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, आमच्या सत्याग्रहाची मात्रा उत्तरोत्तर अधिकात अधिक सौम्य केली पाहिजे. ती सौम्याहून अधिक सौम्य, त्याहून जास्त सौम्य याप्रमाणें ती पुढें जात जाईल. याप्रमाणें समग्र सत्याग्रह शास्त्रावर च त्यांनी एक नवीन प्रकाश टाकला आहे. म्हणून सत्याग्रहाचा स्वभाव आणि स्वरूप कशा प्रकारचें असणें योग्य आहे ही गोष्ट आता पुष्कळ च स्पष्ट झाली आहे. हिंसेच्या शक्तीचा आधार उग्रतेवर असतो. हिंसेचा पहिला प्रयोग अयशस्वी झाला, तर त्यानंतरच्या प्रयोगात हिंसेची उग्रता वाढवावी लागते. तेव्हा च ती अधिक शक्तिशाली, अधिक बलवान् व कार्यक्षम होते. उलटपक्षीं अहिंसेची शक्ति आणि कार्यक्षमतेचा प्रवाह सौम्य होत जातो. सौम्यतर होण्यावर च तिची शक्ति आधारलेली असते. म्हणून अहिंसेचा पहिला प्रयोग अयशस्वी होईल तर त्याच्या पुढचा प्रयोग अधिक सौम्य करणें जरूर असतें आणि पहिल्या प्रयोगात कांहीं उग्रता असेल तर ती काढून टाकावी लागते. असें केल्यानें अहिंसेची शक्ति आणि कार्यक्षमता वाढत असते. होमिओपाथीच्या शास्त्रामधें औषधाच्या सूक्ष्मतेवर च औषधाची शक्ति अवलंबून असते. म्हणून पहिल्या मात्रेच्या प्रयोगाचा परिणाम चांगला दिसला नाहीं तर पुढच्या प्रयोगात औषधाची मात्रा अधिक सूक्ष्म करावी लागते. यामुळें औषधाच्या शक्तीबरोबर च तिची कार्यक्षमता हि वाढते. अहिंसेच्या प्रयोगाचें क्षेत्र हि यासारखें च आहे. म्हणून उग्र सत्याग्रह हा सत्याग्रहाचें पूर्ण आदर्श स्वरूप नाहीं. पुरी संमेलनात विनोबांनी सांगितलें आहे कीं, "आता सत्याग्रह शास्त्रासंबंधीं कांहीं गोष्टी मी आपल्यापुढें मांडतो. जे लोक अहिंसेविषयीं विचार करतात त्यांना

स्थूलपणे असे वाटतें कीं, त्याप्रमाणे लहान हिंसेवरून मोठी हिंसा, मोठ्या हिंसेवरून त्याहून मोठी हिंसा, याप्रमाणे मानवसमाजात चालत असते त्याप्रमाणे त्याना वाटतें कीं, प्रथम सौम्य सत्याग्रह केला पाहिजे. माझ्या या पदयात्रेला मी एक सत्याग्रह च मानतों. लोक म्हणतात, खरें आहे, हा सौम्य सत्याग्रह आहे. परंतु याच्या योगानें कार्य सिद्धीस गेलें नाहीं तर याहून तीव्र सत्याग्रह केला पाहिजे. त्यानें हि काम सफल झालें नाहीं तर तीव्रतर सत्याग्रहाची आवश्यकता लागेल. त्याप्रमाणें तीव्रतेत वाट करीत गेलें पाहिजे. परंतु खरोखर पाहता माझ्या मतें बरोबर याच्या उलट होणें जरूर आहे. मीं हा जो सौम्य सत्याग्रह सुरु केला आहे त्याने जर काम झालें नाहीं तर यापेक्षा सौम्यतर सत्याग्रह शोधून काढला पाहिजे. त्यामुळे त्याची शक्ति वाढेल. त्यानें हि काम झालें नाहीं तर सत्याग्रहाची शक्ति आणखी वाढविण्याकरिता सौम्यतम सत्याग्रह केला पाहिजे. आपण जाणता च कीं, होमिओपाथीमध्यें याप्रमाणे च असतें. औषध अतिशय थोड्या प्रमाणात घ्यायचें असतें. पुन्हा पुन्हा डायल्यूशन करीत करीत सूक्ष्माहून सूक्ष्मतर औषध झालें तर तें अधिक काम देतें. हिंसेच्या क्षेत्रात असें दिसतें की, सौम्य शस्त्रानें काम भागलें नाहीं तर तीव्र शस्त्र वापरल्यास आपली शक्ति वाढते आणि काम सफल होतें. हिंसेच्या या प्रक्रियेपेक्षा आमची अहिंसेची प्रक्रिया संपूर्णपणें वेगळी आहे. आमचा असा दृढविश्वास असला पाहिजे कीं, आम्ही आता जें करीत आहों त्यानें काम झालें नाहीं तर आमच्या सौम्यतेमध्यें काहीं न्यूनता राहिली आहे, आणि म्हणून आमची सौम्यता वाढविणें जरूर आहे. हें सत्याग्रहाचें स्वरूप स्वातंत्र्य मिळविण्याकरिता ज्या सत्याग्रहाचा अवलंब करण्यात आला त्यामध्यें इंग्रजावर दबाव पाडून त्याचें राज्य येथून घालविणें हें एक प्रकारचें नकारात्मक (negative) काम होतें. त्या वाळीं आणि त्या परिस्थितींत हिंदुस्थान नि:शस्त्र असल्यामुळें निराशेत बुडून गेलें होतें. कित्येक लोक अशा परिस्थितींत काय करावें हे न सुचल्यामुळें भ्रांत होऊन इकडे तिकडे काहीं लहानमोठे खून करीत होते. एक तर हिंसेचा मार्ग घ्यावा, नाहीं तर निराश होऊन स्वस्थ बसावें, अशी लोकांची साधारण मनोवृत्ति होती. अशा परिस्थितींत अहिंसेचा विचार पुढें आला. लोकांनीं

त्याना शक्य होतें त्या प्रमाणात तो ग्रहण केला. म्हणून सत्याग्रहाच्या त्या प्रक्रियेचा प्रयोग तेव्हा करण्यात आला तें च सत्याग्रहाचें पूर्ण स्वरूप असें समजणें योग्य होणार नाहीं. त्या विशिष्ट परिस्थितींत एक प्रकारची प्रक्रिया उत्पन्न झाली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आज जी परिस्थिति दिसून येत आहे आणि सर्व जगात जी शक्ति कार्य करीत आहे तिच्याकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहिले तर असें समजून येईल कीं, सत्याग्रहाची मात्रा आपल्याला उत्तरोत्तर अधिकाधिक सौम्य केली पाहिजे. सौम्याहून सौम्यतर, सौम्यतराहून सौम्यतम याप्रमाणें जर सत्याग्रह होत जाईल तर तो अधिक कार्यक्षम आणि शक्तिशाली होईल. तुलसी-रामायणात सुरसा राक्षसीची गोष्ट आहे. 'सुरसा नाम अहिनकी माता.' सुरसा राक्षसी हनुमानाच्या पुढें उभी राहिली. तिनें आपलें तोंड एक योजन मोठें केलें. तें पाहून हनुमान दोन योजन मोठा झाला. तेव्हा सुरसेनें आपलें तोंड त्याला गिळण्यासाठीं दोन योजन मोठें केलें. तेव्हा हनुमान चार योजन झाला. तेव्हा सुरसेनें आपलें तोंड आठ योजन पसरलें तेव्हा हनुमान सोळा योजन मोठा झाला, तेव्हा सुरसेनें आपलें तोंड बत्तीस योजन मोठें केलें हनुमानाला समजून चुकलें, याप्रमाणें हिच्या-बरोबर पट वाढवीत जाऊन चालणार नाहीं. मी बत्तीस पट झालों तर ती चौसष्ट पट होईल. मी चौसष्ट पट झालों तर ती त्याच्या दुप्पट होईल. असें वाढत जाण्यात कधीं हि अंत लागणार नाहीं. याप्रमाणें हैड्रोजन बाँब-पर्यंत पोंचायला होईल. यात काहीं अर्थ नाहीं. तेव्हा 'अति लघु रूप धरउ हनुमान' असा विचार करून हनुमानानें अतिशय लहान रूप धारण केलें आणि तिच्या तोंडात प्रवेश करून तिच्या नाकातून निघून जाऊन तिला चुकविलें. तेव्हा ती चडफड़त राहली. आपल्याला हें समजलें पाहिजे कीं, या ठिकाणीं विशाल सुरसा राक्षसी भयंकर रूप धारण करून ॲटम-हैड्रोजन बॉम्बच्या रूपानें आ पसरून उभी आहे. त्या ठिकाणीं आपल्याला अतिसूक्ष्म रूप धारण करून आत प्रवेश केला पाहिजे आणि तिच्या नाकातून बाहेर पडलें पाहिजे अशी प्रेरणा मला होत आहे."

## ( ५८ ) एकाग्रता आणि आत्मविश्वास

पूर्वी सांगितलें च आहे कीं, समग्र विचाराची स्पष्ट कल्पना देण्याकरिता विनोबांनीं सत्याग्रहाचा उल्लेख केला आहे, परंतु त्यांचा असा विश्वास आहे कीं, सत्याग्रह करण्याचें प्रयोजन राहणार नाहीं. सगळ्यांच्या मनात, विशेषतः कार्यकर्त्यांच्या मनात, असा विचार असला पाहिजे आणि ही श्रद्धा मनात सदा जागृत ठेवून कार्य करीत राहिलें पाहिजे. पुढें होणाऱ्या सत्याग्रहाची गोष्ट मनात ठेवली तर त्यांची एकाग्रता आणि आत्मविश्वास नष्ट होईल आणि आंदोलनाला बाधा पोंचेल. मूल आजारी असलें तर आईला वाटतें कीं, तें खचित जगणार आहे. हा विश्वास ठेवून च ती चालत असते. मुलाची अवस्था किती हि खराब होवो, तिचा विश्वास ढळत नाहीं. म्हणून च ती त्याची सेवाशुश्रूषा अखेरपर्यंत करू शकते. मुलगा वाईट मार्गाला लागला तर आईला वाटतें कीं, आपला मुलगा खचित एक ना एक दिवस सुधारेल आणि ही गोष्ट पुन्हा पुन्हा खोटी ठरली तरी तिचा विश्वास ढळत नाहीं. ती मुलाला नेहमीं समजावीत च राहते. म्हातारा बाप आजारी पडला आहे, मुलगा त्याची सेवाशुश्रूषा आणि औषधपाणी करीत आहे. तो जर असें म्हणू लागला, वडील आता म्हातारे झाले आहेत, जगतील असें दिसत नाहीं, तेव्हा ताटीची वगैरे व्यवस्था करून ठेवलेली बरी. तर त्याच्या हातून बापाला औषध देणें, त्याचें पथ्य करणें वगैरेंचा आग्रह कमी होऊन जाईल, नियमित वेळीं औषध देण्याची आठवण राहणार नाहीं आणि त्यामुळें बापाचा मृत्यु हि अगोदर च होईल. आमच्या कार्यक्षेत्राची हि ही च स्थिति आहे. विशेषतः अहिंसेवर विश्वास ठेवला च पाहिजे. नाहीं तर आमचें कार्य यशस्वी होण्याची आशा दुरावेल.

## ( ५९ ) संपत्तिदान-यज्ञ

भूदान-यज्ञाबरोबर च संपत्तिदान यज्ञ हि विनोबांनीं सुरू केला आहे. परंतु जमिनीचा प्रश्न हा मौलिक प्रश्न आहे. जमिनीचा प्रश्न सोडविण्याकरिता कांहीं केलें नाहीं तर संकट उभें आहे ही गोष्ट तेलंगणात त्यांच्या लक्षात आली. भूमि भगवंताची देणगी आहे आणि उत्पादनाचें

मौलिक साधन आहे. म्हणून गरीब लोकांचा प्रश्न सोडविण्याची खटपट करताना प्रथम जमिनीचा प्रश्न सोडविण्यापुरती च ती मर्यादित राखणें योग्य होतं परंतु दुसऱ्या पक्षीं त्यांना असे हि वाटत होतें कीं, संपत्तिदानाशिवाय भूदान यज्ञ सफल होणार नाहीं. भूदान यज्ञाचा संकल्प पूर्ण करणें ही एक गोष्ट होती आणि तो यशस्वी करणें ही दुसरी होती. त्यांना जमीन मिळेल ते जेव्हा सर्वोदयवृत्तीचें ग्रहण करतील आणि कार्यकर्ते होऊन जातील तेव्हा च भूदान यज्ञ सफल होईल. विनोबा म्हणतात, " परंतु मला वाटलें कीं, प्रथमपासून च दोन गोष्टी एकदम च उठवणें योग्य नाहीं आणि दोन्ही गोष्टी एकदम च सुरु करण्याचा इशारा हि मला मिळाला नाहीं. ईश्वराच्या इशाऱ्याशिवाय जर मी कोणतें काम हातीं घेईन तर तो अहंकार होईल. त्यामुळें कोणतें हि काम यशस्वी होणार नाहीं आणि माझ्या अंगात जी शक्ति आहे तिचा हि नाश होईल. त्या दिवसीं केवळ भूदानाचा च आदेश मला मिळाला होता." परंतु भूदान यज्ञाचें काम जसजसें पुढें सरकू लागलें तसतसें स्पष्ट समजून आलें कीं, जमिनीबरोबर संपत्तीचा अंश मागितला नाहीं तर चळवळींत अंतर्भूत असलेला उद्देश साधला जाणार नाहीं. जेव्हा त्यांनीं बिहारमध्ये पाऊल टाकलें तेव्हा संपत्तिदान यज्ञाची आवश्यकता विशेष रीतीनें दिसू लागली आणि त्या सम्राट् अशोकानें बुद्धाच्या विचाराला मूर्त रूप दिलें त्या अशोकाच्या पाटलीपुत्र नगरात १९५२ सालच्या २३ ऑक्टोबर रोजीं विनोबांनीं संपत्तिदान यज्ञाची घोषणा केली आणि उत्पन्नाचा सहावा भाग संपत्तिदान यज्ञात दान देण्याची लोकांना विनंति केली. आपण आपल्या परिश्रमाने धन संपादन केले असलें तरी तें केवळ आपल्या एकट्याकरिता नाहीं, तर सर्वांच्या उपयोगाकरिता च देवानें दिलें. आपली बुद्धि, शक्ति आणि पुरुषार्थ या योगानें जें धन आपण मिळवतों, ती परमेश्वराची देणगी आहे संपत्ति दान मागण्याच्या मागें ही भावना आहे

संपत्तिदान यज्ञातल्या 'संपत्ति' शब्दाचा अर्थ काय तो समजावून घेतला पाहिजे. संपत्ति दानाचा अर्थ धनदान, पैशाचें दान, मिळकतीचें दान, असा आहे संपत्ति दान यज्ञात मिळकतीचा सहावा भाग मागण्यात आला आहे. या यज्ञाच्या मार्फत पैशाचा संग्रह करण्याची कल्पना नाहीं. कोणाच्या

भावनेनें संपत्ति दान यज्ञात दान द्यावें आणि तो यज्ञ कोणत्या पद्धतीनें चालविणें योग्य आहे हें समजावून देताना विनोबा म्हणतात, "जो माणूस आपल्या रोजच्या जीवनात विचार समजावून घेऊन संपत्ति दान करील त्याच्याकडून च आम्ही संपत्ति-दान घेऊं इच्छितों. कोणीं हि उत्साहाच्या भरात संपत्ति-दान करावें ही गोष्ट बरोबर नाहीं. परंतु चिंतन करून, विचार करून, मग च संपत्ति-दान द्यावें. सध्या हें संपत्ति दान व्यक्तिगत क्षेत्रात मर्यादित राखण्याचें मीं ठरविलें आहे. संपत्ति दानाला जो नित्यधर्म आहे असें मानील त्याचें च दान स्थायी होईल. तो सहजधर्म झाला पाहिजे. तो भाररूप वाटता उपयोगी नाहीं. आपल्या शरिराचें वजन जर योग्य प्रमाणात असेल तर त्याचा बोजा वाटत नाहीं. त्या च प्रमाणें संपत्ति दान हि सहज होऊन गेलें पाहिजे. घरात ल्हान मूल जन्माला आलें तर त्याला खायला प्यायला लागतें, परंतु कोणाला त्याचा भार वाटत नाहीं. गृहस्थाश्रमाचें तें सर्वश्रेष्ठ अंग आहे असें च आपणाला वाटतें. मूल झाल्याबद्दल सर्वांना आनंद होतो. त्याप्रमाणें च संपत्ति दानात जो दान देईल त्याला आनंद वाटला पाहिजे. म्हणून च संपत्ति दान यज्ञ व्यक्तिगतपणें च चालविण्यात येत आहे. पुढील वर्षीं त्याविषयीं अधिक विचार करण्यात येईल. जे देतील त्यांनीं जन्मभर संपत्ति दान द्यायचें आहे. एकदा दिल्यावर तें सतत द्यायचें आहे या विचाराचें मर्म पुष्कळ लोकाना समजलेले नाहीं. पण त्यांनीं एक गोष्ट लक्षात घ्यावी कीं, एकदा लग्न केलें कीं त्या बंधनात कायमचें राहावें लागतें." संपत्ति दान यज्ञ प्रथमपासून का सुरु करण्यात आला नाहीं आणि अजून हि त्यावर का जोर देण्यात येत नाहीं याबद्दल विनोबानीं एके ठिकाणीं लिहिलें आहे कीं, "गंगेपेक्षा यमुना ल्हान आहे, परंतु यमुना गंगेला मिळाली आहे. त्याप्रमाणें च संपत्ति दान हें यमुना नदीसारखें आहे. जमीन ज्याप्रमाणें उत्पादनाचें अनिवार्य साधन आहे त्याप्रमाणें पैसा हें अनिवार्य साधन नाहीं. पैसा मोह उत्पन्न करणारा आहे पैशाला खरें मूल्य हि नाहीं तो तर नाशिकच्या छापखान्यात बनतो. पण कोणी छापखाना जमीन तयार करून देऊं शकत नाहीं म्हणून जमिनीची पैशा बरोबर तुलना च होऊं शकत नाहीं. श्रीमंताच्या जवळ असलेल्या पैशाचें आम्ही मूल्य च नाहीसें करून टाकूं शकतो. म्हणून जमिनीशीं तुलना करता

धनदौलत, पैसाअडका अगदीं गौण आहे. जमीन हा पाया आहे असा विचार करून च मीं जमिनीचा प्रश्न प्रथम हातीं घेतला आणि या कारणा करिता च संपत्ति दान यज्ञावर मी जास्त जोर देत नाहीं संपत्ति ही गवता-सारखी आहे. तें उगवतें हि लौकर आणि वाळून हि लौकर जातें"

विनोबा पैसा घेत नाहींत आणि आता पैसा मागत आहेत या दोन्हींचा मेळ कसा घालायचा? विनोबा दात्याजवळून पैसा आपल्याकडे मागून घेत नाहींत तो दात्याजवळ च राहील आणि विनोबांच्या निर्देशा-प्रमाणें तो त्याचा विनियोग करील आणि विनोबांना हिशोब पाठवील. यासंबंधीं विनोबा म्हणतात, "मी पैसा माझ्या हातात घेणार नाहीं. तो सांभाळायची जबाबदारी मी घेणार नाहीं. तो खर्च करायची आणि त्याचा हिशोब ठेवण्याची हि जबाबदारी मी घेणार नाहीं. या सर्वांपासून मी मुक्त राहीन. सामाजिक कार्याकरिता जो पसा जमविला जातो त्याची व्यवस्था करण्याकरिता काहीं तरी ट्रस्ट बनवावा लागतो तसला ट्रस्ट निर्माण करण्याची मी कल्पना करीत नाहीं. वेगवेगळ्या कारणाकरिता गोळा केलेले फंड आणि संपत्ति दान यज्ञ यामध्यें फार मोठा फरक आहे तो हा कीं, उत्पन्नाचा काहीं अंश या यज्ञात आहुतिरूपानें द्यायचा आहे, म्हणून मीं ठरविलें आहे कीं, तो पैसा दात्याजवळ च राहील दाता माझ्या सांगण्या-प्रमाणें खर्च करील आणि त्याचा हिशेब दरवर्षी आमच्याकडे पाठवील. याचा अर्थ असा कीं, दात्यानें एकदा देऊन टाकलें म्हणजे तो सुटला असें नाहीं परंतु खर्च करण्यात हि त्यानें आपली बुद्धि खर्च केली पाहिजे. हें खरें आहे कीं, आमच्या मनाप्रमाणें दात्यानें दिलेला पैसा खर्च केला पाहिजे, परंतु त्यासंबंधीं त्यानें आपले मत हि काय आहे ते आम्हाला कळविलें पाहिजे"

ह्या कामात दात्यावर च विश्वास टाकून सर्व जबाबदारी त्याच्यावर टाकण्यात आली आहे. या व्यवस्थेत लोक काहीं दोष काढू शकतील, पण विनोबा म्हणतात, "विश्वास च धर्मप्रेरणेचा आधार आहे. मनुष्यावर विश्वास टाकून त्याच्याविषयीं जितकें निश्चित राहता येईल तितकें कायद्याच्या बंधनानें राहणें शक्य नाहीं या दृष्टीनें च संपत्ति दानाची ही रीत मीं ठरवून टाकली आहे."

या प्रसगीं म. गांधींच्या 'ट्रस्टीशिप थिअरी'ची गोष्ट मनात येते. म. गांधी श्रीमताना उद्देशून म्हणत असत कीं, 'हे धनिक लोक हो, तुमच्या हातात जी धनसपत्ति साठली आहे तिचे तुम्ही मालक नाहीं, ती सर्वांची आहे, ती गरिबाची आहे. गरिबाचा पैसा परमेश्वरानें तुमच्या-जवळ ठेव म्हणून ठेवायला दिला आहे. तुम्ही गरिबाचे विश्वस्त आहा, म्हणून तुम्ही तुमचा सपत्ति गरिबाच्या हितारिता च खर्च केली पाहिजे." म. गांधींचा असा विश्वास होता कीं, श्रीमंताना देव एक दिवस चागली बुद्धि देईल आणि ते आपली सपत्ति गरिबाच्या कल्याणाकरिता खर्च करतील. ही म. गांधींची 'ट्रस्टीशिप थिअरी' म्हणून प्रसिद्ध आहे. तिच्या-मध्यें च भूदान यज्ञ आणि सपत्ति दान-यज्ञ यानें बीज आहे सपत्ति दान आणि भूदान-यज्ञ याच्या द्वारें गांधीजींच्या 'ट्रस्टीशिप थिअरी'चा प्रयोग करण्यात येत आहे ट्रस्टीला कोणत्या हि प्रकारची नुक्सानभरपाई देण्याचा प्रश्न असत नाहीं. जो ट्रस्टी आहे त्यानें ट्रस्ट सपत्ति दर याद्दन द्यावयाची आहे. त्यानें आपल्याजवळ ठेवून चालायचें नाहीं. ट्रस्टी हि आमचा भाऊ च आहे; तेव्हा त्याच्या निर्वाहाकारता त्याला हि काहीं मिळालें पाहिजे म्हणून भूदान-यज्ञात किंवा सपत्ति दान यज्ञात पूर्ण जमीन किंवा सर्व सपत्ति मागितली जात नाहीं. दरिद्रनारायणाचा भाग च मागितला जातो. तेव्हा लोक ट्रस्टीशिप थिअरीचा उपहास करीत. आज तिची सफलता प्रत्यक्ष दिसत आहे. ट्रस्टीशिप शब्द वापरणें विनोबाना पसत नाहीं तरी ट्रस्टी-शिपमधला भाव सपत्ति दान यज्ञात अतर्भूत आहे. याचें विश्लेषण करताना विनोबा म्हणतात, "भूमिदानाप्रमाणें एकदा देऊन टाकणें ही गोष्ट सपत्ति-दानात नाहीं. यात दरवर्षी मिळकतीचा काहीं भाग द्यायचा आहे. म्हणून ती एक जीवनाची निष्ठा असें समजायचें आहे. त्यामुळें अत करणातल्या निष्ठेचा विकास झाला पाहिजे. जेव्हा भरत रामाला भेटायला निघाला होता तेव्हा त्याच्या अत.करणात हा च भाव होता कीं मी केव्हा रामाला भेटेन, पण तो थोडा वेळ थांबला. त्यानें मत्र्याना बोलाविलें आणि म्हणाला, 'मी रामाला भेटायला जात आहें. म्हणून तोंपर्यंत तुम्ही राज्य नीटपणें चालवा.' तुलसीदासानें लिहिलें आहे कीं, भरत अत्यत उदार असून हि त्यानें हें केलें. कारण सपत्ति रामाची. ज्याप्रमाणें गांधी म्हणत, आपण

आपल्या संपत्तीचे ट्रस्टी व्हावें हें उचित आहे. त्याप्रमाणें ती नीटपणें सांभाळणें हे भरताचें कर्तव्य होतें. पण ट्रस्टी हा अलीकडचा शब्द आहे आणि त्याचा पुष्कळ दुरुपयोग हि झालेला आहे. म्हणून मी ट्रस्टी शब्द वापरीत नाहीं. गांधीजी कायदेपंडित होते म्हणून ते तो शब्द वापरीत असत त्यांना त्या शब्दाचें आकर्षण होतें. मला तसें नाहीं. मी हा विचार उपनिषदाच्या भाषेंत प्रगट करू इच्छितों. 'तेन त्यक्तेन भुंजीथाः' जें भोगायचें आहे हे त्याग करून च भोगावें.' तुळशीदास म्हणतात कीं, 'सब संपत्ति रघुपति के आही'. म्हणून हें देणें ही गौण गोष्ट आहे. आपली सर्व संपत्ति च समाजाला द्यायची आहे. आपल्या शरीराला अवश्य असणारी तेवढी च मात्र आपण घ्यायची आहे. परंतु सध्या समाजात अशी व्यवस्था नाहीं. आणि तशी व्यवस्था लौकर होणें हि शक्य नाहीं. म्हणून हें दिलें पाहिजे आणि जी उरेल त्यापैकीं काहीं देण्याचा विचार केला पाहिजे. षष्ठांश दान देण्याचा उद्देश असा कीं, सर्व जीवनभर तसा निश्चय करून तें दान देत राहिलें पाहिजे. एवढा भाग आपण दिला नाहीं तर आपण पापी आहों असें होईल आणि आपलें जीवन हि पापमय होईल. म्हणून संपत्ति-दान हें आपलें एक कर्तव्य आहे असें समजलें पाहिजे."

जे संपत्तिदान देऊं इच्छितात त्यांनीं आपल्या कुटुंबातल्या सर्वांचा विचार घेऊन त्याविषयीं सर्वजणांना संतोष आहे अशी खात्री असेल तर प्रेमपूर्ण अंतःकरणानें द्यावें. यासंबधीं विनोबा म्हणतात, "आता या ठिकाणीं जे सर्व भाई बसले आहेत, त्यांच्या अंत:करणात जर धर्मभाव असेल तर त्यांनीं घरातल्या सर्वांचा– आई, पत्नी आणि मुलें यांचा हि– विचार घेऊन मग संपत्ति-दान द्यावें. या कामात त्यांच्या कुटुंबातल्या सगळ्यांना अत्यंत आनंद वाटला पाहिजे. एखादा गोड आंबा खाल्ल्यानंतर आपल्याला जसा तो गोड लागतो तसें त्याला वाटलें पाहिजे. संपत्तीचा एक-षष्ठांश देण्यात त्यांना खूप आनंद झाला पाहिजे. त्यांचें हृदय नाचू लागलें पाहिजे. कोणत्या हि प्रकारें दडपण पाडून लज्जेनें, भीतीनें देणें उचित नाहीं. कारण सर्व जीवनभर एक पंचमांश किंवा एक षष्ठांश देत रहावयाचें आहे."

भूदान-यज्ञात जमीन घ्यायची आणि ती जमीन भूमिहीनाला द्यायची आहे भूमि ही काहीं भोग्य वस्तु नाहीं. ती उत्पादनाचें मौलिक साधन

आहे. तीमधें अंग मोडून श्रम करावेत तेव्हां च उपभोगाची वस्तु उत्पन्न होते आणि दानांत मिळालेली भूमि भूमिहीनाला द्यायची ती कधी तरी देऊन टाकायची असें नाही. ज्या भूमिहीन गरिबाला शेती करायला येते, जो शेती करून आपली उपजीविका करूं इच्छितो, आणि ज्याला उपजीविकेचें दुसरें साधन नाहीं त्याला च जमीन दिली जाते. भूदान यज्ञांत त्याला कांहीं पैशाची मदत पाहिजे असेल तर त्याला रोख पैसा दिला जात नाहीं; त्याला शेतीचीं अवजारें घेऊन दिलीं जातात. अर्थात् भूदानात भूदान-यज्ञाचा मूलगत उद्देश उत्पादनाचें साधन उत्पादकाला मिळवून देणें, पैशाची प्रतिष्ठा नाहींशी करणें आणि उत्पादक श्रमाला प्रतिष्ठा मिळवून देणें हा आहे. परतु संपत्ति-दान-यज्ञात अशा तऱ्हेचा क्रांतिकारक उद्देश आहे असें म्हणता येत नाहीं. संपत्ति दान यज्ञात पैशाचें दान घेतलें जातें—जरी तो पैसा दात्याच्या-जवळ च राहतो. पैसा हे उत्पादनाचें साधन नाहीं. तो उपभोग्य वस्तु विकत घेण्याचें माध्यम आहे. शिवाय एखादा मोठा कारखान्याचा मालक, ज्यानें मजुरांचें शोषण करून पैसा मिळविला असेल तो, आपलें एकषष्ठांश उत्पन्न संपत्ति दानात देईल; परतु तो करीत असलेलें मजुरांचें शोषण आणि त्याचा तो कारखाना तसा च चालू राहील अशा तऱ्हेचें दान घेणें हें सध्यांची आर्थिक व्यवस्था आहे तशी च राखण्याला अप्रत्यक्ष रीत्या संमति दिल्यासारखें होईल. एखादी नर्तकी, एखादी वेश्या, एखादा दारूचा दुकानदार आपल्या उत्पन्नाचा एकषष्ठांश दान देईल; पण तो पैसे मिळविण्याचा मार्ग सोडील असें नाहीं. त्यामुळें आपण त्याच्या पैसे मिळविण्याच्या मार्गाला अप्रत्यक्षपणें संमति दिली असें होईल. अशा परिस्थितींत विनोबाच्या या नवीन आंदोलनाचा अर्थ काय? सर्वोदय मासिकाचे संपादक श्री. दादा धर्माधिकारी यानीं संपत्ति-दान यज्ञासबधींच्या आपल्या एका निबंधात हा प्रश्न उपस्थित केला आहे आणि त्याचें उत्तर हि चांगल्या प्रकारें दिलें आहे. दानांत मिळा-लेल्या पैशाचा विनियोग विनोबाच्या निर्देशाप्रमाणें दात्यानें करायचा आहे. यामध्यें च संपत्ति-दान यज्ञाचा क्रांतिकारकपणा भरलेला आहे. कारखान्याचा मालक जर दाता असेल तर विनोबा त्याला असा आदेश देतील कीं, त्यानें त्या पैशानून कारखान्यातील मजुराच्या अधिकाधिक स्वास्थ्याची आणि सांस्कृतिक उन्नतीची व्यवस्था करावी आणि त्याबरोबर त्याला असा हि उपदेश

दिला जाईल की, त्याने कारखाना अशा तऱ्हेनें चालवावा कीं तो कारखाना मालक विनोबाच्या हातीं सोपवून देऊ शकेल. एखादा दाता सावकार असेल तर त्याला असं सांगितलें जाईल कीं, त्यानें शेतीचीं अवजारें किंवा दुसरा काहीं उत्पादनाचा सरंजाम त्या पैशातून विकत घेऊन उत्पादकाला द्यावा. त्याबरोबर च विनोबा दात्याला असें हि सांगतील कीं, 'आपला पैसे मिळविण्याचा मार्ग पापमय आहे तो तुम्ही हळूहळू बंद करण्याचा प्रयत्न करा.' याप्रमाणें अनुत्पादक दात्याला उत्पादनाला साहाय्यक होण्याच्या खटपटींत त्याचा अनुत्पादक व्यवसाय बंद करण्याची प्रेरणा विनोबा देतील. याप्रमाणें जेव्हा दानात मिळालेला पैसा खर्च करण्याचा आदेश देऊ लागतील तेव्हा त्याच्यातून च नवीन चळवळीचा उद्देश स्पष्ट होऊ लागेल.

अपरिग्रह आणि अस्तेय याचें अनुसरण केल्याशिवाय आर्थिक क्षेत्रात अहिंसक क्रांति अर्थात् आर्थिक साम्य स्थापन होण्याचा संभव नाहीं. म्हणून संपत्ति दान यज्ञाचा मूळ विचार अपरिग्रह आणि अस्तेय या भावनांवर आधारलेला आहे. त्याचें विवेचन करताना विनोबा म्हणतात, "अस्तेय आणि अपरिग्रह दोन्ही मिळून एक झाले तर अर्थ शुचित्व पूर्ण होईल. त्याशिवाय व्यक्ति आणि समाजाच्या जीवनात धर्माची स्थापना होणें शक्य नाहीं सत्य आणि अहिंसा हीं तर मूळ च आहेत. परंतु आर्थिक क्षेत्रात हि ह्या दोहींचा आविर्भाव अस्तेय आणि अपरिग्रह याच्यातून च होऊ शकतो, आर्थिक क्षेत्र जीवनाचा एक फार मोठा भाग आहे. म्हणून धर्मशास्त्राला त्याची उपेक्षा करून चालणार नाहीं. म्हणून त्याचें नियमन आणि नियोजन करण्याची जबाबदारी धर्मविचारावर येऊन पडते म्हणून मनूनें स्पष्टपणें सांगितलें आहे . 'य अर्थशुचि स शुचिः।' अर्थात् ज्याच्या जीवनात आर्थिक शुचित्व साधलें त्याचें जीवन शुद्ध झालें.

'अस्तेय पैसा मिळविण्याच्या पद्धतीचें नियमन करीत असतें आणि अपरिग्रह त्याच्या प्रमाणाचें नियमन करितो. अस्तेय म्हणजे मुख्यत शरीरश्रमाच्या द्वारा च म्हणजे उत्पादक श्रम करून च शरीराचा निर्वाह झाला पाहिजे. शरीर-श्रम न करिता जर आम्हीं अन्न ग्रहण केलें तर आम्ही एक संकट उत्पन्न करीत असतों. शरीरश्रम करण्याची इच्छा

असून हि जर एखादी व्यक्ति असली कि परिश्रम करू शकत नसेल तर त्यानें दुसऱ्या ठिकाणीं ज्यास्त कठोर परिश्रम केले पाहिजेत, तर च तें संकट दूर होईल. हे परिश्रम इतके कठीण असतील, अर्थात् त्यात इतकी तपस्या भरलेली असेल कीं तिच्या तुलनेनें शरीर श्रम कमी कष्टाचे दिसावे. अर्थात् सामान्य लोकांना अस्तेय पालन करणें तेव्हा च शक्य होईल जेव्हा त्याला म्हणून भूक लागते त्यानें शरीरश्रम केले च पाहिजेत. जगामध्यें हल्लींच्या काळात अतिशय विषमता, अतिशय दुःख, कष्ट, अतिशय पाप, वाढलें आहे याचें कारण शरीर श्रम न करण्याची इच्छा हें च आहे. शरीरश्रमातून सुटका करण्याची ज्याची इच्छा असते तो माणूस गुप्त अथवा उघडपणें चोरी च करीत असतो.

"शरीरश्रम करून च जे उत्पादन होईल तेवढ्याचें च मात्र सेवन करू हा नियम जर आपण मानून चाललों तर त्यामुळें अपरिग्रह पुष्कळ प्रमाणात सिद्ध होईल. कारण शरीरश्रमानें इतकें खूप उत्पन्न होणार नाहीं कीं ज्यामुळें मनुष्य खूप संग्रह करू शकेल. परंतु अस्तेयापासून वेगळेपणानें अपरिग्रहाचें हि नियमन करण्याची आवश्यकता असते. कारण जरी हि शरीरश्रमानें उत्पादन फार होऊ शकणार नाहीं तरी आवश्यकतेपेक्षा थोडें तरी अधिक होणें संभवनीय आहे, आणि जर या जास्त उत्पादनाचा उपयोग अपरिग्रहाच्या तत्त्वाप्रमाणें केला नाहीं तर संकट पूर्णपणें दूर होणार नाहीं. लहानपणापासून आपण अनेक लोकांचे उपकार घेतलेले असतात. या उपकाराचें ऋण फेडण्याकरिता शरीरश्रमाच्या मार्गानें आपण जें काहीं मिळवलें असेल त्यातला काहीं भाग समाजाला परत करणें जरूर आहे. यामध्यें सम्यक् म्हणजे योग्य विभाजनाचा, म्हणजे च समान वाटणीचा, उद्देश अतर्भूत आहे. म्हणून जरी हि ती एक प्रकारची ऋणमुक्ति आहे तरी हि त्यात दानाचें स्वरूप राहिलें आहे."

संपत्तिदान यज्ञात उत्पन्नाचा किंवा खर्चाचा एक षष्ठांश भाग मागितला जातो, तरी पण जो पाच षष्ठांश उरतो त्याला तरी मान्यता आहे कीं नाहीं? त्याच्या उत्तरात विनोबा म्हणतात, "त्याला मान्यता देण्याचा प्रश्न च उत्पन्न होत नाहीं. दाता तर सहा षष्ठांश च आपल्या मालकीचा आहे असें मानीत होता. या मानण्याला एक षष्ठांश मागून आम्ही धक्का देत आहों. विचार

समजावून घेण्याकरिता त्याला प्रेरणा देत आहे. भक्त म्हणतो, ज्याने एकदा हरिनाम घेतलें त्यानें मोक्षाच्या वाटेवर पाऊल टाकलें ज्यानें ज्यानें एक-षष्ठांश भाग समाजाला आजन्म अर्पण करण्याचा नियम जीवननिष्ठा म्हणून मान्य केला त्याने आपली सर्व संपत्ति, आपलें सर्व जीवन एवढें च काय आपल्या शरीरनिर्वाहापर्यंत सर्व च काहीं समाजाला अर्पण करण्याच्या मार्गावर पाऊल टाकलें असं होईल. एक एक आसक्तीचा त्याग करून च मोक्षाच्या मार्गावर माणूस जात असतो. म्हणून भोग आणि मोक्ष याच्या-मध्ये त्याना जोडणारा धर्म हा सेतुसारखा आहे. धर्मनीतीचा हा विचार मनात ठसला म्हणजे एक-षष्ठांश मागण्यात काय अर्थ भरलेला आहे हें समजून येईल." याचें विवरण करताना विनोबा म्हणतात, "शरीर आणि आत्मा यामध्यें अथवा व्यवहार आणि तत्त्वविचार यामध्यें किंवा वर्तमान स्थितींत आणि जी स्थिति आपल्याला प्राप्त करून घ्यायची आहे तिच्यामध्ये धर्म हा पुलासारखें काम करीत असतो. पूल नदीच्या एका तीरावर उभा असत नाहीं तर नदीच्या दोन्ही किनाऱ्यावर तो उभा असतो. भोग या तीरावर आहे, मोक्ष पलीकडच्या तीरावर आहे. आणि धर्म दोन्ही किनाऱ्यांवर आहे. समाजाच्या सध्याच्या स्थितींत त्याचें तोंड आदर्श स्थिती-कडे वळविण्याकरिता जो विचार त्याच्यापुढें टेवावयाचा तो धर्मविचार असेल. हा विचार परिशुद्ध तत्त्वज्ञानाचें रूप घेणार नाहीं. शुद्ध तत्त्वज्ञानाकडे पोचवून देण्याकरिता तो वाहनासारखा होईल. रस्ता आणि घर यामध्यें जो फरक आहे आणि संबंध आहे तसा च संबंध धर्म आणि मोक्ष याच्यात आहे."

जो संपत्तिदान यज्ञात दान देईल त्याने सारा जन्मभर तें द्यावयाचें आहे. सर्व आयुष्यभर एक षष्ठांश वा एक अष्टमांश किंवा त्यापेक्षा हि कमी असला तरी, असें देण्याचा संकल्प करणें अनेकाना कठीण वाटत असतें. विनोबा त्याना सागतात, परंतु एकदा विवाह केला कीं सर्व आयुष्यभर त्यानें आपल्याला बंधनात टाकून घेतले आहे असे मात्र त्याना वाटत नाहीं. यासंबंधीं त्यानीं पुढें आणखी हि जें सांगितलें आहे तें अत्यंत प्रेरणा देणारें आहे. ते म्हणतात, "लोक मला विचारतात, 'आजन्म दान देणें शक्य आहे का?' मी उलट विचारतों, आजन्म जेवण करीत राहणें शक्य कसें

आहे ? तुम्ही तर जन्मापासून मरणापर्यंत भोजन करीत रहावयाचें कठीण व्रत घेऊन ठेवले आहे. त्यामुळे आजन्म व्रत घेणें ही सहज गोष्ट आहे. वेद म्हणतो, मरण येईपर्यंत प्रतिज्ञापूर्वक श्वास घ्यावा च लागतो. श्वासोच्छ्वासाचें व्रत हें कठीण व्रत आहे. हें व्रत घेण्याची गोष्ट वेदान अशा उद्देशानं सांगितली आहे की, श्वासोच्छ्वासाबरोबर च रामनाम घेतलं पाहिजे. त्याप्रमाणें कोणता ही श्वास वाया जाऊं नये म्हणून रामकार्याकरिता प्रत्येक क्षण राखून ठेवला पाहिजे. या प्रतिज्ञेचा हा च अर्थ आहे. आमच्या डोळ्यांनी आजन्म पाहण्याच व्रत घेतलें आहे. आमच्या पायांनी आजन्म चालण्याच व्रत घेतलं आहे. हें व्रत त्यांना कठीण आहे असें वाटत नाहीं, कारण तें नैसर्गिक आणि स्वाभाविक होऊन गेलें आहे. त्याप्रमाणें च त्यागाचें व्रत हि नैसर्गिक आणि स्वाभाविक आहे. घरोघरीं आई हें व्रत पालन करीत असते. आई आपल्या मुलांवर कितीही प्रेम करीत असते, परंतु तिचा हा प्रेमभाव घराच्या मर्यादेत च राखून न ठेवता त्याचा प्रसार व्हावा असें मी इच्छितो. आम्ही म्हणतों, आई, तू धर्माची मूर्ति आहेस, तू त्यागाची मूर्ति आहेस, तू इतका त्याग करीत आहेस, तेव्हा आणखी थोडा त्याग कर. ज्याला त्यायला काहीं नाहीं त्याच्याकरिता आणखी थोडा त्याग कर. त्यागाचें व्रत कठीण नाहीं. त्यागामुळें च भोगाला अधिक रुचि येते."

संपत्ति दान कोणी करावें ? अत्यंत श्रीमान् व्यक्तींनी दान करावें. अत्यंत गरीब व्यक्तींनी हि दान द्यावें. हा त्यागधर्म पालन करण्याची संधि हि सगळ्यांना आहे. मुलामुलींनी हि या यज्ञात भाग घेऊन लहानपणापासून त्यागधर्माची दीक्षा घेणें शक्य आहे.

संपत्ति दान यज्ञामध्यें एक गंभीर जीवनविचार अंतर्भूत आहे. हा गृहस्थाश्रमाचा सर्वश्रेष्ठ धर्म म्हणून गणिला येईल. जो संपत्ति दान देईल त्याच्या आणि त्याच्या कुटुंबातल्या सर्वांच्या अंतःकरणात आनंदाचा संचार झाला पाहिजे म्हणून प्रथमतः संपत्ति दान यज्ञाला व्यक्तिगत क्षेत्राचा निर्बंध राखण्यात आला आहे. यामुळे त्या व्यक्तीच्या जीवनात तो विचार प्रवेश करून हळूहळू वाढत जावा म्हणून संपत्ति दान यज्ञाला प्रथमतः सार्वजनिक चळवळीचें रूप देण्यात आलेलें नाहीं. बिहारमध्यें भूदान यज्ञाची चळवळ जेव्हा पुष्कळ प्रगत झाली तेव्हा १९५३ सालीं विनोबांनी संपत्ति दान यज्ञाला सार्वजनिक रूप

दिलें आणि सर्व लोकाना संपत्ति दान-यज्ञात भाग घेण्याचे आवाहन केलें. त्याप्रमाणें बुद्धगया संमेलनापासून देशामध्यें सर्वत्र संपत्ति-दान-यज्ञाचा व्यापकपणें प्रसार करण्याची चळवळ चालू झाली आहे.

संपत्ति दान-यज्ञाकरिता सामान्य लोकाना विनंति करीत असताना विनोबानीं लिहिलें आहे, "मला विश्वास आहे, जर भक्तजन श्रद्धा आणि शुभेच्छा घेऊन या यज्ञात आहुति देतील तर या कल्पनेमध्ये जो नवीन जीवन-विचार आहे तो व्यक्त होऊ लागेल आणि त्याचें प्रतिबिंब देशात सर्व ठिकाणीं दिसू लागेल, आणि साम्ययोगाकडे समाज सहज च जाऊ लागेल. या उद्देशानें सज्जन व्यक्तींनीं विचार करावा म्हणून हा विचार मी त्याच्यापुढें माडला आहे "

त्याच्याकडून भूमिदान आणि संपत्ति दान मागायचे त्याना उद्देशून विनोबानीं ऋग्वेदातला एक मंत्र उद्धृत केला आहे.

'अदित्सन्त चित् आघृणे
पूषन् दानाय चोदय
पणेश चित् वि मृदा मनः'

'आतून मानसिक ताप, बाहेरून परिस्थितीचा ताप या दोन्हींच्या तापानें शुद्धीचें दान करणाऱ्या हे देवा, जे आज दान देऊ इच्छीत नाहींत त्याच्या मनात दान देण्याची प्रेरणा दे. कृपणाचें मन हि मृदु कर.'

## ( ६० ) श्रम-दान-यज्ञ

संपत्ति दान यज्ञानंतर विनोबानीं श्रमदान-यज्ञ सुरु केला आहे. संपत्ति-दान यज्ञाप्रमाणें श्रमदान यज्ञात हि गंभीर अर्थ अंतर्भूत आहे. ज्याच्याजवळ जमीन नाहीं, पैसा नाहीं, त्याच्याजवळ देण्यासारखें काहीं च नाहीं काय ? ज्याच्याजवळ कसली च संपत्ति नाहीं इतका दरिद्री कंगाल कोणी आहे ? या प्रश्नाना उत्तर देताना विनोबा म्हणतात, 'जमीन मालक आणि श्रीमान् लोक यांच्या दान देण्याच्या शक्तीला मर्यादा आहे. परंतु ज्याच्याजवळ जमीन किंवा पैसा नाहीं पण शारीरिक शक्ति आणि सामर्थ्य आहे त्याच्या दानाच्या शक्तीला सीमा नाहीं. जमीन किंवा पैसा एकदा सगळा देऊन टाकता येईल. त्यानंतर देण्यासारखें त्याच्याजवळ काहीं शिल्लक राहणार

नाहीं परंतु त्याच्याजवळ परमेश्वराने दिलेलें निरोगी आणि बळकट शरीर आहे त्याची दानशक्ति कधीं हि संपणारी नाहीं सर्व जीवनभर तो प्रति दिवशीं दान देऊं शकेल ' विनोबा म्हणतात, "त्याच्यासारखें दान कोण देऊं शकेल ? भूदान यज्ञात जमीन मिळून गेली परंतु त्या जमिनीवर श्रम केले नाहींत तर तिच्यात पीक निघायचें नाहीं. गावातले चारित्र्यवान् मान्यस्थ लोक सब मिळून मिरवणुकीनें शेतावर जाऊन माती खाद् लागतील, एवढें च नाहीं तर ज्याना जमीन दिली गेली आहे तो माणूस जर काहीं कारणानें आपल्या जमिनीची मशागत करू शकत नसल तर गावातल्या चारित्र्यवान् आणि सेवापरायण आणि गावात वसत असलेल्या व्यक्तींनीं मिळून त्या जमिनींत मेहनत करण्यात मदत केली तर त्या योगानें सर्व गावात एक अशी दशा निर्माण होईल कीं, गावातल्या प्रत्येक व्यक्तीला श्रमदानाचे कामात भाग घेण्यामध्यें प्रतिष्ठा वाटू लागेल लोकाना समजून येईल कीं, भूमि दान यज्ञ म्हणजे एकाची जमीन घेऊन दुसऱ्याला देणें रामाची जमीन काढून घेऊन श्यामाला देणें एवढें च नाहीं. कारण कीं, जी जमीन दिली गेलेली असते तिच्यासंबधीं गावातले लोक चिंतन आणि मनन करीत राहतील. अशा प्रकारें शरीरश्रमाला असलेली प्रतिष्ठा जी आज नाहींशी झाली आहे ती पुन्हा स्थापित करण्याचा मार्ग सुगम होईल." म्हणून विनोबा स्वत दुर्बल आणि आजारी असून दहा बारा मैल पद-यात्रा करून आल्यावर हि त्याचे श्रम विसरून जाऊन आपल्याबरोबरच्या लोकांच्या समवेत एक तास कुदळ चालवीत आणि अशा प्रकारें श्रमदान-यज्ञ करून श्रमाला प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याचें शिक्षण देत आहेत

## ( ६१ ) प्रेम आणि बुद्धिदान यज्ञ

मनुष्याला पाच इंद्रियें आहेत त्याप्रमाणें त्याच्याजवळ पाच प्रकारची संपत्ति आहे जशी हृदय, मस्तक, देह, स्थावर संपत्ति आणि जंगम संपत्ति ति प्रेम, बुद्धि आणि विचक्षणता, शारीरिक श्रम, जमीन आणि पैसा एका च व्यक्तीजवळ या सगळ्या प्रकारची संपत्ति असेल च अस नाहीं, परंतु अशी एक हि व्यक्ति असणार नाहीं कीं, तिच्याजवळ वरीलपैकीं एक हि प्रकारची संपत्ति नाहीं पूर्ण दरिद्री आणि कसल्या हि प्रकारची शक्ति

त्याच्याजवळ नाहीं अशा व्यक्तीजवळ हृदय तर असेल च. म्हणून विनोबानीं पाच प्रकारचे यज्ञ करण्याचे लोकाना आवाहन केलें आहे. भूदान, संपत्ति-दान आणि श्रमदान या यज्ञाविषयींचें विवेचन पूर्वी केले च आहे. प्रेमदान आणि बुद्धिदान यज्ञ ह्याविषयीं या ठिकाणीं थोडा उल्लेख करण्यात येत आहे. त्याच्याजवळ काहीं हि नाहीं तो आपल्या शेजाऱ्याविषयीं आपल्या मनात आपल्या स्वतःसारखा भाव राखील आणि त्याच्याविषयींच्या प्रेम-भावाचे आपल्या मनात पोषण करील. त्याच्या आत्मज्ञानाचा यामुळें विकास साधेल. हा त्याचा प्रेमदान यज्ञ होईल. ज्याच्याजवळ विद्या, बुद्धि, शहाणपण आहे त्यानीं प्रत्येक दिवशीं काहीं वेळ तरी आपली विद्या आणि बुद्धि निःस्वार्थसेवेला लावून बुद्धिदान यज्ञात भाग घ्यावा. शहाण्या माणसानीं लोकाचे तंटे आपापसात मिटवून टाकावेत. वकिलानीं कोणती हि फी न घेता एखाद्या गरिबावर अत्याचार झाला असेल तर त्याची वकिली करावी. डॉक्टर-वैद्यानीं काहीं पैसा न घेता त्यांना औषध द्यावें. शिक्षक आणि विद्यार्थी यानीं वेळ काढून गरिबाला शिक्षण द्यावें. अकौंटटनीं वेतन न घेता एखाद्या सार्वजनिक संस्थेचे हिशोब लिहिण्याचें काम करावें. इत्यादि गोष्टींमध्यें बुद्धिदान करिता येण्यासारखें आहे. हे सर्व यज्ञ सोडून कार्य-कर्त्यांच्याकरिता आणखी एक फार मोठा यज्ञ उत्पन्न झाला आहे. त्याचें नाव ' जीवन दान.'

## ( ६२ ) जीवन-दान

क्रातीचें एक लक्षण असें आहे कीं, तिचा आरंभ एका विषयात होतो, परंतु थोड्या च दिवसात दुसऱ्या क्षेत्रात हि ती पसरत जाते आणि शेवटीं ती सर्व क्षेत्राना व्यापून टाकते. जीवनाच्या एका क्षेत्रात आरंभ होऊन एखादी गोष्ट त्या क्षेत्रात च मर्यादित राहील तर क्राति होणार नाहीं. आचार्य कृपलानींनीं बुद्धगया येथील सर्वोदय संमेलनात भूदान यज्ञाच्या क्रातिकारक-पणाचें विवेचन करताना क्रातीच्या या लक्षणाकडे सर्वांचें लक्ष वेधलें आहे. ते म्हणाले, " बुद्धानीं निर्वाणाच्या एका मार्गाचा आविष्कार केला, ती तर धार्मिक गोष्ट होती. परंतु ती क्रातिकारक होती म्हणून ती जीवनाच्या इतर अनेक क्षेत्रात पसरली. नवीन राज्य निर्माण झालें. समाजव्यवस्था नवीन रचली

गेली. नवीन संस्कृति पडविली गेली. म. गांधींनीं राजकीय क्षेत्रात आपलें काम सुरु केलें. देशाला परकीय सत्तेपासून मुक्त करण्याची खटपट केली. परंतु तिच्या पायावर च देशाला सार्वजनिक मुक्तीचा मार्ग त्यांनीं दाखवून दिला. त्याप्रमाणें जमिनीचा प्रश्न सोडविण्याकरिता भूदान यज्ञाचा प्रारंभ झाला. आता त्याच्या पायावर देशाचा कायापालट करण्याचें काम सुरु झालें आहे. सर्व दिशा सर्वोदयाच्या रंगानें रंगू लागल्या आहेत." भूदान यज्ञाच्या विचाराचा पाया आध्यात्मिकता, आत्म्याची एकता हा आहे. जगात जे काहीं आहे तें सर्व परमेश्वराचें आहे व जमिनीचे आपण मालक नाहीं त्याप्रमाणें च बुद्धीचे मालक हि आपण नाहीं. आपली संपत्ति, धन, पैसा याचे आपण मालक नाहीं. एवढें च काय, आपल्या शरीराचे आपण मालक नाहीं. आमच्याजवळ जमीन, संपत्ति, बुद्धि, शरीर जें काहीं आहे ते सर्व समाजसेवेला अर्पण केलें पाहिजे. भूदान यज्ञामधें एक क्रांतिकारक विजेचा प्रवाह संचारित झाला; परंतु एवढें च त्याचें ध्येय नव्हतें. संपत्ति-दान, श्रमदान, बुद्धिदान एवढा त्याचा विस्तार झाला. एवढ्यावर च तो थांबणार नाहीं. आमचें जीवन काय ते आमचें च आहे? आमचें जीवन काय क्षुद्र आहे? तें क्षुद्र स्वार्थाकरिता च का घालविलें जावें? जीवन आमचें नाहीं—परमेश्वराचें. ती परमेश्वराची देणगी आहे. त्याच्या कामात– समाजसेवेच्या कामात– तें अर्पण केलें पाहिजे. अशा प्रकारें भूदान-यज्ञ सर्वव्यापी झाला आहे. जीवनदानाला याची परिणति झाल्याशिवाय राहणार नाहीं. बुद्ध-गया सर्वोदय समेलनाची 'जीवनदान' ही एक महान् देणगी आहे. परंतु विनोबांनीं या जीवनदानाचा इशारा कित्येक महिन्यापूर्वी च आपल्या एका प्रार्थनोत्तर भाषणात केला होता. ते म्हणाले होते, 'आज नवीन माणूस, नवीन समाज घडवायचा आहे. त्याकरिता भूदान, संपत्ति-दान, श्रमदान वगैरेंची चळवळ सुरू करण्यात आलेली आहे. या कार्याकरिता अशी विचारधारा उत्पन्न झाली पाहिजे कीं, तिच्यामुळें लोकांनीं त्या कामाकरिता आपलें जीवन समर्पण करायला पुढें यावें."

सर्वांगीण क्रांतीचें क्षेत्र तयार झालें आहे. देशाच्या हवेमध्यें क्रांतीचा विद्युत्प्रवाह संचारित झाला आहे. परंतु हें परम ध्येय साध्य करण्याकरिता

त्यांनी या कामाला वाहून घेतले आहे असे भरपूर साधक कोठें आहेत? सेवक कोठें आहेत? बुद्धगया सर्वोदय संमेलनाच्या दुसऱ्या दिवशीच्या अधिवेशनात श्री. जयप्रकाश नारायण भाषण करायला उभे राहिले तेव्हा त्याचें मन विषण्ण झालें. एकनिष्ठ कार्यकर्ते भरपूर प्रमाणात मिळाले असते तर बिहारमध्ये ३२ लाख एकर भूमिदान संग्रह करणें पूर्वी च होऊन गेलें असते. संत विनोबाना इतके दिवस बिहारमध्यें ठेवून घेऊन कष्ट द्यावे लागले नसते. म्हणून चळवळीमध्यें तीव्रता आणण्याची प्रेरणा देण्याकरिता ते म्हणाले, 'आजचें युग या आंदोलनाकरिता अधिक काळ देणार नाहीं. अहिंसक क्रांति व्हावी म्हणून इतिहास उभा राहून वाट पाहणार नाहीं.' त्यांनी गेल्या वर्षी विद्यार्थ्यांना या आंदोलनात एक वर्ष समय देण्याचें आवाहन केलें होतें, परंतु एक वर्षाची गोष्ट बोलून आज काम चालणार नाहीं. आता तर जीवन अर्पण करण्याचा समय आला आहे. म्हणून त्यांनी श्रद्धा आणि विनयपूर्वक आपले जीवनदान केल्याची घोषणा केली तेव्हा टाळ्याचा कडकडाट झाला. सर्व संमेलनात एक अपूर्व गांभीर्य पसरलें. विनोबाजींचें हि हृदय विरघळून गेलें. त्यांनी गंभीरगंभीर भावात बोलण्यास आरंभ केला. ते म्हणाले, "मीं आता च एक भाषण ऐकलें. त्यामध्यें अंतः-करण बोलत होतें. त्यावरून रुक्मिणीच्या पत्राची आठवण झाली. रुक्मिणीनें भगवान् श्रीकृष्णाला एक पत्र लिहिलें होतें. आजकाल पत्राना साहित्याचें अंग म्हणून गणलें गेलें आहे. रुक्मिणीच्या पत्राचें असल्या साहित्यात पहिलें स्थान आहे. त्या पत्राला शुकाचार्यांनीं कविताबद्ध केलें आहे. पत्रात रुक्मिणी भगवान् श्रीकृष्णाना लिहिते, 'मला शंभर जन्म घ्यावे लागले तरी ते घेईन, प्राणत्याग करावा लागला तरी करीन, शरीर उत्तरोत्तर कृश करावें लागलें तरी करीन पण तुला च वरीन.' अशा तऱ्हेचा शुभ संकल्प ऐकून हृदय आनंदानें भरून येतें. मला वाटतें, हा यज्ञ सफल करीत असताना आमचें जीवन हि सफल होत आहे." ही गोष्ट येथें च संपली नाहीं. तेव्हापासून संमेलनातली हवा बदलून गेली. सगळ्यांचें अंतःकरण शीतल झालें. दुसरे दिवशीं विनोबा सकाळपासून चिंतन करीत होते कीं, याविषयीं आपलें काहीं कर्तव्य आहे काय? लगे च त्यांनीं जयप्रकाश नारायण यांना एक पत्र लिहिलें. 'भूदान यज्ञमूलक, ग्रामोद्योगप्रधान, अहिंसक क्रांतीकरिता माझें जीवन अर्पण.'

संमेलनाच्या सकाळच्या अधिवेशनाच्या सुरुवातीला च विनोबांचें हें पत्र वाचण्यात आलें. त्याबरोबर पुढाऱ्यांच्यापासून आरंभ होऊन खेड्यातल्या सामान्य कार्यकर्त्यांपर्यंत एक एक जीवनदानाचा संकल्प घोषित करूं लागला. यात च सकाळच्या अधिवेशनाचा सर्व वेळ निघून गेला. जीवन-दात्यांची संख्या साडेतीनशेंच्यावर झाली. त्यानंतर हि जयप्रकाशजी यांच्याकडे जीवन-दानाचे संकल्प येऊं लागले. आता प्रश्न असा कीं, जीवन-दानाचा अर्थ काय? काया, वाचा, मन आणि बुद्धि हे सर्व काहीं त्या महान् कार्यात अर्पण करणें हें ठीक आहे. परंतु हें एवढें च आहे काय? जीवनदानी कार्य-कर्त्यांमध्यें कित्येक असे असतील–आहेत हि, ज्यांनीं पूर्वी च आपलें जीवन विधायक कार्याला वाहिलेलें होतें. त्यांनीं पुन्हा जीवनदान दिल्याची घोषणा करणें याच्या अंतर्भूत कोणता अभिप्राय होता? विनोबांनीं संमेलनाचा उपसंहार करताना तो स्पष्टपणें समजावून दिला आहे. जीवनदानाचा अर्थ काय आहे याचा काहींसा आभास कृपालानींनीं आदल्या दिवशीं च त्यांच्या स्वतःच्या तऱ्हेनें दिला होता. विनोबा त्याचा उल्लेख करून म्हणाले, "ही गंभीर गोष्ट आहे. तिचा उल्लेख कृपलानींनीं काल केला होता. कृपलानी हे एक विशिष्ट स्वभावाचे गृहस्थ आहेत. त्यांची बोलण्याची शैली हि वेगळी आहे. परंतु त्यांनीं आपल्या भाषणात उपनिषदाचा च अर्थ सांगितला आहे. ते काय म्हणाले हें लोकांच्या सहज लक्षात येणार नाहीं. लोकांना वाटलें की, त्यांनीं थट्टा किंवा उपहास केला. त्यांनीं अत्यंत सहजपणें, म्हणजे माझ्या मतें अहिंसक पद्धतीनें, असें समजावून दिलें कीं, 'भाई हो, तुम्ही दान तर देत च आहा परंतु तें दान वाईट गोष्टींचें तर करीत नाहीं ना' हा विचार मनात असू दे. शुद्ध वस्तु च अर्पण केली पाहिजे. जीवनदानाचा विचार चांगला च आहे परंतु जे जीवनदानाचा संकल्प करीत आहेत त्यांनीं या गोष्टीकडे लक्ष दिलें पाहिजे कीं, जें टाकायचें होतें त्याचें च तर दान केलेले नाहीं ना? जीवन-दानात संकल्पाचा अर्थ जीवनशुद्धि हा आहे.' ही गोष्ट त्यांनीं अत्यंत चटकदारपणें आमच्यासमोर ठेवली होती. तो कोणत्या हि तऱ्हेनें उपहास नव्हता. आज जो आपण आमच्यासमोर आणि आपल्या स्वतःच्यासमोर दुसऱ्याला साक्षी ठेवून जीवन अर्पण करण्याचा संकल्प केला आहे त्याच्या-बरोबर च तुम्हीं जीवनशुद्धीची साधना केली पाहिजे. आपण सार्वजनिक

कार्य करीत आहोत. त्यातल्या त्यात भूदान यशासारखें मौलिक कार्य करीत आहों. याच्या योगानें देशाची काया च पालटणार आहे. त्याच्याकरिता जर जीवनदान करायचें असेल तर चित्तशुद्धीकरिता जितका प्रयत्न आपण करीत आहों त्यापेक्षा अधिक प्रयत्न केला पाहिजे "

ह्यानंतर काहीं महिन्यानीं बिहारमध्यें जीवनदान शिबिराचें उद्घाटन करताना विनोबानीं जीवनदानात असलेला आणखी हि गंभीर अर्थ सांगितला आणि त्याकरिता जीवनदात्यानीं उच्च आध्यात्मिक आदर्श पुढें ठेवून त्याप्रमाणें चालावें असें सांगितलें. "आम्ही कोण? साऱ्या जगाचा व्यापार कोण चालवीत आहे? जगाच्या व्यापाराची योजना कोणाची आणि ती काय आहे? या योजनेमध्यें मनुष्य कोणता भाग घेऊ शकेल? या सर्वांचा चालक परमेश्वर आहे. सर्व योजना त्याची च. आम्ही कोणी नाहीं. मनुष्य तुच्छ आहे. ईश्वरानें आपल्या कामाकरिता कोणाला अवजार म्हणून निवडलें तर च त्याला काहीं मूल्य आहे. तेव्हा च मात्र मनुष्य त्याच्या योजनेंत काहीं भाग घेऊ शकतो. नाहीं तर मनुष्याला काहीं किंमत नाहीं. काय काम केलें असता मनुष्य परमेश्वराच्या हातातलें अवजार होण्याला योग्य होतो? बीज जेव्हा आपला सर्वस्व नाश करून घेतें तेव्हा च त्याच्यातून वृक्ष जन्माला येतो. बीजाचें अस्तित्व राहील तर झाड जन्माला येऊ शकत नाहीं. त्याप्रमाणें च मनुष्यानें आपला मीपणा टाकून नवजीवन प्राप्त करून घेतलें नाहीं तर तो ईश्वराच्या योजनेंत भाग घेण्याला योग्य होत नाहीं आणि ईश्वर त्याचें ग्रहण करीत नाहीं." याबद्दलचें विस्तृत विवरण करून विनोबा म्हणतात, "जर ईश्वराच्या योजनेंत आपल्याला भाग घ्यायचा आहे तर बीजाप्रमाणें आपल्याला नाहींसें करून टाकलें पाहिजे, निःशेष केलें पाहिजे. बीज नाहींसें होईल तेव्हाच झाड जन्माला येईल. म्हणून बौद्ध लोक एक सिद्धान्त सांगत असतात कीं, एकाचा विनाश होतो तेव्हा च दुसऱ्या एकाच्या अस्तित्वाचा जन्म होतो. आपण जर आपलें रूप आहे तसें च राखलें तर आम्ही ईश्वराच्या कामाला योग्य होणार नाहीं. पण लोकाना आपल्याला शून्य करिता येत नाहीं. त्याच्या भट् बाजूला मीपणाचें कल्पना-जाल असतें. कर्तृत्व आणि ममत्व त्याला घेरून टाकीत असतें. हीं कायम

ठेवून जर कोणी ईश्वराच्या योजनेत भाग घेऊं इच्छीत असेल तर ईश्वर म्हणेल तूं माझ्याकरिता जागा मोकळी ठेवलेली नाहींस. तूं मोकळा हो म्हणजे च माझ्याकरिता तेथें स्थान मिळेल. असें जीवनदात्याचें स्वरूप असलें पाहिजे. जो मोकळा झाला आहे, ज्यानें आपल्याला शून्य करून टाकलें आहे, ज्यानें आपला आधार सोडला आहे, तो च मात्र जीवनदाता होऊ शकतो. ज्यानें आपल्याला शून्य केलें नाहीं तो आपल्या च योजनेप्रमाणें चालेल, ईश्वराच्या नाहीं. तुलसीदास म्हणतात, बाबा, 'अपने करत मेरी घनी घटी भई' मीं माझ्या मताप्रमाणें केलें तेव्हा माझी अब्रू नाहींशी झाली, म्हणून आतापासून तुम्ही च करा, मी करणार नाहीं. माझ्या हातून तू च करीव. मीं शून्य झालो आहें. जेव्हा मन या अवस्थेला पोचतें तेव्हा च मनुष्य जीवनदाता होतो. गीतेमध्यें भगवान् अर्जुनाला म्हणतात, 'यथेच्छसि तथा कुरु।' अर्थात् ज्याप्रमाणें तुझी इच्छा आहे तें कर, हें सांगून भगवान् अर्जुनाची परीक्षा पाहूं इच्छीत होते कीं अर्जुनाची स्वतःची म्हणून काहीं इच्छा शिल्लक म्हणून राहिली आहे किंवा नाहीं. जर अर्जुन म्हणाला असता, 'ही माझी इच्छा आहे' तेव्हा भगवान् म्हणाले असते, तर तूं माझ्या कामाला उपयोगाचा नाहींस. अर्जुन म्हणाला, आता माझी इच्छा कोठें शिल्लक राहिली आहे? 'नष्टो मोहः'— माझा मोह नाहींसा झाला आहे. म्हणून 'करिष्ये वचनं तव।' अर्थात् तू म्हणशील तसें करीन. गीताप्रवचनाच्या शेवटीं संत दादूच्या एका वचनाचा उल्लेख केला आहे. बोकूड 'मैं-मैं' (मी मी) म्हणून ओरडत असतो, परंतु मेल्यानंतर त्याच्या आतड्यातून तांत तयार करून पिंजणाला लावली जाते तेव्हा "तुही-तुही" (तू च तू च) असा आवाज निघू लागतो. अहंकाराचा शेवट झाल्यानंतर (तू च तू च) सुरू होतें. तेव्हा च भगवान् अशा व्यक्तीच्या हातून काम करवून घेतो.

"हें जग ही एक रंगभूमि आहे. या ठिकाणीं एक नाटक चाललेलें आहे. प्रत्येक माणूस त्यातला एक नट आहे. अभिनय करण्याचे वेळीं जर नट आपण अमुक व्यक्ति आहों ही गोष्ट विसरणार नाहीं तर त्याचा अभिनय चांगला वठणार नाहीं. त्याप्रमाणे च ईश्वराचें कार्य करण्याच्या वेळीं आम्हीं आमच्या अस्तित्वाचें स्मरण राखलें, आम्ही विसरून गेलो नाहीं, तर

आपल्या हातून ईश्वराचें कार्य होऊं शकणार नाहीं. विनोबानें जर उद्या हरिश्चन्द्राची भूमिका घेतली तर त्या वेळीं मी विनोबा आहे याची आठवण ठेवणें योग्य होणार नाहीं."

मनुष्य जेव्हा आपला अहंकार पूर्णपणें नाहींसा करून टाकील तेव्हा च त्याला जीवनदान म्हणता येईल. याच्या शेवटच्या अवस्थेमधें जीवन च मुळीं राहणार नाहीं. कोणीं आपलें जीवन समर्पण केलें होतें आणि कोणीं नव्हतें ही गोष्ट त्याच्या मृत्यूनंतर च ठरेल. म्हणून अमुक एक जीवनदाता आहे ही गोष्ट म्हणून चालणार नाहीं. अमुक जीवनदाता असावा एवढें च मात्र मनात समजता येईल. मृत्यूनंतर च अमुक जीवनदाता होता असें म्हणणें शक्य आहे. हा विचार समजावून देताना विनोबा म्हणतात, " जे म्हणतात मी जीवन-दाता आहे, मैं जीवनदानी हूँ। त्याच्यातला 'हूँ' नाहींसा होईल आणि 'मैं' मी शिल्लक राहील. म्हणून च असें म्हणणें योग्य नाहीं कीं, मी जीवनदाता आहे. म्हणून जीवनदात्याची सभा व्हावयाची असेल तर ती स्वर्गांत च होईल. पृथ्वीवर आमच्यासारख्या सामान्य माणसाची सभा होईल. जीवनदात्याचें संमेलन स्वर्गांत होईल, तें मृत्यूनंतर होईल. आधीं नाहीं.

" मनुष्याचें पूर्वीचें चरित्र पाहून असें म्हणता येणार नाहीं कीं, त्यानें जीवन-दानाचा संकल्प केल्यावर जीवनदात्याची योग्य अवस्था मिळविणें त्याला शक्य होईल कीं नाहीं. असें हि होऊं शकेल कीं, एखाद्या सात्त्विक मनुष्यानें जीवन-दान केलें तरी त्याला अखेरपर्यंत आपला 'मी'पणा सोडता येणार नाहीं आणि त्यामुळें तो हि जीवनदानाला अयोग्य म्हणून गणला जाईल. आणि दुसऱ्या पक्षीं एखाद्या राजस किंवा तामस स्वभावाच्या माणसानें श्रद्धापूर्वक जीवन-दानाचा संकल्प केला आणि नंतर त्याच्यात असें परिवर्तन घडून आलें कीं, जणू त्याचा आध्यात्मिक पुनर्जन्म झाला आणि त्यानें आपला 'मी'पणा सोडून आपल्याला ईश्वराच्या हातीं पूर्णपणें समर्पण करून दिलें तर तो खरा जीवनदाता होईल. म्हणून जे राजस किंवा तामस स्वभावाचे लोक आहेत असें समजलें जातें त्यांनीं हि जर जीवनदान दिलें तर त्याना वगळण्याचें कारण नाहीं. कोणाला हि वगळणारे आम्ही कोण ! मृत्यूनंतर च आम्ही जीवनदाते होतों कीं नाहीं हें ठरेल."

म्हणून त्यांनीं घोषणा केली आहे कीं, ज्यांनीं ज्यांनीं म्हणून जीवनदान

केल्याची घोषणा केली आहे ते सर्व जीवनदाते आहेत असें मानणें च योग्य आहे. यासंबंधीं विनोबा म्हणतात, "मी शब्द प्रमाण मानतों. ग्मानेसुमारीच्या वेळीं कोण हिंदु आहे, कोण मुसल्मान आहे, हें टिपलें जातें. जो माणूस आपण त्या जातीचा आहे असें सांगतो तें च लिहून घेतलें जातें त्याबद्दल पुरावा मागितला जात नाहीं. लोक म्हणतात, 'अमुक माणूस कसल्या प्रकारचा आहे हें आम्हाला ठाऊक आहे, त्यानें उगी च नाव दिलें आहे.' याचा अर्थ असा कीं, आम्ही च जणू त्याचे अंतर्यामी आहोंत." लाकूड जळून भस्म झाल्यावर तें काय होतें, कोणत्या जातीचें होतें, हें समजून येणार नाहीं त्याप्रमाणें कोणी हि माणूस कोणत्या हि स्वभावाचा का असेना त्यानें जीवनदानाची घोषणा केल्यावर जर त्यानें आपल्याला जाळून भस्म करून टाकलें, अर्थात् आपल्याला संपूर्णपणें ईश्वराच्या हातीं समर्पण केलें, तर अशा परिस्थितींत ती व्यक्ति पूर्वी कोणत्या स्वभावाची होती, कोणत्या प्रकारची होती, हें समजून येणार नाहीं. आणि समजून घेण्याचें कारण उरणार नाहीं. हा विचार समजावून देताना विनोबा म्हणतात, "लाकडाला अग्नि लायला. लाकूड जळायला लागून त्याचा निखारा झाला. मग तो निखारा बकुल किंवा आम्रवृक्ष राहत नाहीं. पाहून जर तो अमुक झाडाचा आहे असें ओळखता आलें तर समजावें कीं, त्याचा संपूर्ण निखारा झालेला नाहीं. आतलें लाकूड अजून हि जळून जाऊन त्याची राख व्हावयाची आहे."

कोणी कोणी विचारतात कीं, ज्यानीं जीवनदान दिलें आहे त्यांच्या उपजीविकेची काय व्यवस्था होईल ? त्याचें विनोबानीं उत्तर दिलें आहे कीं, "विश्वंभर त्याची व्यवस्था करील. 'यो ऽसौ विश्वंभरो देवः स भक्तान् किं उपेक्षते ?'। ईश्वर आपल्या भक्ताची उपेक्षा करणार नाहीं. तो विश्वंभर आहे ही गोष्ट कधीं हि खोटी ठरलेली नाहीं. जर जीवनदाते लोक भक्त होतील तर विश्वंभर त्यांची चिंता करील. इंग्रजी भाषेंतील अर्थाप्रमाणें आमचें हें कार्य 'सर्व्हिस' नाहीं. ही परिशुद्ध सेवा आहे. म्हणून उपजीविकेच्या व्यवस्थेसंबंधीं कोणत्या हि तऱ्हेची गॅरंटी यामध्यें नाहीं. शिक्षण देण्याची व्यवस्था केली जाईल. पण त्यानीं तें शिक्षण घेतलें च पाहिजे अशी हि सक्ति केली जाणार नाहीं. काम करीत असताना च त्याना शिक्षण

मिळून जाईल. जीवनदान करणाऱ्या लोकांपेक्षा सहानुभूति असणारे लोक च पुष्कळ असणार आहेत त्यांच्याकडून त्यांच्या आजीविकेची काहीं व्यवस्था होऊ शकेल. अशी सहानुभूति वाटणारे लोक म्हणजे ही विशाल जनता आहे. अर्थात् जीवनदान देणाऱ्यांचे भरणपोषण करण्याची काहीं व्यवस्था केली पाहिजे आणि त्याकरिता चिंता केली पाहिजे, असें मला वाटत नाहीं. परमेश्वराच्या हातीं आम्ही आमचें जीवन समर्पण केलें आहे. तो च आमचा एक भरवसा. हा विशुद्ध भक्तिमार्ग आहे. प्रथम च मीं सांगितलें कीं, जर अहंकार शिल्लक असेल तर जीवनदानाचा उद्देश सफल होणार नाहीं. भक्तीचा संकल्प केला गेला आहे. भक्तीचा लाभ झाल्यानंतर त्याची जितकी शक्ति असेल त्याप्रमाणें त्याच्या हातून काम होईल. काम करता करता शक्ति हि वाढेल. युक्तीचा हि विकास होईल. ज्यांनीं जीवनदान दिलें आहे त्याची शक्ति आणि युक्ति कमी असून चालेल परंतु त्याची भक्ति कमी असून चालणार नाहीं."

ज्यांनीं जीवनदान दिलें आहे त्यांच्याकडून काय काम करून घ्यायचें हा एक प्रश्न आहे. यासंबंधीं विनोबा म्हणतात, "ज्यांनीं आपण जीवनदान दिलें असें सांगितलें कीं त्या क्षणीं च ते या कामाला लागले असें समजलें पाहिजे. त्याकरिता माझ्याकडून त्यांना काहीं सूचना पाहिजे असतील तर मी त्या त्यांना जरूर देईन. माझ्याकडून जर काहीं मदत पाहिजे असेल तर ती हि देईन. पण ज्यांनीं जीवनदान दिलें आहे त्यांनीं तें कोणा व्यक्तीच्या हातांत समर्पण केलें आहे असें नाहीं." म्हणून त्यांच्यावर कोणी अधिकारी असणार नाहीं. विनोबा म्हणतात, "हे कोणी कोणाच्याहि हाताखालचे पळप नाहींत. त्यांतला प्रत्येकजण वाघ आहे. ते आपआपल्या शक्तीप्रमाणें रंगत च काम करतील. त्यांना चळविण्याकरिता धनगराची जरूरी असणार नाहीं. जीवनदानी जरूर तर एकमेकांत विचारविनिमय करतील, एकमेकांना उपदेश देतील, उपदेश घेतील. 'बोधयन्ति परस्परम्' हें भक्तांचें एक लक्षण आहे. बोध देण्याकरिता एखादा कोणी धर्माधिकारी असणार नाहीं. प्रत्येकजण प्रत्येकाला उपदेश देईल, युक्ति मागेल."

जीवन-दान फक्त प्रौढ माणसांनीं च करावें असें नाहीं. मुलेंमुली हि जीवन दान करू शकतील.

विनोबा पुढें म्हणतात, "जीवनदानाचा अर्थ आहे अंतिम प्रयास. हें अखेरचें कार्य आहे. ज्यानीं जीवनदान दिलें आहे, ते असह्य प्रवासी होऊन गेले आहेत. त्यानीं नेहमीं पुढं पुढं जात रहायचें आहे. कधीं हि मागें वळायचें नाहीं. या अंतिम कार्यामध्यें कोणीं कोणाची वाट हि पहायची नाहीं. कोणीं कोणाकरिता थांबायचें नाहीं. चालता चालता कोणी पडला तर पडला. चालता चालता कोणी थांबला तर थांबला. कोणीं कोणाची अपेक्षा करायची नाहीं" यासबधीं त्यानीं पांडवांच्या स्वर्गारोहणयात्रेच्या गोष्टीचें स्मरण करून दिलें आहे. पांच पांडव आणि द्रौपदी चालूं लागलीं. भीम पडला, आणि पडला तेव्हा धर्मराजाला म्हणाला, मला मदत करा. धर्मराज म्हणाले, भाऊ, उठून उभा रहा तेव्हा च यांहीं मदत करता येईल तो भीमासाठीं थांबला नाहीं. याप्रमाणें एकेकजण सगळे च पडून गेले. स्वर्ग द्वारीं त्याला फक्त एक च साथी उरला तो होता एक कुत्रा. त्याला सोडून स्वर्गांत प्रवेश करायचं त्यानें मान्य केलें नाहीं. यासबधीं विनोबा आणखी म्हणतात, "या कामात सगळे च मुक्त आहेत. मुक्त राहून च समोर जें एकमात्र कार्य आहे त्याच्यावर तुटून पडायचें असा विचार अंत करणांत ठेवला तर कार्य सहज होऊन जाईल आणि त्या कामाचे काहीं दुष्परिणाम होतील अशी शंका हि राहणार नाहीं प्रत्येकाची परीक्षा होईल. जे टिकतील ते टिकतील, जे टिकणार नाहींत ते नाहींत. जे आमच्याबरोबर चालू इच्छीत असतील त्याच्याबरोबर आम्ही आहोंत. जे आम्हाला सोडतील त्याना तसें करण्याचा अधिकार आहे आणि आमच्यापुढें हि जाण्याचा हक्क आहे."

बुद्धगयेमध्यें जीवनदानाची जी लाट उठली ती थंड झालेली नाहीं. एक सारखा जीवनदानाचा प्रवाह वाढत चालला आहे सप्टेंबर १९५५ पर्यंत एक हजाराहून अधिक लोकानीं जीवनदानाचा सकल्प केला आहे. जीवनदानी लोकाना चित्तशुद्धीची प्रेरणा देण्याकरिता आणि त्याना योग्य जीवनाची दीक्षा देण्याकरिता शिबिराची व्यवस्था करण्यात आली आहे त्यामुळें आपल्या योग्यतेप्रमाणें आणि मानसिक प्रवृत्तीप्रमाणें वेगवेगळ्या क्षेत्रात त्यानीं कामाला लागावें असा प्रयत्न करणेंत येत आहे. जीवनदानाच्या प्रक्रियेमुळें एक दैवी शक्ति निर्माण होत आहे आणि भूदान आणि

सर्वोदयसाधना यात एक नवीन युग येण्याची चिह्नें दिसत आहेत. सर्वोदय प्रस्थापित होण्याचा समय पुष्कळ अशीं वाढला आहे.

## ( ६३ ) षष्ठांश दानाचें रहस्य

भूदानयज्ञासंबंधीं कित्येक लोक असें म्हणत असतात कीं, मोठे शेतकरी आणि जमीनदार यांच्याकडून एकषष्ठांश भूमिदान घेतल्यावर उरलेली पांचषष्ठांश काहीं अडचण न राहता ते आरामानें भोगू शकतील आणि त्यांचें जीवन पूर्वीप्रमाणें च चालेल. यामुळें समाजात क्रांति होण्याचा संभव नाहीं. ज्यांना असें वाटतें त्यांना भूदानयज्ञाच्या चळवळीचें रहस्य समजून आलेलें नाहीं. भूदानयज्ञ हें जमीन आणि संपत्ति यांचें स्वामित्व विसर्जन करण्याची दीक्षा देण्याचें आंदोलन आहे. आज ज्यांनी एक षष्ठांश दान दिलें आहे ते उद्या त्याहून अधिक दान देतील आणि जोंपर्यंत संपत्तीचें विसर्जन पूर्ण होणार नाहीं तोंपर्यंत त्यांचें दान देणें चालू च राहील. विनोबा म्हणतात, " रबर खूप ताणलें म्हणजे तुटून जातें. म्हणून त्याला हळूहळू ताणलें पाहिजे. म्हणून मी सध्या एक षष्ठांश मागत आहें. आज तर मालक आपली सर्व च संपत्ति आपल्याजवळ साठवून ठेवीत आहेत. समाजात ही च रीत चालू आहे. म्हणून मी प्रथम एक षष्ठांश मागतों. नंतर अधिक मागेन. व्यक्तीचा गुणविकास होण्याकरितां योग्य काळ दिला पाहिजे." संपत्तिदानाबद्दलचीं विनोबांनीं जी गोष्ट सांगितली ती च भूदानयज्ञाला लागू आहे. त्यांनीं रांची येथें बिहारमधल्या भूदानकार्यकर्त्यांच्या शिबिरात ही गोष्ट अधिक स्पष्ट केली आहे. " बिहारमध्यें आम्हीं अधिक खोलात प्रवेश केला आहे. मी येथें जमीन आणि दानपत्रें यांची संख्या वाढवू इच्छितों. एवढें च नाहीं तर गावच्या लोकांना मी हें समजावून सांगतों कीं गावातल्या भूमिहीन गरिबांना जमीन देण्याची व्यवस्था तुम्हीं च केली पाहिजे. सर्वांनीं मिळून हें काम हातीं घेतलें पाहिजे. प्रथम मी म्हणेन, प्रत्येक गावाकडून पांच दहा एकर जमीन मिळाली पाहिजे. नंतर मी आणखी एक पाऊल पुढें टाकीन. गंभीरपणें प्रवेश करायचा असेल तर हळूहळू च गेलें पाहिजे. प्रत्येक गावात प्रत्येक शेतकऱ्याकडून दानपत्र मिळविलें पाहिजे. आणि माझें शेवटचें पाऊल असें असेल कीं, त्या वेळीं मी लोकांना सांगेन

## ( ६४ ) भूमिवितरण–जमिनीचें वांटप

भूदान कार्यकर्त्यांची शक्ति, सामर्थ्य आणि समय एकनिष्ठपणें भूमिदान मिळवण्याच्या कामात च लागावी म्हणून आजपर्यंत जमीन वाटप करण्याच्या कामाला आरंभ करण्यात आलेला नव्हता अथवा ज्या ठिकाणीं भूमिवितरण सुरू झालें आहे तेथ हि तें त्वरित पुरें करण्याची खटपट करण्यात आलेली नव्हती. बुद्धगया संमेलनापासून भूमिवितरणावर विशेष जोर देण्यात येत आहे जमीनवाटप केल्याच्या योगानें भूदानयज्ञाचें वास्तविक आणि पूर्ण स्वरूप लोकांना स्पष्ट दिसून येईल. जमीन मिळविण्यापेक्षा जमीनवाटपाचें काम अधिक श्रमाचें आणि जबाबदारीचें आहे जमीनवाटपाची जबाबदारी ज्यांच्यावर द्यायची ते कार्यकर्ते न्यायनिष्ठुर, निरपेक्ष आणि क्रांतीची दृष्टि असलेले, असे असले पाहिजेत शिवाय विनोबांनीं वितरणासंबंधीं जे नियम घालून दिले आहेत त्यांचें हि यथायोग्य पालन झालें पाहिजे नाहीं तर जमीन वाटपाचा उद्देश व्यर्थ होण्याचा संभव आहे. वितरणासंबंधीच्या नियमांतले खालीं दिलेले नियम विशेष उल्लेख करण्यासारखे आहेत.

(१) वाटपाचें काम गावातल्या सार्वजनिक सभेमध्यें केलें पाहिजे. (२) वाटपाच्या ठरलेल्या तारखेच्या पूर्वी सात दिवस आणि एकदा त्यापूर्वी एक दिवस वाटपासंबंधी प्रचार दवंडी पिटून केला पाहिजे. (३) गावातल्या लोकांच्या एकमतानें किंवा जे भूमिहीन आहेत त्यांच्या एकमतानें वाटप केलें पाहिजे. त्यात मतभेद असला तर चिठ्या टाकून अखेरचा निर्णय घ्यावा. सर्व काम एका च बैठकींत पुर्ण झालें पाहिजे. (४) भूमिवितरणाची जबाबदारी ज्या कार्यकर्त्यांवर आहे त्यानं फक्त साक्षी म्हणून, सेवक म्हणून, उपस्थित रहावयाचं आहे, निर्णय देणारा म्हणून नाहीं. या कामात कसली हि पक्षनिष्ठ दृष्टि असता कामा नये. (५) शक्यतोंवर दानात मिळालेल्या जमिनीपैकीं एक तृतीयांश जमीन हरिजनांना दिली पाहिजे. भूमिहीनांपैकीं ज्या व्यक्तीच्या मालकीची कधीं हि जमीन नव्हती त्याच्या हक्काला अग्रस्थान दिलें पाहिजे. त्या गावातल्या भूमिहीनांना जमीन वाटल्यावर शिल्लक राहिली तर शेजारच्या गावातल्या भूमिहीनांना देण्यात यावी.

जमीन वाटपाच्या कामात एका विषयासंबंधीं विशेष सावध राहिलें पाहिजे. ज्याला जमीन दिली जाते त्याच्या मनात अशी भावना उत्पन्न होणं उपयोगी नाहीं कीं, तो गरीब आहे म्हणून दया करून त्याला जमीन देण्यात आली आहे. गरिबाला जमीन मिळण्याचा हक्क च आहे. तो इतके दिवस काढून घेतला गेला होता, तो च त्याला परत देण्यात येत आहे असें त्याला वाटलें पाहिजे. कार्यकर्त्यांनीं सर्व गावामध्यें अशी हवा निर्माण केली पाहिजे कीं, जीमुळें लोकांना वाटावें कीं, आजपर्यंत भूमिहीनांना जमीन दिली नव्हती हा समाजाकडून फार मोठा अन्याय झालेला होता. भूमिदान यज्ञाच्या द्वारा त्या अन्यायाचें परिमार्जन आज होत आहे. जमीन जे स्वत कसीत नाहींत आणि काहीं श्रम न करिता जमिनीचें उत्पन्न खातात ते जमिनीचे मालक असू शकत नाहींत. जे श्रम करतात त्यांचा हक्क त्यांना परत करण्यात येत आहे हें खरें, परंतु त्यांनीं हें लक्षात ठेवलें पाहिजे कीं, अधिकाराची दुसरी बाजू कर्तव्य ही आहे. कर्तव्य योग्य प्रकारें पाळलें जाईल तर च हक्क मिळाल्याला सार्थकीं लागेल ही गोष्ट त्याला

जमीन दिली जाते त्याच्या मनावर बिंबवली पाहिजे. म्हणून जमीन मिळाल्याबद्दल त्याने आनंद प्रदर्शित करण्याचें कारण नाहीं. त्यानें जर जमीन खराब केली, पीक कमी काढले आणि जमीन जर पडीक टाकली, तर तो ईश्वराजवळ आणि समाजाजवळ अपराधी म्हणून गणला जाईल.

सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे भूमीचे वाटप करण्याचे वेळेपासून जमीन मिळणाराला सर्वोदयाची दीक्षा दिली पाहिजे. त्याला सर्वोदयामागें असलेली भावना समजावून दिली पाहिजे. त्याच्या कुटुंबाचें सर्वोदयपरिवार म्हणून संगठन केलें पाहिजे. म्हणून तो दारू पीत असेल तर त्याला त्याच्यापासून परावृत्त केलें पाहिजे. उपजीविकेला साहाय्यक म्हणून त्याला वस्त्रस्वावलंबी केलें पाहिजे. त्याकरिता सूतकताईचें शिक्षण घेऊन त्यानें वस्त्रस्वावलंबनाकरिता नियमित कातले पाहिजे आणि दरवर्षी सूताजली हि अर्पण केली पाहिजे. घरीं कांडलेले तांदूळ आणि जात्यावर दळलेलें पीठ च वापरलें पाहिजे. याप्रमाणें क्रमाक्रमानें सर्वोदयाच्या मार्गावर त्यानें दृढपणें पाऊल टाकलें पाहिजे तेव्हां च जमीन वाटण्याचा उद्देश सार्थ होईल.

## ( ६५ ) जमिनीचें विखंडीकरण

असा आक्षेप घेतला जातो कीं, भूदान-यज्ञामुळें जमिनीचें आणखी हि तुकडे होऊन जातील. कारण दोन चार गुंठे जमीन हि दानात घेतली जाते. ह्या आक्षेपाला उत्तर देताना विनोबा म्हणतात, " जमिनीचे तुकडे होत आहेत याबद्दल तुम्हाला दु:ख वाटतें, पण भाई हो, आज हृदयाचे तुकडे झाले आहेत ही गोष्ट काय चांगली आहे ? आज सर्वांच्या अंत:करणाचे तुकडे तुकडे होत आहेत. जर हृदयाचे तुकडे जोडता येतील तर जमिनीचे तुकडे जोडणे सहज होईल. गरिबांना जमीन दिल्यावर त्यांना सहकाराचा मंत्र शिकवणें अवघड होणार नाहीं. प्रथमपासून जर सर्वांनीं एकत्र जमीन करण्याची अट घालण्यात आली तर ती एक चळजवरी होईल. आणि तें घडवून आणण्याकरिता व्यवस्थापक लागेल. म्हणून जमिनीचा मालक परमेश्वर आहे ही गोष्ट समजावून देऊन च त्या जमिनीवर शेती करण्याचा पूर्ण अधिकार आम्ही त्याला देतों. जर हृदय जोडलें गेलें तर जमीन जोडणें ही काय कठीण

गोष्ट आहे ? कोणतें प्रथम जोडलें पाहिजे हे समजणें बुद्धीचा विषय आहे. ज्या ठिकाणी अंत करणाचे तुकडे झाले आहेत तेथें जमिनीचे तुकडे जोडायला येतील का ? एक भाई मला म्हणाले, 'भूमिहीन लोक एकत्र मिळून च (Co operative Farming) शेती करायास तयार असतील तर च आम्ही त्याना जमीन देऊं.' त्याना मीं उत्तर दिलें कीं, 'तुम्ही लोकाना समजावून सांगा.' तेव्हा त्याची काहीं थोडी समजूत पटली. कारण लोक म्हणू लागले, आम्ही स्वत सहकारी शेती करीत नाहीं. दुसऱ्या कुठल्या हि कामात सहकार करीत नाही. आणि येथें गरीब लोकांच्यावर मात्र सहकारी शेतीची अट लादू पहात आहां. त्यामुळें त्यांच्यावर दान आणल्यासारखें होईल. आज जमीन मिळते की नाही याची च भीति त्याना वाटत आहे. तेव्हा ते काही हि अट मान्य करतील पण ते मनापासून सहकार्य करणार नाहीत. तेव्हा त्या सद्गृहस्थाना माझं म्हणणें समजू लागलें कीं प्रथम हृदय जोडणें ही जरूरीची गोष्ट आहे.

## ( ६६ ) तुकडे झालेल्या जमिनींतलें उत्पन्न

थाणखी हि असा आक्षेप घेतला जातो कीं, भूदान यज्ञामुळें शेतीचे तुकडे होतील आणि त्यामुळें उत्पादन कमी होईल. या आक्षेपाला कसला हि आधार नाहीं. चीन आणि जपानमध्यें साधारणत दोन दोन एकराच्या तुकड्यात शेती केली जाते. परंतु तेथलें उत्पादन आमच्या देशाच्या तिप्पट आहे. उत्पादनाचें प्रमाण जमीन मोठी कीं लहान यावर फारसें अवलंबून असत नाहीं. शास्त्रीय ज्ञानाचा उपयोग करून शेती करावयाची किंवा कसें ही मुख्य गोष्ट आहे. जेथें शेती शास्त्रीय पद्धतीनें बुद्धीचा उपयोग करून केली जाते त्या ठिकाणीं पुष्कळ पीक निपजतें. श्रीमन्नारायण आगरवाल आपल्या एका निबंधात लिहितात, जगातल्या सर्व शेतीचें निरीक्षण करून ही गोष्ट सिद्ध झाली आहे कीं, जमिनीच्या मोठ्या क्षेत्रात यंत्राचा उपयोग करून शेती केली तर प्रतिव्यक्ति उत्पादन वाढतें ही गोष्ट खरी आहे, पण प्रतिएकर उत्पादन वाढतें ही गोष्ट खरी नाहीं. वस्तुत. भारतासारख्या दाट वस्तीच्या देशात लहान लहान तुकड्यामध्यें Intensive cultivation करण्यामुळें च हिंदुस्थानातला आर्थिक प्रश्न सुटेल एक गोष्ट मात्र जरूर

## ( ६७ ) Ceiling चा प्रश्न

जमिनीचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटण्याकरिता जमीनवाटण्याची गोष्ट आज देशात सर्व टिकाणा चर्चिली जात आहे. यासबधीं काहीं दिवसापूर्वी एक धोस्याचा प्रश्न उभा करण्यात आलेला आहे तो म्हणजे कोणाजवळ जास्तींत जास्ती किती जमीन ठेविता येईल हें ठरविणे. याला सीलिंग ( Ceiling ) म्हणतात आणि त्याबद्दल देशात वादविवाद चालतो. पुष्कळाना वाटतें सीलिंग ठरवून दिलें कीं जमिनीचा प्रश्न सहज सुटेल. ही समजूत चुकीची आहे. जे सीलिंगचा प्रश्न उपस्थित करतात त्याची दृष्टि भलत्या च दिशेला वळलेली आहे. मोठमोठ्या जमीनमालकाच्या मालकीचें शेवटपर्यंत रक्षण करावें यासबधीं च त्याचा आग्रह. भूमिहीन गरिबाला जमीन मिळावी कीं न मिळावी याविषयीं त्याना क्षिति नाहीं. पण भूमिहीन गरीबाच्याकरिता जमिनीची व्यवस्था करणें हा च देशापुढें सर्वात जरुरीचा आणि मौलिक प्रश्न आहे. प्रथम गरिबाना जमीन दिली पाहिजे, बाकीच्या गोष्टी मागाहून. ह्या मौलिक प्रश्नाला आपण अग्रस्थान दिलें पाहिजे. आम्हीं तसें केलें तर सीलिंगचा प्रश्न उत्पन्न होत नाहीं. आणि जरी तो उत्पन्न झाला तरी तो अगदीं गौण असेल. उलटपक्षीं जर सीलिंगच्या प्रश्नाला अग्रस्थान दिलें तर मोठमोठे जमिनीचे मालक आपल्या आप्तस्वकीयाचे नावें जमीन करून देऊन आपल्या ताब्यात सीलिंगच्या आत जमीन ठेवण्याची खटपट करतील सीलिंग ठरविलें जाईल या भीतीनें मोठमोठ्या जमीनमालकानीं आज हि याप्रमाणें जमिनीचें हस्तांतर करून टाकलें आहे, व ते अद्याप हि करीत आहेत. म्हणून सीलिंग कमी राखलें तरी भूमिहीना-करिता विशेष काहीं जमीन शिल्लक राहील असें दिसत नाहीं. प्रथम प्रत्येक कुटुंबाला पाच एकराप्रमाणें जमीन द्या, नतर उरलेल्या जमिनीला सीलिंग करून द्यायचें असेल तर तसें करा. म्हणून विनोबा सीलिंग ठरविण्याच्या अत्यत विरुद्ध आहेत ते यासबधीं म्हणतात, "सीलिंगची गोष्ट मोठी धोक्याची आहे. सीलिंगचा प्रश्न उभा करणें आपल्याला योग्य नाहीं. सगळे तीसंबधीं बोलतात. पण मी म्हणतों मला सीलिंग नको. मला 'फ्लोअरिंग' ( Flooring ) पाहिजे. प्रत्येक कुटुंबाला पाच एकर जमीन

मिळाली पाहिजे. हा सिद्धान्त मान्य करा आणि मग जी जमीन उरेल तिचें काय वाटेल ते करा. कित्येक लोक म्हणतात कीं, आपल्या म्हणण्याप्रमाणें रुफिंग (Roofing) घेतलें तर तें इतकें खालीं येईल कीं वारून च आत प्रवेश करावा लागेल. मी म्हणतों त्यामुळें कांहीं बिघडणार नाहीं. मला दिल्लीच्या सीलिंगची जरूरी नाहीं. मला गावाचें सीलिंग पाहिजे. मला राचीला दिसून आलें कीं, तीस एकराचें सीलिंग केलें तरी भूमिहीनाना जमीन मिळणार नाहीं. जमीनदार लोक आपल्या कुटुंबातले लोक आणि आप्तेष्ट यामध्यें जमीन वाटून घेतील. तेलंगणामध्यें हि सीलिंगचा प्रश्न चालला होता. तेथें हि जमीनमालकांनीं याप्रमाणें च केलें. त्या ठिकाणीं तर दोनशें एकराच्या सीलिंगची गोष्ट बोलली जात होती. तीस एकरापेक्षांहि कमी सीलिंग ठरविलें तरी मोठी नुकसानभरपाई द्यावी लागेल. मोबदल्याशिवाय आज कोणती हि जमीन काढून घेऊन चालणार नाहीं आणि सीलिंग मोठें ठेवलें तर कांहीं हि जमीन मिळणार नाहीं. म्हणून गावची जमीन गावातल्या सर्वांची व्हावी असें मला वाटतें. सगळ्यात जास्ती तिप्पटीपर्यंत जमीन ठेवता येईल अशी एक गोष्ट म्हटली जाते. परंतु सगळ्याना पूर्ण खायला मिळालें नाहीं तोंपर्यंत कोणाला हि तिप्पट खायचा हक्क कसा देता येईल? कोणी हि व्यक्ति दुसऱ्या व्यक्तीपेक्षा तिप्पट जमीन कसू शकणार नाहीं. तेव्हा तिप्पट जमीन ठेवण्याचा अधिकार त्याला कसा मिळेल? म्हणून या चाललेल्या सर्व चर्चेमध्यें कांहीं हि अर्थ नाहीं. आपल्याला मौलिक विषयासंबंधीं विचार केला पाहिजे. माझी इच्छा आहे कीं, गावातली जमीन गावाच्या मालकीची व्हावी. सरकार कायद्यानें ही गोष्ट करू शकतें का? सीलिंग ठरवून दिलें तर काय कामाचें? आज मोठमोठे टुटणारे लोक आहेत. त्या ठिकाणीं लहान लहान तुकडे निर्माण होतील. त्यामुळें टुटारूंच्या संख्येंत मात्र वाढ होईल." यासंबंधीं एका ठिकाणीं त्यांनीं ही च गोष्ट सांगितली आहे. 'भूमिसमस्या सोडविण्या-करिता सीलिंगची गोष्ट बोलली जाते. परंतु सीलिंगनें काम होणार नाहीं. फ्लोअरिंगची आवश्यकता आहे. कायदा करायचा च असेल तर असा कायद्याची जरूरी आहे कीं, प्रत्येक शेतकऱ्याला कमींत कमी पाच एकर जमीन मिळावी.'

## (६८) शेती च सर्वोत्तम शरीरश्रम आणि श्रेष्ठ उपजीविका

साबरमती आश्रमात असल्यापासून सैपाक करण्यापासून भंग्याच्या कामापर्यंत आश्रमातलें सर्व प्रकारचें शरीरश्रमाचें काम विनोबा करीत आलेले आहेत. वर्धा सत्याग्रहाश्रमाचे चालक असताना त्यानीं आश्रमवासीयाना ज्या एकादश व्रतांचें पालन करणें अवश्य म्हणून ठरविलें होतें त्यात शरीरश्रम हें हि एक होत. सूतस्ताईच्या सर्व प्रकारच्या प्रक्रियेत ते तज्ज्ञ आहेत. विणाईचे काम, सुतारी वगैरे सर्व प्रकारचे उत्पादक श्रमाचें काम त्यानीं आपल्या हातानीं पुष्कळ दिवस केलें आहे. पवनारच्या परधाम आश्रमात काञ्चनमुक्तीचा प्रयोग करताना शेतीचें काम हि गर्भारपणें त्यानीं केलें आहे आणि त्याचें सूक्ष्म निरीक्षण हि केलें आहे. या सर्व उत्पादक परिश्रमाची शेतीशीं तुलना करून त्यानीं असा अनुभवसिद्ध सिद्धान्त ठरविला आहे कीं, जीं काहीं शरीरश्रमाचीं कामें आहेत त्यामध्यें शेतीचें काम सर्वांत श्रेष्ठ आहे. शेतीचें काम सर्वोत्तम शरीरश्रम का आहे त्याचें विवरण करताना ते म्हणतात कीं :—

(१) शेतीचें काम हें स्वच्छ असतें आणि त्यामुळें मोकळ्या हवेंत व्यायाम मिळतो.

(२) शेतीचें काम करताना आकाशाचें सेवन करता येत.

(३) शेतकामाच्या द्वारा मौलिक उत्पादन होतें कारण ज्या काहीं दुसऱ्या गोष्टी उत्पन्न होतात त्या शेतींतून उत्पन्न झालेल्या वस्तूपासून किंवा त्या वस्तूच्या साह्यानें च बनविल्या जातात.

(४) शेतीचें काम सर्वांत आनंददायक आहे.

(५) शेतीचा अमर्याद विस्तार ही च ईश्वराची सर्वोत्तम मूर्ति आहे. म्हणून शेतीचें काम हि एक ईश्वराची उपासना च आहे.

(६) शेतींत काम केल्यास मनुष्य दीर्घायुषी होईल आणि देशातले रोग कमी होतील.

(७) शेतीचें काम केल्यास ब्रह्मचर्यपालन करणें सोपें होतें. आणि ब्रह्मचर्य पाळण्यानें शेतीला अधिक मदत होते.

म्हणून प्राचीन कालापासून ऋषींनीं उपजीविका मिळविण्याच्या कामामध्ये शेतीला श्रेष्ठ स्थान दिले आहे. यासंबंधीं मनूने काय म्हटलें आहे हे जाणून घेणें योग्य होईल म्हणून तत्संबंधीं मनुस्मृतींतले वचन उद्‌धृत करणें योग्य होईल.

ऋतामृताभ्यां जीवेत् तु मृतेन प्रमृतेन वा ।
सत्यानृताभ्यया वाऽपि न श्ववृत्त्या कदाचन ॥

ऋत वृत्तीनें आणि अमृत वृत्तीनें निर्वाह करावा किंवा मृत वृत्तीनें अथवा प्रमृत वृत्तीनें निर्वाह करावा किंवा सत्यानृतवृत्तीनें निर्वाह करावा परंतु केव्हा हि उपजीविकेसाठीं श्ववृत्तीचें अवलंबन करू नये.

ऋत अमृत, मृत प्रमृत इत्यादि वृत्ति कशाला म्हणतात ? त्याचा अर्थ काय ? त्याचा अर्थ असा आहे.

ऋत उञ्छशिल ज्ञेय अमृत स्यादयाचितम् ।
मृत तु याचित भैक्ष प्रमृत कर्षण स्मृतम् ॥

शेतींतून शेतकऱ्यानें काढून नेल्यानंतर तेथें जें जमिनीवर पडलेलें असतें ते गोळा करून त्यावर निर्वाह करणें याला ' उञ्छ ' म्हणतात धान्याचीं कणसें गोळा करून निर्वाह करणें याला ' शिल ' वृत्ति म्हणतात. या दोन्हीं वृत्तींना ' ऋत ' वृत्ति नाव आहे. कोणाकडे न मागता मिळेल त्यावर निर्वाह करणं त्याला ' अमृत ' वृत्ति म्हणतात. भिक्षा मागून निर्वाह करणें याला ' मृत ' वृत्ति म्हणतात आणि शेतीला ' प्रमृत ' वृत्ति म्हणतात

यापुढ त्यानें म्हटलें आहे .—

सत्यानृत तु वाणिज्य तेन चैवापि जीव्यते ।
सेवा श्ववृत्तिराख्याता तस्मात् ता परिवर्जयेत् ॥

वाणिज्याचे नाव ' सत्यानृत ' वृत्ति आहे. तिनें निर्वाह केला तर चालेल, परंतु सेवा, चाकरी हिला श्ववृत्ति म्हणतात. ती मात्र सर्वतोपरी त्याज्य

याप्रमाणें मनुस्मृतीमध्यें उपजीविका करण्याचे जे तीन उपाय शेती, व्यापार आणि नोकरी यामध्यें शेतीला प्रमुख स्थान दिलेलें आहे. परंतु आजच्या समाजाचा दृष्टिकोन याच्या अगदीं उलटा आहे. आज नोकरीला सर्वांत-

मानाचें स्थान दिलें गेलें आहे आणि शेतीला निकृष्ट समजण्यात आलें आहे. हें च सध्याच्या समाजाच्या दुःखाचें आणि दुर्दशेचें मूळ कारण आहे.

परशुरामानें हिंसेचा आश्रय करून एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली. नंतर जेव्हां त्याला आपली चूक समजून आली तेव्हां त्यानें शस्त्राचा त्याग केला आणि तो शेतीच्या कामाला लागला. त्यावरून द्रोहरहित निर्वाहाचें साधन शेती हें च आहे हें तिचें महत्त्व सूचित होतें.

## ( ६९ ) सर्वांना च जमीन मिळण्याचा हक्क आहे

ज्या व्यक्तीला उपजीविकेचें दुसरें साधन नाहीं ती व्यक्ति जर शेतीचें काम जाणत असेल आणि आपल्या हातानें शेती करूं इच्छीत असेल तर तिला जमीन मिळण्याचा हक्क आहे ही गोष्ट समजून घेणें कठीण नाहीं. परंतु विनोबांनीं देशापुढें आणि सर्व जगापुढें हि असा महान् दावा उपस्थित केला आहे कीं, उपजीविकेकरितां दुसरें काहीं साधन असो वा नसो, प्रत्येक व्यक्तीला जर आपल्या हातानें शेती करण्याची इच्छा असेल तर त्याला काहीं ना काहीं जमीन मिळण्याचा हक्क आहे. वर वर पाहिलें तर हा दावा युक्तिवादाला धरून नाहीं असें वाटेल, परंतु विनोबांनीं या हक्कासंबंधीं जें सांगितलें आहे त्याचा गंभीरपणे विचार केल्यास समजून येईल कीं, त्यांचा हा दावा भक्कम पायावर आधारलेला आहे. हा नैतिक अधिकार असणें का जरूर आहे ह्यासंबंधीं विनोबा म्हणतात

( १ ) शेतीचें श्रम हे सर्वोत्तम शरीरश्रम आणि श्रेष्ठ उद्योग आहे. त्यांत स्वाभाविक आणि जीवनप्रद व्यायाम होतो. शेतकी ही सर्वोत्तम श्रम आणि श्रेष्ठ उद्योग कशी आहे यासंबंधीं पूर्वीं विवेचन केलें आहे. ज्या कारणाकरितां शेतकी ही सर्वोत्तम शरीरश्रम मानली गेली आहे त्या कारणाकरितां च जो कोणी व्यक्ति आपल्या हातानें शेती करूं इच्छीत असेल तर त्याला थोडी का होईना पण जमिनीची व्यवस्था न करणें उचित होणार नाहीं. माणूस या नात्यानें च त्याला हा नैतिक अधिकार आहे.

( २ ) अन्न-उत्पादनाचें जमीन हें एकमात्र साधन आहे आणि ती मौलिक उत्पादनाचें हि मुख्य क्षेत्र आहे. अर्थात् जमिनीच्या आणि शेतीच्या

उन्नतीकरिता सगळ्यानीं लक्ष दिलें पाहिजे आणि प्रयत्न हि केला पाहिजे. सगळ्याचे हात जर जमिनीला लागतील तर सगळ्याच्या बुद्धीचा हि तिला लाभ होईल.

( ३ ) जीवनविकासाकरिता शेती ही अपरिहार्य आहे. म्हणून उपजीविके-करिता जर कोणी दुसरें काम करीत असतील तर करोत, परतु त्यानीं थोडा वेळ तरी रोज नियमितपणें शेतात काम करणे योग्य होईल. विनोबा जेव्हा रोज न थाबता आठ तास विणाईचें काम करीत होते तेव्हा त्याना तीव्रपणें अनुभवाला येई कीं, आठ तास वाकून बसता बसता त्याची मान, पाठीचा कणा आणि कबर वाकून जाई आणि तिला आपल्या स्वाभाविक अवस्थेत आणताना फार त्रास होई. म्हणून ते म्हणतात कीं, कोष्टी, सुतार, कुभार वगैरे ग्रामोद्योग करणाऱ्या लोकानीं आपआपलें उपजीविकेचें काम करावें खरें, परतु त्याना हि रोज दोन चार तास शेतात काम करण्याची सधि मिळावी. नाहीं तर त्याचें काम आनद-दायक, जीवनदायी आणि अधिक उत्पादन करणारें होणार नाहीं. इतर उद्योग करणाऱ्या लोकासबधीं ही च गोष्ट आहे. शेतकऱ्यानें ज्याप्रमाणें शेतात काम करणें योग्य त्याप्रमाणें न्यायाधिशानीं हि थोडा वेळ शेतात काम करणें आवश्यक आहे.

म्हणून विनोबा म्हणतात, "कोणाला लिहायाचायला आलें नाहीं तर त्याच्या जीवनाचा विकास झाला नाहीं असें समजलें जातें. म्हणून देशात साक्षर लोक किती आहेत याची गणना होते. परतु त्याऐवजीं शेतामध्यें किती लोक काम करितात याची च गणना करणें अवश्य आहे.

## ( ७० ) लोकसंख्येची वाढ आणि अन्नधान्य उत्पादन

भारतात लोकसख्या फार जलद वाढत आहे. त्यामुळें अन्नधान्याचा प्रश्न कायमचा सोडविणें कठीण आहे. या शकेनें नियोजनसमिति आणि अनेक शहाणे लोक Family planning अर्थात् सततिनियोजन करावें असें सुचवितात. हा विषय गभीरपणें समजून घेणें जरूर आहे. सध्याच्या खानेसुमारीच्या विवरणावरून दिसून येतें कीं, दर हजार व्यक्तींच्या मागें दरवर्षीं चाळीस मुलें जन्माला येतात. हें जन्माचें प्रमाण जगात सर्वांपेक्षा

जास्त आहे. मृत्यूचें प्रमाण हि येथें सर्वापेक्षा जास्त च, म्हणजे हजारीं दरवर्षी सत्तावीस असें आहे. ह्या जास्त जन्ममृत्यूच्या प्रमाणाचें वास्तविक कारण काय आहे ? जीवशास्त्राचा असा साधारण नियम आहे कीं, ज्या भागात, ज्या देशात किंवा ज्या वर्गात जितकें जास्त दारिद्य असेल तेथें जनसंख्येचें हि प्रमाण जास्त असतें. दारिद्र्यामुळें, पोषणाच्या अभावामुळें च जन्माचें प्रमाण वाढते असें म्हणतात. साधारणपणें ही गोष्ट सत्य आहे यात संशय नाहीं. कृत्रिम उपायानीं संततिनियमन करणें ह्यात मोठा नैतिक दोष आहे ही गोष्ट बाजूस ठेवून जरी विचार केला तरी समजून येईल कीं, सध्याच्या स्थितींत संतति नियमनाचा प्रचार करणें विशेष लाभदायी होणार नाहीं. ज्या गरीब वर्गाकरिता संतति नियमनाची जास्त आवश्यकता आहे त्याच्यापर्यंत संततिनियमनाचा प्रचार पोहोंचू शकत नाहीं आणि पोंचला तरी त्याचें सध्याचें शिक्षण आणि संस्कार याच्या परिस्थितींत संतति-नियमन स्वीकारलें जाणार नाहीं, असें वाटतें. आणि दुसऱ्या पक्षीं ज्याना संतति-नियमनाची आवश्यकता नाहीं ते या चळवळीमुळें संततिनियमनाच्या कृत्रिम उपायाचें अवलंबन करून नैतिक अवनतीकडे घसरू लागतात. संयम-पालन करून ज्याना यात यश आलें आहे अशल्या विवाहित स्त्री पुरुषानीं गरीब लोकामध्यें जाऊन त्याना संयम करण्याचा जर उपदेश केला तर च याला चागलें फळ मिळेल एकाचाचें हि संयमित जीवन पाहून दुसऱ्याला हि त्याप्रमाणें वागण्याची प्रेरणा मिळेल. जन्माचें प्रमाण कमी करण्याचा सर्वांत उत्तम उपाय म्हणजे लौकरात लौकर दारिद्य दूर करण्याची व्यवस्था करणें हा च होय. जमिनीचें योग्य वाटप आणि ग्रामोद्योगाचें पुनरुज्जीवन याच्यामुळें च तें शक्य आहे. सध्याच्या परिस्थितींत ह्या दोन उपायाचें तातडतोब अवलंबन केलें तर च भारतातलें दारिद्य कमी होईल. म्हणून भूदान यज्ञाच्या यशस्वितेकरिता अधिक च निष्ठेनें प्रयत्न करणें जरूर आहे.

लोकसंख्या वाढल्यामुळें भरपूर अन्नधान्य मिळणार नाहीं अशी सरोगर च शंका कोणाला वाटते काय ? अशी शंका घ्यायला कारण आहे असें वाटत नाहीं. ज्यानें सृष्टि निर्माण केली आहे तो त्याने अन्न हि निर्माण करील च असें म्हणणें ही आंधळी समजूत आहे असें म्हणून चालणार नाहीं. प्रत्यक्ष अनुभवानें ही गोष्ट सत्य आहे असें दिसून आलें आहे.

भारताची लोकसंख्या वाढूं लागली होती अशा वेळीं पाश्चात्य विज्ञानाचा विकास होऊन कृत्रिम नीळ तयार करायला येऊं लागल्यामुळें भारतातल्या मोठ्या भागातली निळीची शेती बंद होऊन जास्त अन्नधान्य उत्पादन करण्याची व्यवस्था झाली. कोणास माहीत लोकसंख्येचा दाब आणखी वाढेल, त्या वेळीं ज्यूट लावण्याचें कांहीं कारण राहणार नाहीं आणि भारतातली कोट्यवधि तागाची जमीन अन्नधान्य उत्पादनाकरिता मोकळी होईल. सध्या कित्येक देशांत कागदाच्या व कापडाच्या थैल्या बारदानाकरिता वापरण्यांत येऊं लागल्या आहेत. सध्या च कृत्रिम बारदान कांहीं ठिकाणीं बनविण्यांत येऊं लागलें आहे आणि तागाची आवश्यकता उरलेली नाहीं. ही गोष्ट वर सांगितलेल्या शक्यतेची सूचना च करीत नाहीं का? आग्नेय आशियाच्या मोठ्या प्रदेशांतल्या खराब्या शेतीसंबंधीं असें च म्हणता येईल. असा एक काळ येईल कीं, त्या वेळीं खराब्या शेतीची मुळीं च जरूरी भासणार नाहीं. म्हणून अन्नधान्य कमी पडेल या भीतीनें संततिनियमनाची काळजी करण्याचें विशेष कारण नाहीं.

लोकसंख्येचा दाब कमी करण्याकरिता संततिनियमन करण्याचा जो प्रचार चालू आहे त्यासंबंधीं विनोबा म्हणतात, "तुम्हीं Family Planning म्हणजे संततिनियमनाचा ठराव केला आहे, अर्थात् तुम्ही मुलें कमी जन्माला येण्याची खटपट करा असें म्हणत आहां. असें आम्हांला सांगण्याचा तुम्हांला काय अधिकार आहे? तुम्हीं आमचे नोकर आहां कीं मालक? जपान किंवा इंग्लंडमध्यें जमिनीवर लोकसंख्येचा जो भार आहे त्यापेक्षा किती तरी कमी भारतातल्या जमिनीवर आहे, लोकसंख्या का वाढत आहे याचा विचार तुम्हीं कधीं केला आहे का? सिंहाला एक दोन च छावे होतात आणि शेळ्या मेंढ्यांना पिलें व्हायला सुमार नसतो. लोकसंख्येचा खरा प्रतिकार संततिनियमनानें होणार नाहीं. जीवन योग्य मार्गानें घालविणें हा च त्याचा खरा उपाय आहे."

## (७१) ही परिस्थिति असह्य आहे

बिहारमधला जमिनीचा प्रश्न सुटला तरी दुसऱ्या प्रांतांतलें काम तर शिल्लक च राहील. तेव्हां त्याकरिता काय करायला पाहिजे या प्रश्नाचें उत्तर

देताना विनोबा म्हणतात, "बिहारचा प्रश्न सुटल्यानंतर दुसऱ्या प्रदेशातले लोक गप्प बसतील असें समजणें चुकीचें आहे. एक तर तेथले सरकार कायदा करील, नाहीं तर कार्यकर्ते कामाला लागतील. यापैकीं काहीं च झालें नाहीं तर लोक जबरदस्ती करतील आणि तेथें रक्तपात होऊन क्रांति घडेल. असली क्रांति घडून आली तरी मला दुःख होणार नाहीं. कारण सध्याची अवस्था असह्य आहे. अशा ठिकाणीं जर रक्तरंजित क्रांति झाली तर ती थांबवायला जाणारे आम्ही कोण! आज जी परिस्थिति आहे ती आम्ही केव्हा हि सहन करायला तयार नाहीं." पण विनोबांना विश्वास आहे कीं, बिहारमध्यें जर जमिनीचा प्रश्न सुटेल तर दुसऱ्या प्रदेशांत हिंसक क्रांति घडून येण्याला अवसरच राहणार नाहीं. म्हणून ते यासंबंधीं म्हणतात, "आज जगाची अवस्था अशी आहे कीं, एखाद्या कोपऱ्यात हि काहीं गोष्ट घडली कीं तिचा सर्वत्र प्रसार होऊन जातो. जेव्हा काश्मीर राजानें राज्य सोडून दिलें तेव्हा दुसऱ्या सर्व राज्यांचीं शासनें डळमळू लागलीं. जेव्हा आंध्र राज्य निर्माण करण्यात आलें तेव्हा त्याचा दुसऱ्या प्रांतावर हि प्रभाव पडला. प्राचीन काळीं अशी परिस्थिति नव्हती. सध्या तर एका ठिकाणचा प्रभाव दुसऱ्या ठिकाणीं झाल्याशिवाय राहत नाहीं. म्हणून आमची येथली सेना जर यशस्वी होईल तर ती सेना च दिग्विजय करायला बाहेर पडेल. आमची ही सेना अशी प्रभावशाली होईल कीं ती यशस्वी होईल च होईल." म्हणून ते दुसऱ्या प्रदेशातल्या *कार्यकर्त्यांना सांगत आहेत कीं, त्यांनीं आपआपल्या* प्रदेशात सर्वत्र अनुकूल हवा निर्माण करीत रहावें. शिवाय प्रदेशातलें एखादें विशिष्ट स्थान निवडून घेऊन त्या ठिकाणीं विशेष जोर लावून काम पूर्ण करावें म्हणजे त्याचा सर्व च देशावर प्रभाव पडेल. अशा स्थानाला त्यांनीं 'स्ट्रॅटेजिक पॉइंट' असें नाव दिलें आहे. एके ठिकाणीं सर्वांनीं मिळून आत्यंतिक निष्ठेनें आणि शक्ति केंद्रित करून काम यशस्वी करण्याकरिता प्राणपणानें झटलें पाहिजे. याची प्रतिक्रिया सर्व प्रदेशात दृग्गोचर होईल ही दृष्टि ठेवून बिहारमध्यें गया जिल्हा निवडला गेला आणि त्यावर सर्व शक्ति केंद्रित करून काम करण्यात आलें. त्याचा प्रभाव सर्व प्रदेशात आशातीत झालेला दिसून आला आहे.

बाह्य जीवनात विषमता आणि भेद कांहीं अर्थी राहिले तरी समता स्थापन करणें हें आमचें ध्येय राहील च. मुलें ल्हान आहेत तोंपर्यंत त्याना आश्रित ठेवणें हें आईबापाचें कर्तव्य आहे परंतु जेव्हा तीं तरुण होतात तेव्हा त्याना स्वातंत्र्य देणें, फार झालें तर उपदेश देणें, हें त्याचें कर्तव्य होय. आणि आईबाप जेव्हा वृद्ध होतील तेव्हा त्यानीं मुलाच्या तंत्रानें वागणं हें च त्याचें कर्तव्य होतें. ह्याप्रमाणें बाह्य धर्म बदलत असतो. परंतु मुलावरतीं प्रेम करणें, त्याची सेवा करणें, हा आईबापाचा तीन्ही काळीं सारखा च धर्म आहे. म्हणून मुलावर प्रेम करण हा सनातन धर्म आहे. त्या च प्रमाणें समाजाच्या परिस्थितींत बदल झाला तर त्याच्या बाह्यधर्मांत परिवर्तन होईल समाज बाल्यावस्थेंत होता त्या वेळीं राजाची आवश्यकता होती. त्या काळीं प्रजेवर अनुशासन करणें राजाचा धर्म होता आणि राजाची आज्ञा पाळणें प्रजेचा धर्म होता. परंतु आता समाज तसा बाल्यावस्थेंत नाहीं. म्हणून राजाचें काम संपलें आहे. आता लोकांच्या प्रतिनिधींच्या हातांत राज्य चालविण्याची सत्ता आली आहे. आता 'राजा कालस्य कारणम्' नाहीं. 'प्रजा कालस्य कारणम्' झाली आहे. पूर्वीच्या काळीं सम्राटाला किंवा विद्वान् पंडिताला जें ज्ञान नव्हतें तें ज्ञान आता विज्ञानाच्या उन्नतीमुळें सामान्य लोकाना हि आहे अमेरिका ही काय वस्तु आहे आणि मॉस्को कोठें आहे हें अकबर बादशहाला माहीत नव्हतें. शाळेंतलीं पोरें हि आज ही गोष्ट जाणतात परंतु सर्व समाजाला एकरूप करून सोडणें आणि समाजांत अधिक समानता आणणें हें मूलतत्त्व दोन्ही काळीं समान राहिलेलें आहे. समानता आणण्याकरितां प्राचीन काळीं जमीन वाटपाची आवश्यकता नव्हती, कारण त्या वेळीं वाटेल तितकी जमीन पडली होती आणि लोकसंख्या थोडी होती. परंतु आता जमीन वाटपाची आवश्यकता आहे.

## ( ७२ ) युगधर्म

भूदान यज्ञ युगधर्म आहे युगधर्माचा अर्थ काय आणि भूदानयज्ञाला युगधर्म मानणें का उचित आहे हें नीट प्रकारें समजून घेणें जरूर आहे. तें समजलें तर भूदान यज्ञाला विशेष प्रेरणा मिळेल. देशामध्यें एखाद्या काळीं

## (७४) स्वधर्म आणि नित्य व नैमित्तिक धर्म

भूदान यज्ञाचा संकल्प यशस्वी करावयाचा असेल तर त्याच्यावर च सर्व लक्ष केंद्रित करून आत्मसमर्पण करणें जरूर आहे. कार्यकर्त्यांनीं भूदान यज्ञ हा ' स्वधर्म ' आहे असें मानून त्यात अनन्यभावें आत्मसमर्पण करावें अशी विनोबांची इच्छा आहे. ज्यानीं भूदान यज्ञात भूमिदान केलें आहे ते भूदान यज्ञाचे सेवक, कार्यकर्ते समजले पाहिजेत. गरीब शेतकरी, ज्यानीं भूमिदान केलें ते तर भूदान यज्ञाचे सैनिक च समजले पाहिजेत म्हणून ' स्वधर्म ' कोणता हें सर्वांनीं च समजून घेणें जरूर आहे. आपला स्वधर्म कोणता याचा शोध प्रत्येकानें आपल्या अंतःकरणात करावा. नित्यधर्म आणि नैमित्तिक धर्म यामध्यें काय फरक आहे हें हि समजून घ्यावें. ' स्वधर्म, नित्यधर्म आणि नैमित्तिक धर्म ' याचें विवेचन करताना कार्यकर्त्यांना उद्देशून विनोबा म्हणतात, " कित्येक वेळा आपण संसाराच्या चिंतेंत च इतके गुरफटून गेलेले असतों कीं, त्यामुळें दुसरें काहीं काम करायला आपल्याला वेळ उरत नाहीं. म्हणून आपल्याला आपल्या सामर्थ्याची एवढी च मर्यादा आहे असें समजून समाधान मानून घ्यावें लागतें घरातल्या कामारेरीज आपल्याला काहीं सामाजिक कार्य केलें पाहिजे त्याकरिता आपण जरी काहीं नवीन काम हातीं घेऊ शकत नसलों, तरी सध्या हातात असलेल्या कार्याची नवीन कामाशीं तुलना करून कोणतें अधिक जरूरीचें आहे हें पाहिलें पाहिजे नवीन कामाचें महत्त्व जर विशेष ज्यास्ती नसेल तर जुनें काम सोडण्य इष्ट नाहीं. धर्माचें आचरण करताना जो धर्म श्रेष्ठ तो ग्रहण करायचा आणि जो लहान तो सोडायचा अशी गोष्ट असत नाहीं परंतु असा विचार करून पाहणें जरूर आहे कीं, जें काम आपल्या हातात आहे तें लहान असो किंवा मोठें असो, तो आपला ' स्वधर्म ' आहे कीं नाहीं. जर आपण अशा निर्णयाला आलों कीं, जें काम आम्ही करीत आहोंत तो च आमचा ' स्वधर्म ' आहे तर आम्हीं तें च काम करीत राहणें उचित आहे. ज्याचा ' स्वधर्म ' वेगळा त्यानीं आमच्या कामात भाग घेणें त्याचें कर्तव्य नाहीं. त्यामुळें त्यानीं दुःखित होणें हि उचित नाहीं त्यानीं आमच्या कामात सहानुभूति ठेवली

तरी तें पुरेसं आहे. परंतु आत्मनिरीक्षण करून जर आम्हाला वाटलें कीं, आमची बुद्धि या नवीन कार्याला मौलिक कार्य म्हणून मानीत आहे, असें असेल तर दुसऱ्या कोणत्या हि कामाचा भार आमच्या माथ्यावर असला तरी तो विचारपूर्वक बाजूला सारला पाहिजे, आणि या नवीन कामात उडी घेतली पाहिजे. या कामीं असा विचार करणें योग्य न हे कीं, जें काम आमच्या हातीं आहे त्याचें काय होईल ? ह्या स्थितींत असा मनात निश्चय होऊन जाईल कीं, हें काम च मौलिक काम आहे या काळचें हें काम च 'युगधर्म' आहे. 'युगधर्म' हा 'नैमित्तिक' असतो. तो चाळीस पन्नास वर्षेंपर्यंत चालणार नाहीं परंतु त्या काळचा तो असतो त्या वेळीं 'नित्यधर्म' त्याच्यापुढे निष्प्रभ होऊन जातो. या कामाचें महत्त्व त्या वेळीं सर्वांत जास्त असतें आम्ही रोज प्रार्थना करतों हा 'नित्यधर्म' आहे परंतु त्या वेळीं जर कोठें आग लागली तर प्रार्थना अर्धवट टाकून आपल्याला आग विझवायला गेलें पाहिजे कारण नैमित्तिक धर्म बलवान् असतो. ज्या नैमित्तिक धर्माबद्दल आपल्या मनात कसल्या हि प्रकारचा संशय राहिलेला नसतो त्याकरिता जर आपल्याला नित्य धर्म सोडावा लागत असेल तर सोडला पाहिजे" आणखी एका ठिकाणीं ते या बाबतीं म्हणतात, "रशिया आणि चीन या देशात हिंसेनें जें साधलें तें आम्ही येथें अहिंसेच्या मार्गानें करीत आहों. केवळ एवढें च नाहीं तर या कार्यांतून आम्ही गांधीविचाराचा हि प्रसार करीत आहों. अहिंसेनें समाज बदलून टाकायचा हें महान् कार्य आहे. याच्यासारखें दुसरें कार्य आज नाहीं. दुष्काळपीडितांची सेवा करणें वगैरे दुसरीं सर्व कामें हें नित्याचें काम आहे परंतु भूदानाचें काम 'युगधर्माचें' महान् नैमित्तिक कार्य आहे. समजा, आम्ही सध्या करीत बसलों आहोंत, अशा वेळीं गावात कोठें आग लागली तर सध्या सोडून आम्ही तिकडे तातडीनें धावत जाऊं. प्रार्थनेचें महत्त्व कमी नाहीं तें रोजचें काम आहे परंतु आग विझवायचें काम नैमित्तिक आहे. कारण तें विशेष परिस्थितींतून उद्भवत असतें तशीं तर मोठमोठीं कामें पुष्कळ आहेत. परंतु तुलना करून पाहता या कामाचें महत्त्व सर्वांत मोठें आहे. हें समजून सर्वजण या कामाला लागतील तर सर्व

जगात आपण क्रांति करू शकू. मी गणित जाणणारा आहे. प्रत्येक शब्द वजन करून बोलत आहे."

## (७५) परमधर्म

भूदान यज्ञाच्या कामात जीवनदान देण्याकरिता आवाहन करण्यात आलें आहे. कार्यकर्त्यांनीं आपला सर्व काळ आणि सर्व शक्ति या कामाला लावावी असें म्हटलें गेलें आहे. असे कित्येक कार्यकर्ते आहेत कीं, जे अनेक वर्षांपासून विधायक कार्य च करीत आलेले आहेत. ते म्हणतील कीं, ज्या कामात ते पडलेले आहेत ते पुण्यकार्य च आहे. जें कार्य ते अनेक वर्षे करीत आलेले आहेत ते च करीत राहणें त्यांचा धर्म आहे. भूदान यज्ञ हें श्रेष्ठ कार्य आहे असें म्हटलें जातें, परंतु ते जें सेवाकार्य करीत आलेले आहेत तें गीतेच्या म्हणण्याप्रमाणें त्यांचा 'स्वधर्म' आहे. 'स्वधर्म' गौण असला तरी तो सोडणें योग्य नाहीं. उलट परधर्म श्रेष्ठ असला तरी स्वीकारणें उचित नाहीं. म्हणून श्रेष्ठ कनिष्ठ विचार या ठिकाणीं उद्‌भवत च नाहीं. जें कार्य ते करीत आलेले आहेत आणि जें करणें त्यांचें कर्तव्य आहे तें च करीत राहणें त्यांना उचित आहे. याप्रमाणें जे बोलतात त्यांना समजावून देताना विनोबा म्हणतात, "धर्मविचाराला हि एक सीमा असते. श्रीकृष्णानें सर्व जीवनभर शस्त्र घेऊन युद्ध केलें, पण एक काळ आला तेव्हा त्यानें घोषणा केली कीं, आपण यापुढें शस्त्र धारण करणार नाहीं, नि शस्त्र राहीन. याप्रमाणें जो सतत शस्त्राचा व्यवहार करीत होता, त्यानें च आपण आता कधीं शस्त्र धरणार नाहीं अशी घोषणा केली म्हणून त्यानें आपल्या धर्माचा त्याग केला असे होत नाहीं. उलट, त्यानें आपला धर्म एक पायरी उंच चढविला असें होतें. ज्याला आम्ही पुण्यकार्य किंवा धर्मकार्य म्हणतों तें एका मर्यादेपर्यंत आत्मविकासाला साहाय्यक असतें. परंतु त्याच्यापुढें तें विकासाच्या मार्गांत अडचण होऊन बसतें. म्हणून शास्त्रात म्हटलें आहे : "धर्मोऽपि मुमुक्षूणा पाप उच्यते।" मुमुक्षूच्या बाबतींत धर्म हि पापात परिणत होतो."

कर्तव्याची भावना ही कित्येक वेळीं विघ्नकारक होऊन बसते. म्हणून विनोबा म्हणतात, "तुळशीदास रामायणात लिहिलें आहे कीं, लक्ष्मणाच्या

पुढे अशा तऱ्हेची एक समस्या उभी राहिली होती. राम वनवासाला जाताना लक्ष्मणाला म्हणाला की, मातापित्यांची सेवा करणे त्याचे कर्तव्य आहे. रामाचे हे सांगणे लक्ष्मणाने जर मानलें असतें आणि वाल्मिकीने असें लिहिलें असतें कीं, लक्ष्मण आईबापांची सेवा करण्याकरिता घरीं राहिला तर त्याला दोष देईल असा कोण आहे? आम्हीं तर असे म्हटलें असतें कीं, रामाबरोबर वनात जायचा लोभ लक्ष्मणानें आवरून धरला आणि तो मातापित्यांच्या सेवेंत मग्न झाला. या ठिकाणीं स्वधर्माचा प्रश्न उभा राहतो. तसा स्वधर्माचा प्रश्न लक्ष्मणाचे पुढें उभा होता. परंतु तो रामाला म्हणाला, "तुम्ही म्हणता ते ठीक आहे, परंतु या मोठमोठ्या गोष्टी मला समजत नाहींत. मी तर लहान बालक आहे. आपल्या प्रेमावर च पोसलों आहे. म्हणून तुम्ही जें सांगत आहा त्या तऱ्हेचें धर्माचरण माझ्या हातून होणार नाही. असें म्हणून तो रामाबरोबर च वनात गेला. लहान लहान धर्म असतात खरे, परंतु परमधर्म एक च असतो. ज्या ठिकाणीं दोन्ही हि सामान्य, क्षुद्र धर्म असतील त्या वेळीं त्या दोघामध्यें तुलना करता येईल. परंतु ज्या ठिकाणीं एक क्षुद्र धर्म आहे आणि दुसरा 'परम' धर्म आहे त्या ठिकाणीं तुलना होऊ च शकत नाहीं. ज्या ठिकाणीं दोन्ही धर्म सामान्य असतात त्या ठिकाणीं स्वधर्माचा प्रश्न उत्पन्न होतो आणि त्या ठिकाणीं स्वधर्म गौण असला आणि परधर्म श्रेष्ठ असला तरी स्वधर्म आचरला पाहिजे. परंतु ज्या ठिकाणीं परम धर्म आणि स्वधर्म हे दोन्ही हि उपस्थित होतात त्या ठिकाणीं असा निर्णय करता येत नाहीं. अशा वेळीं परमधर्माला च श्रेष्ठ मानलें पाहिजे."

परमधर्माचा विषय आणखी हि स्पष्ट करण्याकरिता विनोबा म्हणतात, "परमधर्माचें आचरण करण्याकरिता स्वधर्माला च परमधर्माच्या साच्यात घातलें पाहिजे. असें साच्यात घालणें शक्य नसेल तर स्वधर्माचा त्याग केला पाहिजे. उच्च धर्म अर्थात् परमधर्म पुढे उभा राहिला तर स्वधर्माचा त्याग करावा च लागतो. त्या वेळीं स्वधर्मामागें लागणें ठीक नाहीं. म्हणून आचरणाकरिता स्वधर्माला च परमधर्माच्या साच्यात बसवून घ्या अथवा स्वधर्माचा त्याग करा; हें च धर्माचें रहस्य आहे." भारतात कोणत्या हि सामाजिक क्षेत्रात जे कोणी सेवाकार्यात मग्न आहेत त्यांनीं जर तटस्थपणें

विचार केला तर त्याना स्पष्टपणें समजून येईल की भूदान-यज्ञ हा परमधर्म आहे. म्हणून त्यानीं आपल्या कामाला भूदान-यज्ञाच्या साच्यात तरी घालावें किंवा तें सोडून देऊन सपूर्णपणें भूदान यज्ञात पडावें म्हणजे त्यानीं परमधर्म पालन केला असें होईल.

## (७६) पूर्वजन्माचा दारिद्र्याशीं संबंध

कोणी कोणी म्हणतात कीं, मनुष्यानें पूर्वजन्मीं केलेल्या कर्मांमुळे तो श्रीमत वा गरीब होत असतो. म्हणून गरिबाचें दारिद्य दूर करण्याची खटपट करणें, तसें च भूमिहीनाना भूमि देणें व्यर्थ आहे. कारण पूर्वजन्मींच्या पाप-पुण्याचें फळ भोगल्याशिवाय सुटणें शक्य नाहीं. त्याना त्याच्या दैवावर च सोडून देणें योग्य आहे. धर्माचा अर्थ विकृत केल्यामुळे च असें म्हटले जातें. श्रीमत लोकानीं च आपली सपत्ति आपल्याजवळ सुरक्षित रहावी म्हणून जे खोटे युक्तिवाद रचले आहेत त्यापैकीं हा एक आहे समाजाच्या आर्थिक दुर्व्यवस्थेमुळें दारिद्य निर्माण झालें आहे आणि तें क्रमाक्रमानें वाढत आहे. याचें विवेचन पूर्वी केलें आहे. म्हणून पूर्वजन्मीं केलेल्या काहीं वाईट कर्मांचें फळ म्हणून मनुष्याला दारिद्य आलें आहे ही कल्पना करणें अन्याय्य आणि विवेकाला सोडून आहे. शास्त्र म्हणतें, जो पापकर्म करतो त्याला आसुरी योनीमध्यें जन्म येतो. आसुरी योनीचा अर्थ मनुष्याहून वेगळी जीवयोनि. अर्थात् वाघ, साप वगैरे.

द्वेषी क्रूर तसे पापी ससारीं हीन जे जन।
त्यास मी टाकितों नित्य तशा योनींत आसुरी॥

अर्थात् नीच, द्वेषपरायण, क्रूर, अमगळकारी, नराधम वगैरेंना या जगातल्या अत्यत आसुरी योनींमध्यें मी पुन्हा पुन्हा टाकीत असतों. शास्त्राची गोष्ट सोडली तरी श्रीमत आणि गरीब या दोघामध्यें सज्जन लोक आहेत आणि असज्जन लोक आहेत. विनोबा म्हणतात, "पूर्वजन्माच्या पाप-पुण्यामुळें माणूस या जन्मीं गरीब किंवा श्रीमत होतो ही कल्पना चुकीची आहे. पूर्वजन्माच्या पुण्याचें फळ सुबुद्धि आणि निरहकारिता आहे आणि पूर्वजन्मींच्या पापाचें फळ दुष्ट बुद्धि आणि वाईट काम करण्याची प्रवृत्ति हें आहे. आपल्यात सुबुद्धि असेल तर समजावें कीं पूर्वजन्मीं आपण पुण्यकर्म

केलें आहे आणि जर यापुढें काम करण्याची इच्छा होत असेल तर आम्हीं पूर्वजन्मीं पाप च केलें आहे." ते आणखी म्हणतात, "वाईट कर्मानें फळ दारिद्र्य आणि चांगल्या कर्मानें फळ श्रीमंती असें होत नाहीं. शंकराचार्यांचा जन्म गरीब कुळांत झाला. त्यावरून म्हणावें का कीं त्यांनीं पूर्वजन्मीं पाप केलें होतें? पाप आणि पुण्याचे परिणाम दारिद्र्य आणि श्रीमंती नाहीं. पूर्वजन्मींच्या पापानें फळ कुबुद्धि आणि पुण्याचें फळ सुबुद्धि. शास्त्र म्हणतें, ज्यानें चांगलें कार्य केलें आहे तो दुसऱ्या जन्मीं पवित्र कुळांत जन्माला येतो आणि जे जास्त पुण्यवान् आहेत त्यांना तर योग्यांच्या कुळांत जन्म येतो. आणि योगी तर गरीब च असतात. म्हणून पूर्वजन्मीं पाप केलें कीं पुण्य केलें हें आपल्याला कुबुद्धि किंवा सुबुद्धि आहे यावरून ओळखतां येईल. परंतु आपल्या देशांत तत्त्वज्ञानाचा अतिशय चुकीचा उपयोग झाला आहे. एक संन्यासी तर मला एथपर्यंत म्हणाला कीं, रोग्याची सेवा करणें चुकीचें आहे कारण रोगी माणूस तर आपलें प्रारब्ध भोगीत आहे आणि आपण सेवा करून त्याचें प्रारब्ध भोगणें अर्धवट टाकीत आहों. हें ऐकून मी तर आश्चर्यचकित झालों. मी त्याला उत्तर दिलें, 'सर्वांना आपआपलें प्रारब्ध भोगायचें आहे. आमच्या सेवेमुळे त्याच्या प्रारब्धावर कांहीं प्रभाव पडणार नाहीं. प्रारब्ध इतकें बलवान् असतें कीं, तें आपल्या बळावर च चालत राहतें. परंतु आमचा धर्म सेवा करणें हा आहे. म्हणून आम्हीं तर सेवा करीत च राहिलें पाहिजे. भगवान् जर आम्हांला गरीब किंवा श्रीमंत राखीत असेल तर ते आमची परीक्षा करण्याकरितां च. जीवन ही एक परीक्षा च आहे. म्हणून पूर्वजन्माची गोष्ट काढून गरिबांची सेवा न करणें हें चुकीचें आहे.'

## (७७) कलियुगांत हें शक्य आहे काय?

लोक म्हणतात हें कलियुग आहे. हें सर्व या युगांत होणें शक्य आहे का? त्यावर विनोबा म्हणतात, "ज्या श्रावस्तीमध्यें बुद्ध भगवानाच्या मंदिराकरितां जमिनीची जरूरी आहे असा प्रचार करून जमीन मिळाली त्या च श्रावस्ती नगरीमध्यें माझ्यासारख्या क्षुद्र, भगवान् बुद्धाच्या तुलनेनें ज्याला कांहीं अस्तित्व च नाहीं, अशा माणसाला या कलियुगांत च शंभर एकर

जमीन मिळाली आहे. त्यावरून ओळखा कीं, हें कलियुग आहे का सत्य युग ?" यासबधीं आणखी एका ठिकाणीं ते म्हणतात, "त्रेतायुगात रावणाचा जन्म झाला आणि द्वापारयुगात दु:शासनाचा, परतु या कलियुगात श्रीचैतन्य, श्रीरामकृष्ण, म. गाधी वगैरे महापुरुष जन्माला आले. युगामुळे आम्हाला स्वरुप मिळत नाहीं. आम्ही च युगाचे रुप ठरविणारे 'कालपुरुष' आहों. आम्ही चेतन म्हणून ही सर्व जड सृष्टि आमच्या हातात आहे. आम्हीं मातीला कोणता हि आकार दिला तरी त्याबद्दल तिला तक्रार करता येत नाहीं. आजचा काळ इतका उच्च आणि पवित्र आहे कीं, आम्हीं इतिहासात पूर्वीं कधीं हि घडली नाहीं अशी घटना या च काळात आमच्या स्वत:च्या डोळ्यानीं पाहिली. इतिहासात आजपर्यंत केव्हा तरी स्वातन्त्र्ययुद्ध अहिंसामार्गानें चालविलें होतें का ? म्हणून, बधु हो, भलते च विचार मनात आणू नका. आज आमच्या डोळ्यासमोर सत्ययुग येत आहे आणि तें अत्यत तीव्र वेगानें येत आहे. लोक म्हणतात महायुद्ध येत आहे. मी म्हणतों येऊ दे. जितकीं महायुद्धें येतील तीं जगाला शिक्षण च देतील कीं, महायुद्धानुळें जगातला कोणचा हि प्रश्न सुटत नाहीं. आपण सर्वांनीं महायुद्धाचें स्वागत च करावे; कारण मग साऱ्या दुनियेला आमच्याकडे यावें लागेल आणि म्हणावे लागेल कीं, "आम्ही हरलों, आम्हाला अहिंसेचा मार्ग दाखवा." त्यानीं यासबधीं आणखी एका ठिकाणीं म्हटलें आहे, "ज्यानें दान देण्याचें कबूल केलें नाहीं असा एक हि माणूस आजपर्यंत मला भेटला नाहीं. याचा अर्थ मी असा समजतों कीं, सत्ययुग येत आहे. पुराणात चार युगाचें वर्णन आहे आणि प्रत्येक युगाच्या कालाची मर्यादा हि ठरविली आहे असें म्हणतात परतु या चार युगाच्या मधल्या काळात हि दुसरीं युगें येऊ शकतात. ज्याप्रमाणे दिवसा उजेड आणि रात्रीं अध:कार असतो, ज्याप्रमाणें देहामध्यें श्वास आणि उच्छ्वास नेहमीं चालत असतो, ज्याप्रमाणें नेहमीं चद्राचा क्षय होतो आणि वृद्धि होते, त्याप्रमाणें च एका एका युगामध्यें दुसरे हि युग येण्याची आशा करता येईल. आता कलियुग असेल, असो. परतु या कलियुगामध्यें सत्ययुग येऊ शकतें आणि आता सत्ययुग चालू असतें तर त्याच्यामध्ये कलियुग हि येऊ शकलें असतें. पुराणात आपल्याला दिसून येतें कीं, श्रीरामाच्या युगात रावणासारखा राक्षस होता आणि या

कलियुगात हि असत्य सत जन्माला आले याचा अर्थ असा की, युग हें नावापुरतें असते. ज्योतिषाप्रमाणे तें चालतें. परतु जसा भाव असेल त्याप्रमाणें एका युगात च चार हि युगें येत असतात आणि साधारणत. पाहिलें तर सत्ययुग च सर्वांत जास्त रहात असतें. कलीचा अर्थ एक. त्याच्या दुप्पट द्वापारयुग त्याच्या तिप्पट त्रेतायुग आणि चौपट सत्ययुग असतें संस्कृता-मध्यें कलीचा अर्थ 'एक', द्वापारचा अर्थ 'दोन', त्रेताचा अर्थ 'तीन', सत्याचा अर्थ 'चार' असे आहेत याचा अर्थ असा की, कलियुगापेक्षा सत्ययुगाची शक्ति चौपट जास्त आहे मधेमधें कलि जोर करीत असतो, परतु सत्य अधिक बलवान् आहे.

## (७८) मध्यम वर्गाचा प्रश्न कसा सुटेल ?

विनोबा जेव्हा बिहारच्या मानभूम जिल्ह्यात फिरत होते तेव्हा एका गृहस्थानें त्याना म्हटलें की, तुम्ही गरिबाचा प्रश्न सोडविण्याकरिता खटपट करीत आहात परतु मध्यम वर्गातल्या लोकाची अवस्था त्याच्याहून खराब आहे म्हणून विनोबानीं त्याच्याकरिता काहीं करावें. गरिबाची स्थिति एक-प्रकारें बरी आहे. कारण ते हातानें काम करू शकतात आणि शरीरश्रम करण्याची आणि गरिबीनें निर्वाह करण्याची हि त्याना सवय असते परतु मध्यम वर्गातल्या लोकाची स्थिति फार च कठीण आहे. कारण ते काहीं उत्पादक काम करतील असं काहीं साधन त्याचे हातात नाहीं आणि दुसरे पक्षीं श्रीमताचे हातीं पैसा असतो तसा त्याच्याजवळ असत नाहीं म्हणून त्याची अत्यत दुर्दशा झाली आहे. विनोबानीं त्याना उत्तर दिलें, "आम्ही भूमिहीनाला तर जमीन देऊ च, परतु मध्यम वर्गातल्या कोणी हि जमीन मागितली तर त्याला हि देऊ. परतु त्याला च ही मुष्कील आहे कीं, तो स्वत च्या हातानें शेती करणार नाहीं आणि तो जर स्वत परिश्रम करणार नाहीं तर त्याला जमीन देऊन काहीं लाभ नाहीं. आपल्यातल्या मध्यम वर्गातल्या लोकाची अशी दुर्दशा होण्याचें कारण ते लोक काहीं उत्पादनाचें काम जाणत नाहींत हें आहे. ही गोष्ट दुरुस्त करण्याचा उपाय हा आहे कीं, आज जें शिक्षण दिलें जात आहे त्यात परिवर्तन करणें. मीं असें ऐकलं आहे कीं, पश्चिम बंगालमध्ये या वर्षी एक हजाराहून अधिक मुलींनी

बी. ए. ची परीक्षा दिली. जेव्हा मुलींची संख्या एवढी मोठी आहे तेव्हा पुरुषांची संख्या त्याहून अधिक मोठी असावी. या बी ओ. लोकाना कोठें पेरावें म्हणजे त्याच्यापासून पीक येईल? त्याचें फळ मात्र हे आहे कीं, हे सर्वजण बेकार होणार आहेत. त्यांचा अभिमान मोठा असतो म्हणून ते असतुष्ट असतात त्याना खर्च करायची सवय लागते, परतु मिळवण्याची शक्ति असत नाहीं आणि जर नवरा बायको दोघें हि विद्वान् असतील आणि तीं दोघें विद्वान् संसार करू लागतात तेव्हा तो मोडून पडतो. जर दोघापैकीं एकजण अशिक्षित असेल तर संसार ठीक चालतो. पण आजकाल तर दोघें हि जण बी. ओ पास होऊ इच्छितात. ही च आपली स्थिति आहे मध्यम वर्गाची दु स्थिति सुधारायची असेल तर शिक्षणात सुधारणा केली पाहिजे म्हणून म. गांधी असें शिकवून गेले आहेत कीं, जें काहीं शिक्षण द्यावयाचें असेल त्या शिक्षणात उद्योगाचा अतर्भाव असावा, एवढें च नाहीं तर उद्योगातून च शिक्षण दिलें जावे असे झालें पाहिजे कीं, अमुक एक बी. ओ. पास झाला आहे खरा परतु विणाईचें काम करीत आहे. अमुक जण एम्. ए झाला आहे पण शेतीचें काम करीत आहे. अमुक जण बी. ओस्सी. न्हाव्याचें काम करतो आणि आपआपल्या विद्येचा उपयोग ता आपआपल्या कामात करीत आहे. याप्रमाणें विद्या आणि काम जर एकत्र जोडली गेलीं तर सुशिक्षितामध्यें बेकारी राहणार नाहीं आणि भारताची उन्नति होईल तेव्हा त्याना जर माझ्याकडून जमीन पाहिजे असेल तर त्याना मी जरूर जमीन देईन. ते जर या जमिनींत शेती करतील तर सुखी होतील. म्हणून मध्यम वर्गातल्या लोकाना कोणाला जमीन पाहिजे असल आणि ते स्वत शेती करू इच्छीत असतील तर त्याना हि मी जमीन देईन

"काशीमध्यें काहीं वैदिक ब्राह्मणानीं मजजवळ जमीन मागितली. मीं त्याना विचारलें, आपण स्वत शेती कराल की दुसऱ्याकडून करवून घ्याल? ते म्हणाले, 'आम्ही स्वत च जमीन करू. शेती करणें वैदिक ऋषींचा धर्म होता.' हें ऐकून मला फार आनद झाला मी म्हणालो, आपल्याला पाच एकर जमीन देईन आणि ही जमीन देण्याची व्यवस्था हि केली शिकलेले

मध्यम वर्गांतले लोक मान अजून हि विशेष प्रमाणात शेतात काम करण्याकरिता पुढे येत नाहीत. जे लोक दुसरा कसला-उद्योग करू इच्छितात त्यांना जमीन मिळणार नाही. परंतु ज्यांना दुसरा उद्योग नाही आणि जे शेतींत काम करायला तयार आहेत त्यांना जमीन दिली जाईल च; मग ते मध्यम वर्गांतले असोत या दुसऱ्या वर्गांतले असोत.

## ( ७९ ) सर्वोदय समाजाचें एकक

गाव हें युनिट धरून त्या पायावर सर्वोदय स्थापन करण्याची कल्पना केलेली आहे. गाव हें युनिट का धरण्यात आलें ? अर्थात् विनोबांच्या भाषेत ग्रामराज्य स्थापन करण्याची कल्पना का करण्यात आली हें नीटपणें समजून घेणें जरूर आहे. तसें केलें म्हणजे सर्वोदयाचें स्वरूप आणि तें साध्य करण्याची पद्धति यासंबंधीं आपल्याला स्पष्ट कल्पना येईल. त्याचीं कारणें हीं आहेत.

( १ ) सर्वोदयसमाजाची व्यवस्था ही सर्वांगीण व्यवस्था आहे. जीवन हें अविभाज्य असतें. जीवनातला काहीं भाग कमी करून सर्वोदयाची कल्पना करणें शक्य नाहीं. नैतिक, आर्थिक, सामाजिक आणि राजकीय अशा सर्व क्षेत्रात समता स्थापन करणें हे सर्वोदयाचें ध्येय आहे. आत्म्याचें एकत्व यांतून च समतेचा प्रवाह निघतो हें मागें सांगितलें आहे. कुटुंबामध्यें हें समतेचें ध्येय स्थापन झालें आहे. कुटुंबामध्यें आई आणि मूल, बाप आणि मुलगा, पति आणि पत्नी यांच्यामध्यें एकतेची जाणीव असते. कुटुंबामध्यें कोणाची किती हि योग्यता असो, सगळ्यांच्या जीवनाचें मान एकसारखें च असतें. कुटुंबामध्यें मनुष्याला जें एकतेचें आणि समतेचें शिक्षण मिळतें तें च शिक्षण सर्व समाजात पसरायचें हा सर्वोदयाचा उद्देश आहे. कुटुंब सोडलें तर समाजात गावातला माणूस च आपल्याला सर्वांत जवळचा असतो. म्हणून एकतेची जाणीव कुटुंबापासून शेजाऱ्यापर्यंत अर्थात् गावापर्यंत वाढविणें मनुष्याला सर्वांत सुलभ होईल.

( २ ) शासनमुक्त समाजव्यवस्था स्थापन करण्याकरता सत्तेचें विकेंद्रीकरण करणें आवश्यक आहे. राष्ट्रातले सर्व प्रकारचे प्रश्न गावापुढें हि उभे राहू शकतात आणि उभे राहतात हि. शिवाय सामाजिक जीवनाच्या क्षेत्रात

गाव च मानल्यास त्याच्या बरोबर आहे. म्हणून विकेंद्रीकरणाची शेवटची मर्यादा म्हणून गाव हें च ठरविण्यात आलें आहे.

(३) आर्थिक व्यवस्थेंत हि शक्य आहे तितकें विकेंद्रीकरण करणें अवश्य आहे. जे उद्योग विकेंद्रित करता येतील ते सर्व गाव स्वयंपूर्ण करण्याच्या दृष्टीनें ग्रामोद्योग म्हणून चालविता येणें शक्य नाहीं. पण पुष्कळसे उद्योग ग्रामोद्योग म्हणून चालविता येतील. जसें, वस्त्रस्वावलंबनाच्या दृष्टीनें सूतकताई आणि विणाई हा ग्रामोद्योग होईल. पण कागद करण्यासारखे उद्योग प्रत्येक घरीं करणें सोयीचें होणार नाहीं असे सर्व उद्योग ग्रामोद्योग म्हणून चालतील. म्हणून आर्थिक क्षेत्रांत विकेंद्रीकरण करण्याकरिता गाव हें युनिट ठरविण्यात आलें आहे.

(४) केंद्रित व्यवस्थेमध्यें मोठी काहीं चूक झाली तर त्याचा परिणाम सर्व समाजावर आणि देशावर होतो. म्हणून व्यवस्थेचें क्षेत्र शक्य तितकें संकुचित केलें तर एखाद्या ठिकाणी चूक झाली तर समाजाचें किंवा देशाचें दुसरें काहीं नुकसान होत नाहीं या दृष्टीनें प्रत्येक गावानें आपलें नियोजन करून घेतलें तर त्या गावच्या योजनेंत काहीं चूक झाली असेल तर त्यांत फक्त त्या गावचें च नुकसान होईल. दुसऱ्या कोणत्या गावाचें काहीं वाईट होणार नाहीं. उलट, यांच्या चुकीपासून दुसरे लोक धडा घेऊ शकतील.

(५) प्राचीन काळीं गाव हें च आर्थिक आणि राजकीय व्यवस्थेचें केंद्र होतें. गावपंचायतीकडून आर्थिक आणि राजकीय काम चालविलें जात असे. अजून हि लोकांना त्या काळची आठवण आहे. अर्थात् ऐतिहासिक दृष्टीनें हि गाव हें च युनिट ठरविणें योग्य आहे आणि लोकांना पटणारें हि आहे.

(६) स्वातंत्र्य मिळण्यापूर्वीं नवीन समाजरचनेकरिता जें काहीं विधायक काम चालत होतें तें स्वातंत्र्याच्या चळवळीमार्फत च चालत असे. स्वातंत्र्य संपादन करणें ही च त्या युगाची मागणी होती. स्वातंत्र्यांदोलन हा च तेव्हां युगधर्म होता. म्हणून नवीन समाजरचनेची खटपट त्याच्या मार्फत च करण्याऐवजी दुसऱ्या एखाद्या मार्गाचें अवलंबन करून चाललें नसतें. आतां काळ बदलला आहे. सध्याच्या युगाची मागणी,

मध्यम वर्गातले लोक मात्र अजून हि विशेष प्रमाणात शेतात काम करण्याकरिता पुढें येत नाहींत. जे लोक दुसरा कसला उद्योग करूं इच्छितात त्याना जमीन मिळणार नाहीं. परतु ज्याना दुसरा उद्योग नाहीं आणि जे शेतींत काम करायला तयार आहेत त्याना जमीन दिली जाईल च, मग ते मध्यम वर्गातले असोत या दुसऱ्या वर्गातले असोत.

## ( ७९ ) सर्वोदय समाजाचें एकक

गाव हें युनिट धरून त्या पायावर सर्वोदय स्थापन करण्याची कल्पना केलेली आहे. गाव हें युनिट का धरण्यात आलें ? अर्थात् विनोबाच्या भाषेंत ग्रामराज्य स्थापन करण्याची कल्पना का करण्यात आली हें नीटपणें समजून घेणें जरूर आहे. तसें केलें म्हणजे सर्वोदयाचें स्वरूप आणि तें साध्य करण्याची पद्धति यासबंधीं आपल्याला स्पष्ट कल्पना येईल. त्याचीं कारणें हीं आहेत.

( १ ) सर्वोदयसमाजाची व्यवस्था ही सर्वांगीण व्यवस्था आहे. जीवन हें अविभाज्य असतें. जीवनातला काहीं भाग कमी करून सर्वोदयाची कल्पना करणें शक्य नाहीं. नैतिक, आर्थिक, सामाजिक आणि राजकीय अशा सर्व क्षेत्रात समता स्थापन करणें हें सर्वोदयाचें ध्येय आहे आत्म्याचें एकत्व मानून च समतेचा प्रवाह निघतो हें मागें सांगितलें आहे. कुटुंबामध्यें हें समतेचें ध्येय स्थापन झालें आहे. कुटुंबामध्यें आई आणि मूल, बाप आणि मुलगा, पति आणि पत्नी याच्यामध्यें एकतेची जाणीव असते. कुटुंबामध्यें कोणाची किती हि योग्यता असो, सगळ्याच्या जीवनाचें मान एकसारखें च असतें. कुटुंबामध्यें मनुष्याला जे एकतेचें आणि समतेचें शिक्षण मिळतें तें च शिक्षण सर्व समाजात पसरायचें हा सर्वोदयाचा उद्देश आहे. कुटुंब सोडलें तर समाजात गावातला माणूस च आपल्याला सर्वांत जवळचा असतो. म्हणून एकतेची जाणीव कुटुंबापासून शेजाऱ्यापर्यंत अर्थात् गावापर्यंत वाढविणें मनुष्याला सर्वांत सुलभ होईल.

( २ ) शासनमुक्त समाजव्यवस्था स्थापन करण्याकरता सत्तेचें विकेंद्रीकरण करणें आवश्यक आहे. राष्ट्रातले सर्व प्रकारचे प्रश्न गावापुढें हि उभे राहू शकतात आणि उभे राहतात हि. शिवाय सामाजिक जीवनाच्या क्षेत्रात

गाव च सगळ्यात खालच्या थरावर आहे. म्हणून विकेंद्रीकरणाची शेवटची मर्यादा म्हणून गाव हे च ठरविण्यात आलें आहे.

( ३ ) आर्थिक व्यवस्थेत हि शक्य आहे तितकें विकेंद्रीकरण करणें अवश्य आहे. जे उद्योग विकेंद्रित करता येतील ते सर्व गाव स्वयपूर्ण करण्याच्या दृष्टीनें गृहोद्योग म्हणून चालविता येणें शक्य नाहीं. पण पुष्कळसे उद्योग ग्रामोद्योग म्हणून चालविता येतील. जसें, वस्त्रस्वावलम्बनाच्या दृष्टीनें सूतकताई आणि विणाई हा गृहोद्योग होईल. पण कागद करण्यासारखे उद्योग प्रत्येक घरीं करणें सोयीचें होणार नाहीं असले सर्व उद्योग ग्रामोद्योग म्हणून चालतील. म्हणून आर्थिक क्षेत्रात विकेंद्रीकरण करण्याकरिता गाव हें युनिट ठरविण्यात आलें आहे.

( ४ ) केंद्रित व्यवस्थेमध्यें कोठें काहीं चूक झाली तर त्याचा परिणाम सर्व समाजावर आणि देशावर होतो. म्हणून व्यवस्थेचें क्षेत्र शक्य तितकें सकुचित केलें तर एखाद्या ठिकाणीं चूक झाली तर समाजाचें किंवा देशाचें दुसरें काहीं नुकसान होत नाहीं या दृष्टीनें प्रत्येक गावानें आपलें नियोजन करून घेतलें तर त्या गावच्या योजनेंत काहीं चूक झाली असेल तर त्यात फक्त त्या गावचें च नुकसान होईल. दुसऱ्या कोणत्या गावाचें काहीं वाईट होणार नाहीं. उलट, त्याच्या चुकीपासून दुसरे लोक धडा घेऊ शकतील.

( ५ ) प्राचीन काळीं गाव हें च आर्थिक आणि राजकीय व्यवस्थेचें केंद्र होतें. गावपचायतीकडून आर्थिक आणि राजकीय काम चालविलें जात असे. अजून हि लोकाना त्या काळची आठवण आहे. अर्थात् ऐतिहासिक दृष्टीनें हि गाव हें च युनिट ठरविणें योग्य आहे आणि लोकाना पटणारें हि आहे.

( ६ ) स्वातंत्र्य मिळण्यापूर्वीं नवीन समाजरचनेरिता जे काहीं विधायक काम चालत होतें तें स्वातंत्र्याच्या चळवळीमार्फत च चालत असे. स्वातंत्र्य सपादन करणें ही च त्या युगाची मागणी होती. स्वातंत्र्यादोलन हा च तेव्हा युगधर्म होता. म्हणून नवीन समाजरचनेची खटपट त्याच्या मार्फत च करण्याऐवजीं दुसऱ्या एखाद्या मार्गाचें अवलंबन करून चाल्लें नसतें. आता काळ बदलला आहे. सध्याच्या युगाची मागणी,

जमिनीची समान वाटणी आणि समता स्थापन ही आहे. म्हणून भूदान यज्ञ आंदोलनाच्या मार्फत च सर्वोदय स्थापनेची चळवळ करण्याची संधि आलेली आहे. आमच्या ध्येयाकडे जाण्याकरिता आपल्याला नवीन साधन मिळालें आहे.

## (८०) सर्वोदय सूत्र

बुद्धगया संमेलनात श्री. जयप्रकाश नारायण यांनी जीवनदानाकरितां जेव्हा आवाहन केलें तेव्हा त्यांना विनोबांनीं आपलें स्वतःचें जीवन समर्पणाची घोषणा करून एक पत्र लिहिलें होतें. कशाकरिता ते जीवन समर्पण करीत आहेत ही गोष्ट त्यांनीं चार शब्दात व्यक्त केली होती. ते शब्द असेः— 'भूदान यज्ञमूलक, ग्रामोद्योगप्रधान, अहिंसक क्रांति' या चार शब्दात एक महान् सूत्र रचलें गेलें आहे. सूत्रकारानें त्यामध्यें सर्वोदयाचा अर्थात् नवीन समाजाच्या रचनेचा पाया, स्वरूप, साधन आणि उद्देश वर्णन केले आहेत. या सूत्राचें स्पष्टीकरण करतांना विनोबा म्हणतात, "पहिला शब्द भूदान-यज्ञ. हा आधार आहे आणि शेवटचा शब्द क्रांति ध्येय आहे. दुसरा शब्द ग्रामोद्योगप्रधान हें त्याचें स्वरूप असून तिसरा शब्द अहिंसा हें साध्य करण्याचा उपाय आहे" क्रांति शब्दाची व्याख्या पूर्वी केली आहे. दुसरे तीन शब्द वापरण्याचा उद्देश काय याचें विवेचन करणें जरूर आहे. त्यायोगें सर्वोदयाचा पाया, त्याचें स्वरूप आणि तो साध्य करण्याचा उपाय यासंबंधीं स्पष्ट कल्पना येईल.

**(क) भूदान-यज्ञमूलक** :— (१) सध्याच्या समाजविकृतीचें मूळ कारण आहे शोषण. केंद्रित उत्पादनाच्या व्यवस्थेमुळें समाजात शोषण चालतें. जमिनीच्या बाबतींत हि ही च व्यवस्था चालत आहे. जमिनींतून जें उत्पादन होते तें मौलिक उत्पादन असतें. अर्थात् अन्य ज्या वस्तु निर्माण केल्या जातात त्या प्राय. जमिनींतून उत्पन्न झालेल्या वस्तूंतून च उत्पन्न केल्या जातात शोषण बंद करावयाचें असेल तर मूळ उत्पादनाच्या क्षेत्रात च प्रथम विकेंद्रीकरण केलें पाहिजे. म्हणून भूदान-यज्ञानें नवीन समाजरचनेचा पाया म्हणून घरोघरीं जमीन-वाटपाची प्रथम व्यवस्था केली जात आहे.

( २ ) सध्याच्या परिस्थितीच्या कारणानें जमिनीचा प्रश्न सर्वापेक्षा आवश्यक झाला आहे. जमिनीचें पुन्हा वाटप ही या युगाची मागणी आहे, हा युगधर्म आहे. परंतु भूमिदान मिळवणें आणि जमीन वाटणें एवढ्याने काम संपणार नाहीं. जमिनीबरोबर च ग्रामोद्योगाची व्यवस्था केली पाहिजे. जमीन वाटल्यानंतर ग्रामोद्योगाची व्यवस्था करणें सुलभ होईल आणि त्याकरिता अनुकूल दशा हि निर्माण होईल.

(ख) '**ग्रामोद्योगप्रधान**' :— भारतातल्या दारिद्याचा प्रश्न केवळ जमीन वाटपानें सुटणें शक्य नाहीं. त्याला पूरक उद्योग, घरात करण्यासारखें एखादें काम पाहिजे. कर्तृत्व विभाजन झालें नाहीं तर आर्थिक समता स्थापन करणें शक्य नाहीं. उद्योगाच्या विकेंद्रीकरणाशिवाय आर्थिक क्षेत्रात कर्तृत्व विभाजन करता येणार नाहीं. शिवाय, सर्वोदयाच्या ध्येयामध्यें कोणत्या हि प्रकारचें काम असो, त्याचें आर्थिक मूल्य समान असलें पाहिजे आणि सर्वांना काम मिळालें पाहिजे. विकेंद्रित उत्पादनामुळें किंवा उद्योगामुळें ( १ ) प्रत्येकाला काम मिळू शकतें, ( २ ) त्यामध्यें कामाचा प्रकार आणि स्वभाव वेगळा असला तरी त्याचें आर्थिक मूल्य सारखें च होऊन जातें. आर्थिक क्षेत्रात समता स्थापन झाली नाहीं तर समाजात हि साम्यप्रतिष्ठा करणें संभवनीय नाहीं म्हणून सर्वोदय समाजरचनेमध्यें ग्रामोद्योगाला प्रधान स्थान देणें आवश्यक आहे. यासबंधी विनोबा म्हणतात, "रामनाम घेताना आपण फक्त 'राम' एवढें च म्हणत नाहीं, 'सीताराम' असें म्हणतो. याचा अर्थ असा कीं जमिनीच्या वाटपाबरोबर च आम्हाला ग्रामोद्योग हि पाहिजेत. लोक अनेकदा म्हणतात, ग्रामोद्योगाने बनविलेल्या वस्तूची किंमत जास्त असते. परंतु खरी गोष्ट अशी आहे कीं, मनुष्याचें उपजिविकेचें साधन हरण करून, त्याला बेकार करून, त्याला भुकेला राखून, कारखाने ज्या वस्तू उत्पन्न करतात त्या वस्तू स्वस्त नाहींत, उलट अत्यंत महाग आहेत. जर बेकाराना खायला घालायची जबाबदारी कारखान्यांवर टाकली तर गिरणीत होणाऱ्या वस्तूची किंमत अत्यंत महाग होईल. कारखान्यामध्यें उत्पादन सुलभ व्हावें म्हणून जो खर्च केला जातो त्याचा हिशोब केला तर गिरणीत उत्पन्न झालेल्या वस्तू स्वस्त नाहींत, महाग आहेत. फार श्रम करून जी वस्तु बनविली जाते तिच्यापेक्षा जी वस्तु चोरून आणलेली असते ती

विस्तांना स्वस्त असते च विष फार स्वस्त असतें आणि अमृताचें मूल्य फार जास्त असतें म्हणून या कोणी विष विकत घेईल ?

आता प्रश्न असा की, समाजाच्या सध्याच्या स्थितींत मोठीं यंत्रें अर्थात् केंद्रित उद्योग पूर्णपणे टाळता येणें शक्य आहे का ? तें शक्य नाहीं तरी पण कोणते केंद्रित उद्योग घ्यावे आणि ते कोणत्या नियमानीं ठरवावे या-संबंधीं विनोबानीं आपल्या एका प्रार्थनोत्तर भाषणात विवेचन केलें आहे त्याला सर्वोदयाची आर्थिक योजना किंवा नियोजन म्हणता येईल ते म्हणतात, " यंत्रें तीन प्रकारचीं असतात, समयसाधक, सहारक आणि उत्पादक (१) मी समयसाधक यंत्राच्या विरोधी नाहीं आगगाडी किंवा विमान यासारख्या यंत्रानीं उत्पादनात वाढ होत नाहीं खरी, परंतु वेळ वाचतो. दहा हजार घोडे असले तरी ते एका विमानाबरोबर चढाओढ करू शकणार नाहींत म्हणून आम्हाला अशा तऱ्हेचें समयसाधक यंत्र पाहिजे (२) तोफा, बंदुका, बॉंब वगैरेसारख्या सहारक यंत्राला अहिंसक नियोजनात स्थान नाहीं म्हणून असलीं यंत्रें आम्हाला नकोत (३) उत्पादक यंत्रें दोन प्रकारचीं असतात पूरक व मारक ज्या ठिकाणीं लोकसंख्या अधिक आणि एखादें यंत्र लोकांना बेकार करीत असेल तर त्याला मारक यंत्र म्हटलें पाहिजे परंतु ज्या ठिकाणीं मनुष्यबळ कमी आणि काम जास्ती त्या ठिकाणीं तें यंत्र मारक नाहीं, उलट पूरक होईल एका ठिकाणीं जें यंत्र पूरक होतें तें दुसऱ्या देशात मारक होईल भारतात ट्रॅक्टरसारखें यंत्र आणलें तर त्याच्या योगानें भयंकर बेकारी वाढेल परंतु अमेरिका, रशिया वगैरे देशात ट्रॅक्टरसारखीं यंत्रें मारक नाहींत त्या ठिकाणीं उत्पादक म्हणून गणलीं जातील याप्रमाणें एका वेळीं एक यंत्र पूरक असेल तें च दुसऱ्या काळीं मारक होऊन जाईल.

देश, काल आणि परिस्थिति याना अनुसरून कोणतें यंत्र पूरक आहे आणि कोणतें मारक आहे हें ठरेल अर्थात् यंत्र म्हटलें कीं लगे च त्यावर आसक्ति ठेवणें किंवा त्याला विरोध करणें उचित नाहीं यंत्राची उपयोगिता काय आहे याचा विचार करून च आपण तें ग्रहण केलें पाहिजे, पण आपण जर यंत्रावर आसक्ति ठेवू आणि म्हणू कीं गिरणीबरोबर चढाओढ करण्यासारखें उपयोगी यंत्र ग्रामोद्योगात नाहीं म्हणून आम्ही त्याचा उपयोग करणार नाहीं, या पद्धतीनें जे देशाचा विचार करीत असतात

त्याचा हा विचार योग्य नाही. पाश्चात्य देशात एक गोष्ट चालत आहे म्हणून च केवळ आपण तिच्या फेऱ्यात आणि घोऱ्यात सापडून असे म्हणत आहों. म्हणून च गांधीजींनी आपल्याला या बाबतींत सावध होण्याचा इशारा दिला आहे की, आपण चूक करीत आहों. मी पाहिले आहे की, ज्या ठिकाणीं आम्ही समतेच्या गोष्टी करीत असतों त्या च ठिकाणीं त्याला विरोधक अशा विषमतेच्या गोष्टी करीत असतों. पण हे योग्य नाही. हे लोक इफिशिअन्सी (Efficiency) किंवा कार्यक्षमतेची गोष्ट पुढें मांडतात. ते म्हणतात, " तुम्ही समतावादी परंतु आम्ही क्षमतावादी आहों. याप्रमाणें ते एका गुणाच्या विरुद्ध दुसरा गुण उभा करतात. याच्यामुळें दोहोंमध्यें विरोध चालतो. आजकाल भांडवलवाले कार्यक्षमतेचा शब्द उठवीत आहेत. आम्हाला हि क्षमता पाहिजे परंतु कुटुंबातल्या कांहीं लोकांना खायला मिळेल आणि कांहीं लोक उपाशी राहतील ही गोष्ट आम्हाला नको आहे. सगळ्यांना खायला मिळालें पाहिजे हे आम्हाला पाहिजे. सध्याच्या परिस्थितींत ग्रामोद्योगातलें यंत्र सगळ्यांच्या अन्नाची व्यवस्था करू शकत असेल तर तें च घेतलें पाहिजे कांहीं लोकांच्या स्वार्थाकरिता उरलेल्या लोकांना बेकार राखून केंद्रित यंत्र कधीं हि 'कार्यक्षम' असल्याचा दावा करू शकत नाहीं.

" भारतामध्ये आज उत्पादन अत्यंत कमी आणि बेकारी अत्यंत जास्त आहे. या कारणामुळें च असंतोष निर्माण झालेला आहे आणि तो कोणती ना कोणती संधि मिळाल्यावर उफाळून निघतो याचा प्रतिकार करण्याकरिता कांहीं तरी केलें च पाहिजे. असंतोष शांत करण्याकरिता खटपट केली पाहिजे गांधीजींची कार्यपद्धति अशी होती कीं, ज्या गोष्टीची जास्त आवश्यकता असेल तिला ते जास्त साहाय्य देत. कवि दुरुायल म्हणतात कीं, साहाय्य करण्याचा क्रम असा असावा प्रथम भुकेलेल्याला, मग दु:खी माणसाला, आणि शेवटीं सुखी माणसाला. परंतु आज तर त्याच्या बरोबर उलट क्रम चालला आहे. म्हणून ज्याला सर्वांपेक्षा ज्यास्त जरूरी आहे त्याला साहाय्य करण्याचा काय उपाय करावा याची गांधीजी सर्वदा चिंता करीत असत. ही चिंता करीत असतानाच त्यांना चरख्याचा शोध लागला. ही त्यांची अद्भुत प्रतिभा आहे. ही त्यांची काव्यशक्ति आहे. केवळ कांहीं पुनर्रचना करणी

म्हणजे पाहिजे कवि होत नाही. व्यास म्हणतात, 'कविः क्रान्तदर्शी' ज्याला भातिसारक दृष्टि आहे, जो दूरदर्शी आणि सूक्ष्मदर्शी आहे तो च कवि या अर्थानें गांधीजी हि कवि होते. त्यांनीं किती तरी वर्षांपूर्वी सांगून दिलें आहे कीं, हिंदुस्थानकरिता ग्रामोद्योगांची अत्यंत आवश्यकता आहे. त्यांनी मूलोद्योगी शिक्षण, राष्ट्रभाषा, जमिनीचें पुन्हा वाटप, वगैरे गोष्टी किती तरी वर्षांपूर्वी च योजून ठेविल्या आहेत. हे त्यांचे आपल्यावर केवढे उपकार आहेत! त्यांची केवढी महान् बुद्धिमत्ता! केवढी प्रतिभा आणि हृदयांत केवढें वात्सल्य! त्यांनीं आमच्याकरिता किती तरी केलें आहे. आम्हाला त्यांच्यावरून प्रकाश मिळाला आहे. तरी आज आम्ही डगळ-मंगळ करीत आहों इतके आम्ही अभागी आहों.

स्वावलंबनाच्या दृष्टीनें मनुष्याच्या जीवनधारणेला आवश्यक असणाऱ्या गोष्टी मिळविण्याकरिता अन्न आणि वस्त्र एका घरांत च जरी बनविणें शक्य नसलें तरी त्यांचें उत्पादन गावांत तरी झालें पाहिजे. शिवाय ज्या वस्तू-करिता लागणारा कच्चा माल गावांत उत्पन्न होतो, आणि त्याचा पक्का माल गावांत च करणें जेथपर्यंत शक्य आहे, तेथपर्यंत पक्का माल गावांत च करून तो बाहेर पाठविला पाहिजे. ज्याप्रमाणें सूर्यमंडळांत सूर्य हा केंद्रस्वरूप आणि प्रधान आहे त्याप्रमाणें ग्रामोद्योगरूपी सूर्यमंडळांत खादीला सूर्याचें स्थान आहे. खादीला केंद्र करून च इतर ग्रामोद्योगांची रचना केली पाहिजे. म्हणून म. गांधींनीं सर्व आयुष्यभर लोकांना समजावून दिलें आहे कीं, त्यांनीं आपल्या कापडाकरिता स्वतः सूत कातावें आणि जे सूत कातू शकत नाहींत त्यांनीं खादी विकत घेऊन वापरावी. परंतु स्वातंत्र्यप्राप्तीनंतर अनेक लोक म्हणत आहेत, 'स्वातंत्र्यप्राप्तीकरिता खादीची आवश्यकता होती, आतां तिची काय जरूरी आहे?' त्यासंबंधीं विनोबा म्हणतात, 'असें म्हणणाऱ्यांची बुद्धि भ्रष्ट झाली आहे. स्वातंत्र्य सुदृढ करण्याकरिता आणि त्याचें संरक्षण करण्याकरिता खादी आणि ग्रामोद्योग अपरिहार्य आहेत. खादी बनविणें जर प्रस्थापित करतां आलें नाहीं तर दुसरे कोणते हि ग्रामोद्योग चालू करणें आणि गावचें दारिद्र्य हि दूर करणें शक्य नाहीं. खेडेगांव श्रीमंत लोकांच्या आणि गिरणीमालकांच्या घशांत जाईल आणि त्यामुळें खेडेगावांतल्या लोकांचे स्वतंत्र जीवन नष्ट होईल. गावाची स्वतंत्रता

नष्ट झाली तर त्या योगानें देशाचें स्वातंत्र्य नष्ट होण्याचा मार्ग हि मोकळा होईल.' म्हणून जे खादी वापरीत नाहींत त्यांना विनोबांनी अनुरोध केला आहे कीं, त्यांनी खादी विकत घ्यावी आणि गिरणीच्या कापडापेक्षा खादीची किंमत जेवढी ज्यास्त पडली असेल तेवढे गरिबासाठीं गुप्त दान केलें आहे असें समजावें ते म्हणतात, "चार रुपयांची खादी वापरा दोन रुपये तरी गिरणीच्या कापडाला लागतीलच. उरलेले दोन रुपये दानधर्मांत खर्च झाले असें समजून घ्या. हिशोब लिहीत असाल तर कापडखातीं दोन रुपये लिहा आणि दानधर्माच्या खातीं दोन रुपये लिहा. देशातल्या आई बहिणींना वाचवायचें असेल तर काहीं धर्म तर करायला पाहिजे. असला दानधर्म कराल तर गरीब बेकार राहणार नाहींत. पितामह भीष्म म्हणतात, 'दरिद्रान् भर कौंतेय मा प्रयच्छेश्वरे धनम् ।' अर्थात् गरिबाला पैसा द्या, श्रीमंताला देऊ नका."

सर्वांनीं उत्पादक श्रम करावे आणि सर्वांना उत्पादक श्रम करण्याची संधि मिळावी ही ग्रामोद्योगाची मूळ गोष्ट आहे परंतु केवळ 'उत्पादक श्रम' म्हणणें बरोबर होणार नाहीं कारण मोठ्या कारखान्यात जे श्रम करण्यात येत आहेत आणि ज्यामुळे कोट्यवधि लोक बेकार होत आहेत ते हि उत्पादक श्रम आहेत. कापडाच्या गिरण्या आणि तांदळाच्या गिरण्या यामधें मजूर लोक जे श्रम करीत आहेत ते हि उत्पादक श्रम च आहेत. म्हणून ग्रामोद्योगात केलेल्या उत्पादक श्रमाला विनोबांनीं 'द्रोहरहित' हें विशेषण दिलें आहे. बेकारी उत्पन्न करणाऱ्या कारखान्यात केलेल्या श्रमामधे व ग्रामोद्योगातल्या उत्पादक श्रमामधे हा फरक आहे एकाचे श्रम द्रोहरहित म्हणजे दुसऱ्याचें काहीं अनिष्ट न करणारे आहेत आणि गिरणींतले श्रम 'द्रोहकारी' आहेत.

आमची समाजरचना 'ग्रामोद्योगप्रधान' होईल विनोबांनीं याचें असें स्पष्टीकरण केलें आहे कीं, "'प्रधान' म्हणण्याचें कारण असें कीं, गौण-रूपानें आणखी हि कित्येक विषय त्यात असतील. उदाहरणार्थ नई तालीम, राष्ट्रभाषा, समाजात साम्यप्रतिष्ठा वगैरे. म. गांधींनीं सांगितलेली अठरा

विधायक कार्य हि त्यात गौणस्थान घेतील. त्याशिवाय परिस्थितीप्रमाणें आणखी हि कित्येक गोष्टींचा यात समावेश करावा लागेल."

( ग ) 'अहिंसक' शब्दाचें स्पष्टीकरण करताना विनोबा म्हणतात, "आमच्या मार्तीनें साधन अहिंसा असेल. आम्ही त्याला सत्याग्रह हि म्हणू शकतों. त्याची चार अंगें आहेत : ( १ ) दुःख कष्ट सहन करणें अर्थात् तपस्या ( २ ) विचार प्रचार ( ३ ) नई तालीम आणि ( ४ ) अन्यायाशीं असहकार." नवीन समाजरचनेमधें अहिंसा तीन प्रक्रियांनी काम करिते ( १ ) स्वतंत्र जनशक्ति ( २ ) कर्तृत्वविभाजन आणि ( ३ ) विचार शासन. यासंबधीं पूर्वी च विवेचन केलें आहे. सरकारची मदत न घेता किंवा तिचा उपयोग न करिता किंवा तिची अपेक्षा हि न करिता लोकांनी स्वतःच्या प्रेरणेनें च आपली विधायक शक्ति जागृत करून कार्य होईल तें हिंसेच्या विरोधी असेल. उदाहरणार्थ, कायदा करण्याची अपेक्षा न करिता भूदानप्राप्ति आणि वितरणाचें कार्य. ग्रामोद्योगाच्या क्षेत्रात हि जनशक्तीनें च तें प्रस्थापित करणें कायद्याची मदत किंवा सरकारच्या सत्तेचा उपयोग घेऊन ग्रामोद्योगाची उन्नति करण्यात यावी अशी अपेक्षा न करणें कर्तृत्वविभाजन म्हणजे राजकीय सत्तेचें आणि आर्थिक सत्तेचे विकेंद्रीकरण अर्थात् सत्ता केंद्राच्या हातातून निघून गावाच्या हातात येणें केवळ Administrative authority मात्र सोंप्यात येणें एवढा च त्याचा अर्थ नाहीं विचार शासन म्हणजे बाह्य शक्तीच्या दडपणानें किंवा कायद्याच्या भयानें गोष्टी अमलात न येता मनात विचार करून समजून घेऊन, स्वतःच्या प्रेरणेनें च सर्व सार्वजनिक क्षेत्रात स्वतःवर नियंत्रण घालणें

## ( ८१ ) शासनमुक्त समाज

सर्वोदयसमाज स्थापन करण्याच्या कल्पनेंत समाजाची शेवटची परिणति शासनमुक्त अवस्था होईल ही केवळ Stateless society म्हणजे जेथें राजकीय सत्ता नाहीं असा समाज एवढें च नव्हे, तर तेथें सामाजिक सत्ता हि असणार नाहीं प्रत्येक माणूस आपापल्या विवेकबुद्धीनें चालेल. परंतु प्रत्येकाची विवेकबुद्धि अशा तऱ्हेनें विकसित होईल कीं, कोणाच्या हि स्वार्थाचा दुसऱ्या कोणाशीं संघर्ष होणार नाहीं. अर्थात् काहीं झगडा अथवा

निनाद हि उत्पन्न होणार नाहीं. वास्तव क्षेत्रात कधीं ही अवस्था परिपूर्ण रुपानें अमलात येण्याची कदाचित् शक्यता नाहीं. संपूर्णपणें शासनमुक्त समाज हा फक्त एक आदर्श आहे. या आदर्शापर्यंत पोंचण्यासाठीं पुष्कळ दिवसपर्यंत खटपट चालेल पुष्कळ दिवस समाज त्याच्याकडे उत्तरोत्तर जात राहील. परतु आदर्शाला कधीं हि पोंचला जाणार नाहीं. परतु कधीं ना कधीं तरी त्या ध्येयाला पोंचलें पाहिजे आणि तसें पोहोंचू ही इच्छा धरून च पुढें जात राहिलें पाहिजे. त्याची अवहेलना करून चालणार नाहीं. कारण तसें केलें तर इतर सर्व व्यवस्थेचें मूळ च शिथिल होऊन जाईल. आदर्श हा भूमितीच्या बिंदूसारखा आहे. बिंदूची कल्पना करता येईल, परतु प्रत्यक्ष डोळ्यानीं पाहता येणार नाहीं. पण त्याला सोडून दिलें तर कोणत्या हि वैज्ञानिकाला पुढें पाऊल टाकता येणार नाहीं कारण त्यामुळें भूमितीचे पुढचे सर्व सिद्धान्त ढासळून पडतील. कल्पना सोडून दिली तर कोणत्या हि इंजिनिअरला घराचा नकाशा करिता येणार नाहीं त्याप्रमाणें च शासनमुक्त समाजाचा आदर्श समोर नसेल तर सर्वोदयाच्या कल्पनेप्रमाणें राजकीय, आर्थिक आणि सामाजिक क्षेत्रात कोणत्या हि तऱ्हेनें विधायक कार्य नीटपणें करणें शक्य होणार नाहीं. म्हणून पूर्ण शासनमुक्त अवस्था आदर्शरूप राहील. परतु व्यवहारात तिचें रूप शासननिरपेक्ष समाज असें राहील राज्याचा आधार दडशक्ति असता म्हणून त्याला दडनिरपेक्ष समाज असें हि म्हणता येईल. सर्वोदयाचें शेवटचं ध्येय 'शासनमुक्त समाज' हें कशाकरिता आहे ? सर्वोदयाचा अर्थ अहिंसक समाजरचना हा आहे. अर्थात् हिंसेतून मुक्ति. सामाजिक क्षेत्रात शासन आणि शोषण या दोन्हींतून हिंसा प्रकट होते. आर्थिक क्षेत्रामध्यें हिंसेच्या शोषणाचें रूप परिग्रह म्हणजे संग्रह हें आहे. शोषणाच्या योगानें आणि त्याची प्रतिक्रिया म्हणून समाजात नानाप्रकारचा विस्कळितपणा येतो. त्याकरिता शासनाची म्हणजे सत्तेची जरूरी असते. म्हणून राज्यसत्ता उदयास आली. समाजामध्ये केंद्रित उत्पादनव्यवस्था म्हणजे च भांडवलशाही ही शोषणाचें कारण आहे. आज-काल उत्पादनाच्या गिरण्या व कारखाने केवळ भांडवलवाल्यांच्या हातीं अथवा उत्तरोत्तर सरकारच्या हातात च केंद्रित होत आहेत व्यक्तिगत रीत्या खाजगी भांडवलशाही दिवसेंदिवस कमी होत चालली आहे. त्या ठिकाणीं

सरकारी भांडवलशाही प्रस्थापित होत आहे. आजकाल जगामध्ये बहुधा सर्व ठिकाणी, सर्व प्रकारें, सरकार च वास्तविक सर्वाधिकारी झालें आहे. अर्थात् मानवजीवनाच्या सर्व क्षेत्रांत सरकारचें नियंत्रण कायम झालें आहे. Welfare State म्हणजे कल्याणकारी सरकार. ह्या कल्पनेंत च राहून प्रत्यक्षतः सरकार सर्वाधिकारी Totalitarian होऊन गेलें आहे. या विराट् राज्ययंत्राला चालण्याकरितां सामान्य लोकांचें बहुतेक सर्व उत्पादन जरूर पडत आहे. राज्ययंत्र चालविण्याकरितां समाजाचा एक मोठा भाग अनुत्पादक कामाकरितां लागत आहे. आणि हे लोक अनुत्पादक असले तरी त्यांना सुखांत, चैनींत राहण्याचा हक्क प्रथमतः आहे असें मानण्यांत येतें. अशा प्रकारें सरकार च आज समाजाचा शोषण करणारी आणि हिंसक संस्था बनली आहे. म्हणून समाजाला हिंसेंतून मुक्त व्हायचें असेल तर त्यानें शासनमुक्त म्हणजे च सरकारच्या सत्तेंतून मुक्त झालें पाहिजे. परंतु कोणता मार्ग किंवा कोणती पद्धति अनुसरली तर ही गोष्ट सहज घडून येईल ? शासनसंस्थेवर प्रत्यक्ष आघात करून तिचा विलोप करणें शक्य नाहीं. ही गोष्ट खरी आहे कीं, जोंपर्यंत शासनाची आवश्यकता राहील तोंपर्यंत शासनव्यवस्थेचा अंशतः विलोप करणें संभवनीय नाहीं. शोषण बंद करायचें असेल तर त्यामुळें शोषणाला अवकाश च राहणार नाहीं तें प्रथम केलें पाहिजे. म्हणून च श्रममूलक स्वावलंबन आणि सहयोगी किंवा सहकारी वृत्ति याचा विकास होणें आवश्यक आहे. अर्थात् केंद्रित उत्पादनव्यवस्थेच्या ऐवजीं विकेंद्रित आणि श्रममूलक उत्पादनव्यवस्था सुरू केली पाहिजे. यामुळें जनशक्तीचा विकास होईल. जीवनाला लागणाऱ्या आवश्यक वस्तूमध्यें ज्या घरांत च उत्पन्न करतां येतील त्या शक्यतोंवर गृहोद्योगानें च केल्या पाहिजेत. ज्या वस्तू कुटुंबामध्ये घरातल्या घरांत करतां येणार नाहींत पण गावांत होऊं शकतील त्या ग्रामोद्योगाच्या साह्यानें केल्या पाहिजेत. त्याप्रमाणें ज्या गावांत उत्पन्न होणें शक्य असणार नाहीं त्या शक्यतोंवर यथाक्रम जिल्हा, प्रदेश किंवा देश यांमध्यें च उत्पन्न केल्या पाहिजेत. अर्थात् भांडवलशाही आर्थिक व्यवस्थेच्या ठिकाणीं स्वावलंबी आणि सहकारी आर्थिक पद्धति प्रस्थापित केली पाहिजे. या नवीन व्यवस्थेमध्यें यंत्रांचें स्थान कोठपर्यंत राहील याचें पूर्वी च विवेचन केलें आहे. केवळ

उद्योग च नाहीं तर शेतीच्या व्यवस्थेत हि संपूर्णपणें विकेंद्रीकरण केलें पाहिजे आणि शेतीला हि स्वावलंबनाच्या पायावर प्रस्थापित केलें पाहिजे. याकरिता जमीन घरोघरीं वाटून देणें जरूर आहे. त्यामुळें सर्वजणांना जमिनीमध्यें आपल्या हातानें शेती करण्याची संधि मिळेल आणि कोणाला हि जमिनीचा माध्यम म्हणून उपयोग करता येणार नाहीं. या गोष्टीची सर्वांत जास्त आवश्यकता आहे आणि पहिल्याप्रथम ही च झाली पाहिजे. कारण जमिनींतून जें उत्पादन होतें तें मौलिक उत्पादन असतें, अर्थात् दुसऱ्या सर्व वस्तू जमिनींत उत्पन्न झालेल्या वस्तूंतून च किंवा त्यांच्या साह्यानें केल्या जातात. म्हणून शेतकी हा च सर्व उद्योगाचा पाया आहे. या दृष्टीनें भूदान यज्ञ हा अहिंसक समाज रचनेचा पाया आहे.

कम्युनिस्टांना हें मान्य आहे कीं, शेवटीं सरकार उरणार नाहीं. ते म्हणतात, ही व्यवस्था आणायची असेल तर प्रथम सरकार खूप मजबूत आणि पक्कें झालें पाहिजे. पुढें गरिबांची हुकूमशाही स्थापिली पाहिजे. नंतर सरकार क्षीण होत जाऊन लुप्त होऊन जाईल, परंतु सरकार शेवटीं लुप्त करायचें असलें तर त्याला प्रथमपासून च क्षीण करायचें काम सुरू केलें पाहिजे. पश्चिमेकडे जाण्याकरिता पूर्व दिशेकडे तोंड करून चालल्यास उद्दिष्टाच्या जागीं पोंचता यायचें नाहीं म्हणून जमिनीचें वाटप आणि ग्रामोद्योगाची स्थापना करण्याच्या बरोबर च सरकारच्या सत्तेचें हि क्रमाक्रमानें विकेंद्रीकरण करून दिलें पाहिजे. यामध्यें सत्तेचें खरोखर च विकेंद्रीकरण झालें पाहिजे. केवळ स्वतंत्र कारभाराच्या सोईची व्यवस्था ( Administrative authority ) मात्र तेथें निर्माण करून भागणार नाहीं. ग्रामपंचायतींत तिचें रूपान्तर होईल. गावाच्या सर्व कामांत ग्रामपंचायतीला सार्वभौम सत्ता राहील. उदाहरणार्थ, एखाद्या गावाला वाटलें कीं, गिरणीचें तेल आपल्या गावांत आणायचें नाहीं, तर देशांत दुसऱ्या ठिकाणीं वेगळी व्यवस्था चालत असली तरी गावाला आपला निर्णय अमलांत आणण्याची सत्ता त्या गावाला राहील. ग्रामपंचायत कशा प्रकारची आहे हें यावरून समजून येईल. हल्लीं सरकार ज्या ग्रामपंचायती स्थापन करूं इच्छितें त्या मात्र स्थानिक कारभाराच्या सोईकरितां स्थापलेल्या संस्था आहेत. खरोखरच्या ग्रामपंचायती गावांतल्या सर्व लोकांच्या संमतीनें निवडल्या जाव्या. ग्रामपंचायतीचे

निर्णय मतें घेऊन होऊं नयेत. ते सर्वानुमतें व्हावेत. ग्रामपंचायतीच्या नीती-संबधीं विनोबा म्हणतात, "ग्रामपंचायतीची नीति अशी असली पाहिजे कीं परमेश्वर च पांच जणांच्या मुखांतून बोलत आहे. पांचामुखीं परमेश्वर ही म्हण प्रसिद्ध च आहे. पंचायतीचें सर्वसंमत मत असेल तें ईश्वराचें च सांगणें आहे असें मानलें पाहिजे. जेव्हां पांच जणांतले तीन जण किंवा चार जण एक गोष्ट सांगतात, बाकीचे लोक दुसरी सांगतात, तेव्हां तो परमेश्वराचा विचार नाहीं." याप्रमाणें क्रमशः ग्रामराज्याच्या दिशेनें पाऊल टाकलें पाहिजे.

गांवच्या राज्यव्यवस्थेच्या आणि उत्पादनाच्या किती भागाची जबाबदारी गांव घेऊं शकेल ही गोष्ट गांव च ठरवील. जेवढी जबाबदारी गांव घेऊं शकेल तेवढी जबाबदारी गांव आपल्या हातांत ठेवून घेऊन उरलेल्या जबाबदारीचा विशेष विशेष भाग आवश्यकतेप्रमाणें क्रमशः जिल्हा, प्रांत, केंद्र राज्यांवर सोंपविला जाईल. त्याकरितां त्या त्या ठिकाणीं अर्थात् गांवांतून जिल्ह्यावर, जिल्ह्यांतून प्रदेशावर, आणि प्रदेशांतून केंद्र सरकारवर याप्रमाणें प्रतिनिधि पाठविण्याची पद्धति ही गांव च ठरवील. याप्रमाणें सरकारची सत्ता आणि सरकारची व्यवस्था यांचें मूळ गांव राहील. आणि जितकी गांवाची सत्ता वाढत जाईल तितकी सत्ता केंद्रांतून कमी कमी होत अगदीं नाममात्र राहील. सध्याच्या व्यवस्थेच्या ही अगदी उलटी गोष्ट आहे. सध्या केंद्र च सत्तेचें मूळ आहे आणि गांवांत सत्ता अगदीं कमी आहे. गांवापासून राष्ट्रापर्यंत प्रत्येक संस्थेंत प्रतिनिधि निवडणें आणि सर्व कामांची व्यवस्था पक्षाकडे लक्ष न देतां सर्वांच्या संमतीनें करणें, पक्ष-पद्धतीचा त्याग करून ठराव पास करणें आणि निवडणुकी करणें ह्या गोष्टी सर्वसंमतीनें होणें खेडेगांवांत कठीण नाहीं. सरकारचा विलोप करण्याच्या प्रक्रियेमध्यें सत्तेचें विकेंद्रीकरण कसें होणें उचित आहे याचें दिग्दर्शन मात्र या ठिकाणीं केलें आहे. समाज या दिशेनें जसजसा पुढें जाईल तसतशी त्याच्यापुढील रूपरेषा आणि स्वभाव स्पष्ट होत जाईल.

सरकारच्या मदतीशिवाय भूदान-यज्ञामुळें जमिनीचा प्रश्न सुटला आणि ग्रामोद्योगाची व्यवस्था होऊन उद्योगाचें हि विकेंद्रीकरण झालें तर लोकांना आत्मशक्तीचें भान होईल. या आत्मशक्तीला सामुदायिक क्षेत्रामध्यें स्वतंत्र

जनशक्ति असें म्हणता येईल. सरकारच्या मदतीची अपेक्षा न राखता आणि ध्येयाकडे तोंड करून जनशक्तीच्या बळावर च पुढें जात राहिलें पाहिजे. जहाजाबरोबर तुलना करिता समाजरचनेमध्यें पूर्ण शासनमुक्त समाज हें दिशादर्शक यंत्र आहे आणि जनशक्ति ही चालकशक्ति म्हणजे मोटर फोर्स आहे. समाजाचें असें आमूलाग्र परिवर्तन सुलभ होण्याकरिता शिक्षणपद्धतीमध्यें त्याला अनुरूप असे बदल करणें अत्यंत जरूर आहे. माणसाच्या उद्योगातून च त्याला शिक्षण मिळण्याची व्यवस्था झाली पाहिजे. म्हणून म. गांधींनीं मूलोद्योगी शिक्षणाची सुरुवात केली. समाजामध्यें मौलिक परिवर्तनाचें काम जितकें पुढें सरकेल तितका च मूलोद्योगी शिक्षणाचा प्रसार होईल, नाहीं तर नाहीं.

शासनमुक्त समाज स्थापन करणें हें जर शेवटचें ध्येय असेल तर अशा कामात सरकारची मदत का घ्यावी? अशी मदत घेतल्यामुळे या चळवळीला बाधा येणार नाहीं का? ही शंका दूर करण्याकरिता विनोबा म्हणतात कीं, "मोक्ष किंवा देहमुक्ति साध्य करायची असेल तर ती देहाच्या मदतीनें आणि देहाकडून च करावी लागते. कुऱ्हाडीनें लाकूड तोडायचें असतें, पण तिचा दांडा लाकडाचा च असतो. चांगलें सरकार अशी च इच्छा करील कीं, चांगल्या पद्धतीनें क्रमशः शासनव्यवस्था म्हणजे सरकार विलुप्त होवो आणि जनता स्वतंत्र जनशक्तीच्या बळावर आपल्या पायावर उभी राहायला शिको. आपलीं मुलें आपल्या मदतीची अपेक्षा न करता आपल्या पायावर उभीं राहावीं असें आई-बापाना वाटतें त्याप्रमाणे सरकार जर या सर्वोदयाच्या कामात साहाय्य करीत असेल तर तें घेण्यास हरकत नाहीं. हातात कुऱ्हाड तर आहे च, फक्त कुऱ्हाडीचा दांडा असता तर ही शंका घेता आली असती."

ही अत्यंत आनंदाची आणि गौरवाची गोष्ट आहे कीं, महाभारतामध्यें एका नैराज्याच्या आदर्शावर स्थापन झालेल्या देशाचें वर्णन आहे.

"न राज्यं नैव राजासीत् न दंडो न च दंडिकः ।
स्वभावेन तु धर्मज्ञाः रक्षन्ति स्म परस्परम् ॥"

त्या देशात कोणी राजा नव्हता, शासन करायला दंड नव्हता, दंडधारी

शिपाई नव्हते. तेथले लोक स्वभावत च धर्म जाणणारे होते. ते धर्मबुद्धीच्या योगे परस्पराचें रक्षण करीत.

## ( ८२ ) शरीरश्रमांचें महत्त्व

नवीन समाजरचना किंवा सर्वोदय स्थापन करण्याकरिता प्रत्येकाने उत्पादक शरीरश्रम करण्याच्या आवश्यकतेवर इतकें का महत्त्व देण्यात येत आहे हे चांगल्या प्रकारे समजून घेणें आवश्यक आहे साधनसपत्तीच्या मार्गे जो गभीर विचार आहे तो समजून घेतला तर सर्वोदयाच्या मार्गावर पुढें जावयाला लोकाना प्रेरणा मिळेल व्यावहारिक दृष्टीनें जीवनाचें आर्थिक क्षेत्र सर्वात जास्ती महत्त्वाचे आहे. आर्थिक क्षेत्र च सर्वोदयाचें स्वरूप सर्वापेक्षा जास्ती चागल्या प्रकारे दाखवील. म्हणून सर्वोदय स्थापनेकरिता आर्थिक समता स्थापन करण्याची आवश्यकता सर्वात जास्ती आहे. आर्थिक समता स्थापित करण्याचा अर्थ हा कीं, ( १ ) समाजोपयोगी कोणतें हि काम असो, त्याचे आर्थिक मूल्य समान असलें पाहिजे. एका बाजूला जितकें शेतकऱ्याचे एक तासाचें काम आणि सुतार किंवा न्हावी याचें एक तासाचें काम या दोहोंजणाना मजुरी सारखी च असली पाहिजे. दुसऱ्या पक्षीं शेतकरी आणि कामकरी याच्या एका तासाला जी मजुरी दिली जाईल, वकिलाच्या एक तासाच्या कामाला हि त्यापेक्षा जास्त किंमत असणार नाहीं. अर्थात् वेगवेगळ्या वर्गाच्या शारीरिक श्रमाच्या कामाचें मूल्य ज्याप्रमाणें समान असलें पाहिजे त्याप्रमाणें च शारीरिक आणि बौद्धिक कामाच्या मूल्यात हि फरक असता कामा नये. ( २ ) नैतिक समता आणि सामाजिक समता नसली तर आर्थिक समता हि स्थापन करणें कठीण आहे. समाजाला शेतीच्या कामाची जितकी जरूरी आहे, शिक्षकाच्या शिकवण्याच्या कामाची तितकी च जरूरी आहे. नैतिक दृष्टीनें या दोन्ही कामाला समान किंमत देणें उचित आहे. शिवाय मजुराची आणि शिक्षकाची सामाजिक प्रतिष्ठा समान असणें योग्य आहे शिक्षकाला शेतकरी कामकऱ्यापेक्षा उंच समजणे योग्य नाहीं शेती काम आणि शिकवण्याचें काम याचे नैतिक मूल्य सारखें, सामाजिक प्रतिष्ठा हि सारखी आणि मानाच्या दृष्टीनें शेतकरी कामकरी आणि शिक्षक हे दोघे हि सारखे च. समाजाच्या दृष्टीनें ह्या दोन्ही कामाची आवश्यकता जर

सारखी च आहे तर त्याची प्रतिष्ठा हि सारखी च असली पाहिजे आणि आर्थिक क्षेत्रांत हि त्यांना समानता दिली पाहिजे. शेतकरी-कामकऱ्यांना पोषणाची जितकी जरूरी आहे तितकी च शिक्षकाच्या पोषणाला जरूरी असली पाहिजे. अर्थात् या दोघांच्या वेतनांत काहीं फरक असण्याचें कारण नाहीं.

आज समाजात बौद्धिक काम आणि शारीरिक श्रमाचें काम यांच्या मजुरींत भयंकर तफावत आहे. सामाजिक क्षेत्रांत हि श्रमजीवी माणसाला बुद्धिजीवी माणसाशीं तुलना करता अत्यंत कमी मान आहे. केंद्रित उत्पादन-व्यवस्थेचा हा परिणाम आहे. कारण केंद्रित उत्पादनव्यवस्थेमधें अर्थात् मोठ्या यंत्रोद्योगांत मॅनेजर वगैरे वेगवेगळ्या थरांचे व्यवस्थापक आणि मोठमोठीं यंत्रें बनविणारे आणि तीं चालविणारे इंजिनिअर यांच्या उच्च बौद्धिक कामाची अत्यंत जरूरी असते. त्यांच्याशिवाय हे मोठे कारखाने चालणार नाहींत. दुसऱ्या पक्षीं त्या ठिकाणीं जें मजुरांचें काम आहे त्यांना बुद्धि चालविण्याची मुळीं च जरूरी असत नाहीं. म्हणून नैतिक आणि आर्थिक समता स्थापन करण्याच्या दृष्टीनें ही स्थिति मुळात च अनुकूल नाहीं. समता स्थापन करायला उत्पादनव्यवस्था अशी असली पाहिजे कीं, त्या ठिकाणीं शारीरिक श्रमाच्या कामाचें प्रयोजन जास्त असलें पाहिजे; शिवाय त्या ठिकाणीं श्रम आणि बुद्धि यांचा समन्वय साधलेला असला पाहिजे. उत्पादन-व्यवस्थेच्या विकेंद्रीकरणानें हा उद्देश सिद्ध होईल. ग्रामोद्योगांत किंवा गृहोद्योगांत मजूर आणि इंजिनिअर ही एक च व्यक्ति असते. म्हणजे त्यांत जी काहीं बुद्धीच्या कामाची जरूरी असते तें काम तो मजूर सहज करून घेतो. त्या ठिकाणीं गुंतागुंती सोडविण्याची जरूरी नसते. म्हणून बुद्धीची मोनॉपोली ( Monopoly ) असत नाहीं. बुद्धि एकट्याच्या च वाट्याला येत नाहीं; शिवाय विकेंद्रित व्यवस्थेमध्यें वेगळे चालक आणि व्यवस्थापक हि लागत नाहींत. जें काहीं थोडें भांडवल लागतें तें मजूर हि देऊ शकतो. म्हणून गृहोद्योगाकरिता लागणाऱ्या अवजाराचा मालक मजूर च असतो आणि तो स्वतः एकदम च भांडवलवाला, मजूर, व्यवस्थापक आणि इंजिनियर असतो. म्हणून या ठिकाणीं अप्रत्यक्षपणा आपोआप होऊन जाते

केंद्रित उत्पादनव्यवस्थेशीं तुलना करताना ग्रामोद्योगामध्यें किती तरी प्रमाणात अधिक लोकांच्या शारीरिक श्रमाची जरूरी असते त्यामध्ये शारीरिक श्रम च अधिक करावे लागतात आज शारीरिक श्रमाकडे तुच्छतेनें आणि अवहेलनेनें पाहिलें जातें ही मनोभावना च समता स्थापन करण्याच्या मार्गात सर्वांत मोठी अडचण आहे. म्हणून जर आर्थिक समता स्थापन करावयाची असेल तर तिचा पाया म्हणून समाजात शारीरिक श्रमाविषयीं जी मनोभावना आहे तिच्यात बदल घडवून आणला पाहिजे. ज्याना आज आपली उपजीविका करण्याकरिता शारीरिक श्रम करण्याची काहीं जरूरी नाहीं, जे उच्च प्रकारच्या आणि गुंतागुंतीच्या कामात कुशल आहेत आणि समाजात ज्याना मान आहे ते जर रोज नियमितपणानें काहीं थोडा वेळ उत्पादक श्रम करून आपलें अन्न, वस्त्र श्रमानें च मिळविण्याकरिता पुढें येतील तर जनमानसात एक क्रांतिकारक परिवर्तन होऊन जाईल. वकील, डॉक्टर, अध्यापक, उच्च अधिकारी हे जर याप्रमाणें नियमितपणें उत्पादक श्रमाचें काम करू लागतील तर केवढी मोठी क्रांति होईल याची सहज कल्पना करिता येईल. असें होणें सध्या कठीण आहे, तरी इतर सर्वांनीं आपल्या जीवनाच्या प्राथमिक वस्तू, अन्नवस्त्र मिळविण्याकरिता शरीर-श्रम करण्याला पुढें का येऊ नये? द्रोहरहित उत्पादक श्रमाला जीवननिष्ठा म्हणून सर्वांनीं स्वीकारले पाहिजे कारण जगात सध्याच्या काळीं पुष्कळशा विषमतेचें, दु खकष्टाचें आणि पापाचें कारण ही श्रम टाळण्याची इच्छा च आहे. शरीरश्रमापासून सुटका करून घेण्याचा ज्याच्या मनात संकल्प आहे तो माणूस गुप्त वा प्रकटपणें चोरी च करीत असतो. म्हणून भगवान् गीतेंत म्हणतात, प्रत्येकानें काहीं ना काहीं परिश्रम करणें जरूर आहे, उत्पादन करणें आवश्यक आहे. परिश्रमरूपी यज्ञानें सर्व देवता प्रसन्न होतील. जे अशा तऱ्हेचा परिश्रमरूपी उत्पादक यज्ञ करणार नाहींत ते चोर आहेत, पापी आहेत. विनोबा म्हणतात, "भगवानांनीं हा जो शाप दिला आहे तो च आर्यसंस्कृतीची घोषणा आहे."

प्रेरिलें हें असें चक्र या लोकीं जो न चालवी ।
इंद्रियासक्त तो पापी व्यर्थ जीवन चालवी ॥

विनोबा आणखी म्हणतात, "काहीं लोक अधिक मानसिक श्रम करतील आणि काहीं लोक अधिक शारीरिक श्रम करतील ही गोष्ट मी मानतों. परंतु सर्वांनीं श्रमनिष्ठ असलें पाहिजे. काहीं लोकांनीं फक्त मानसिक काम करावें आणि काहीं लोकांनीं फक्त शारीरिक काम करावें असे विभाग मी कधी इच्छीत नाहीं. सर्वांनीं हि दोन्ही प्रकारचें काम केलें पाहिजे. परमेश्वरानें प्रत्येकाला हात पाय दिले आहेत तशी बुद्धि हि दिली आहे. म्हणून प्रत्येकानें दोन्ही प्रकारचें काम केलें पाहिजे. आज पाश्चात्यांकडून एका भावनेची आयात करण्यात आली आहे. त्यात काहीं लोकं केवळ श्रमजीवी म्हणजे हँड्स् म्हणजे हात झाले आहेत आणि दुसरे काहीं लोक फक्त हेड्स म्हणजे डोकीं झाले आहेत. अशा तऱ्हेचे विभाग करणें हें अत्यंत भयंकर आहे. अशा तऱ्हेची समाजरचना एक क्षणभर हि राहता उपयोगी नाहीं असें मला वाटतें."

## ( ८३ ) अपरिग्रही समाजाचा अर्थ

सर्वोदयसमाजाच्या रचनेप्रमाणें व्यक्तिगत मालकीचा म्हणून कोणाच्या हि हातात संचय किंवा संग्रह असणार नाहीं. सर्वोदयसमाज हा असंग्रही, अपरिग्रही समाज आहे. यावरून कित्येकांना असें वाटेल कीं, या समाजात दारिद्र्य असणार नाहीं हें खरें परंतु त्याची अवस्था विशेष सुखाची असणार नाहीं असें समजणं चूक आहे. आपल्या एका प्रार्थनोत्तर भाषणात अपरिग्रही समाजाची स्थिति कशी असेल याचे विनोबांनीं वर्णन केलें आहे. ते म्हणतात, "सध्या देशात दरमाणशीं अधीच छटाक दूध मिळतें. परंतु आम्ही जो असंग्रही समाज बनविणार आहोंत त्यात माणशीं एक शेर दूध असेल. आजच्या संग्रही समाजाची अवस्था अशी आहे कीं, देशात वर्षभर सर्वांना पुरेल इतकें धान्य असेल किंवा नाहीं याची शंका आहे. परंतु असंग्रही समाजात कमींत कमी दोन वर्षांचें तरी धान्य शिल्लक असेल. त्यामध्यें प्रत्येक घरात भरपूर धान्य असेल. सध्याच्या स्थितींत कोणाला तहान लागली तर तो कोणाच्या हि घरीं जाऊन पाणी मागू शकतो. असंग्रही समाजात त्याप्रमाणें कोणाला भूक लागली तर तो कोणाच्या हि घरीं जाऊन खायला मागू शकेल. पिण्याच्या पाण्याकरिता ज्याप्रमाणें कोणी पैसा मागत नाहीं

त्याप्रमाणें असंग्रही समाजात खाण्याच्या जिनसाकरिता हि कोणी पैसा मागणार नाहीं. भुकेलेल्याला खायला घालण्याइतकें भरपूर धान्य असंग्रही समाजाच्या प्रत्येक घरीं असेल. मी ही काहीं नवीन गोष्ट सांगत नाहीं. उपनिषदानीं च हा मंत्र सांगितला आहे. अन्न खूप वाढवा, परंतु त्याबरोबर च जग मिथ्या आहे हें ब्रह्मविद्येचे हि शिक्षण द्या. आसक्ति राखू नका हें ब्रह्मविद्येचें शिक्षण. 'अन्न बहु कुर्वीत तद् ब्रह्म' अन्न खूप वाढवा. ते ब्रह्म आहे. म्हणून आम्ही अन्नधान्य खूप वाढवू. घरामध्यें इतकें अन्न असेल कीं, त्याला काहीं किंमत च असणार नाहीं तें कोणी विकणार नाहीं. उलट असे विकलें तर त्याला मिथ्याचार समजलें जाईल. असंग्रही समाजांत साजूक तूप भरपूर प्रमाणात मिळेल, पण डाल्डा मिळणार नाहीं भाजी हि खूप मिळेल वाटेल त्या घरीं जाऊन तुम्ही जेवू शकाल. घराचा मालक तुम्हाला म्हणेल कीं, आता तर नऊ वाजले आहेत, अकरा वाजता जेवू, तोंपर्यंत आपण दोन तास शेतात काम करू. या समाजा तले लोक मत्स्य, मांस खाणें सोडून देतील. त्याऐवजी गाईचें खूप दूध पितील. अपरिग्रही समाजात मधाची महानदी वाहील ज्याप्रमाणें महानदी जंगलातून बाहेर येते त्याप्रमाणें मध हि जंगलातून बाहेर येईल. याप्रमाणें अपरिग्रही समाजात आम्ही इतका परिग्रह वाढवू कीं लोकाना त्याची कल्पना हि करता येणार नाहीं. परंतु आमची इच्छा आहे कीं, तो परिग्रह, तो संग्रह, प्रत्येक घरात वाटलेला असेल अपरिग्रहाचा अर्थ अत्यंत मोठा संग्रह परंतु तो घरोघरीं वाटलेला.

"तिसरी गोष्ट अशी कीं, संग्रहात निरुपयोगी वस्तु असणार नाहीं. आम्ही सिगरेटसारख्या वाईट जिनसाचा बोजा वाढवणार नाहीं तो आम्ही असंग्रहाच्या दृष्टीनें होळीच्या दिवशीं जाळून टाकूं. म्हणून असंग्रहाचा तिसरा अर्थ हा कीं, समाजात निरुपयोगी वस्तूंचा संग्रह असणार नाहीं. असंग्रही समाजाचा तिसरा अर्थ असा कीं, समाजात लक्ष्मी खूप वाढविली पाहिजे परंतु व्यर्थ वस्तूंचा संग्रह असता कामा नये. दारूची बाटली आणि सिगरेटची पेटी लक्ष्मी नाहीं.

"चौथी गोष्ट अशी कीं, असंग्रह किंवा अपरिग्रह ही चांगली गोष्ट असली तरी त्याचा क्रम ठरलेला असला पाहिजे आज तर क्रमाविषयीं

काहीं च धरबंध उरला नाहीं. निरुपयोगी जिन्नस वाढत आहेत. परंतु असंग्रही समाजात पहिला क्रमांक उत्तम खाद्यवस्तूला मिळेल, दुसरा क्रमांक वस्त्राला मिळेल, तिसरा चांगल्या घराला, चौथा क्रमांक जरूरीच्या यंत्राला, पांचवा क्रमांक ज्ञानाकरिता उत्तम ग्रंथांना, आणि सहावा क्रमांक मनोरंजनाकरिता संगीतादि व्यवस्थेला असला पाहिजे. याप्रमाणें वस्तूंच्या महत्त्वाचें तारतम्य पाहून वस्तूंना क्रमांक राहतील आणि त्या त्या प्रमाणांत वस्तूंचें उत्पादन आणि वाढ केली जाईल. एक भाई म्हणाले, लोक चांगले चांगले कपडे घालून सभेला येतात तेव्हा येथें दारिद्र्य नसावें. मी म्हणतों, खचित दारिद्र्य आहे परंतु लोकांची बुद्धि कमी आहे. शहरात लोक चांगलें खात नाहींत पण पोशाख चांगला करतात. निर्भेळ दूध मिळत नाहीं म्हणून डालडा खातात. कित्येक घरांत चांगलें खाण्याची व्यवस्था नाहीं. घरीं बनवीत हि नाहींत. पण कपडे खूप असतात. टूथ ब्रश, पेस्ट, लिप्स्टिक वगैरे असते. हार्मोनियम असतो. वाद्य वाजवायला कांहीं हरकत नाहीं. प्रथम खा, मग वाजवीत बसा. याप्रमाणें कोणता जिन्नस आधीं पाहिजे आणि कोणता मागून, हें आपण पाहिलें पाहिजे आमच्या घरीं भरपूर दूध, तूप नसलें तर तें आम्ही प्रथम मिळवूं. अर्थात् असंग्रहाचा चौथा अर्थ—'क्रमानुसार संग्रह'.

"पांचवा अर्थ असा कीं, अपरिग्रही समाजात शक्य तेवढा पैसा कमी वापरला जाईल. पैसा लक्ष्मी नाहीं, ती राक्षसी आहे. केळीं, आंबे, भाजी, धान्य ही लक्ष्मी. पैसा तर नाशिकच्या छापखान्यात तयार होतो. तेथें तो कागदावर छापून बनवितात. एखाद्या माणसाकडून केळें काढून घ्यावयाचें असलें तर त्याला रिव्हॉल्व्हर दाखवून म्हटलें कीं केळें देतोस कीं नाहीं बोल. केळें मिळवून घेण्याची हि गोष्ट तशी च आहे. या ठिकाणीं पिस्तुलाच्या ऐवजीं नोट दाखवून म्हणतात, केळें देतोस कीं नाहीं बोल. पिस्तूल दाखवून केळें काढून घेणें ही जशी चोरी आहे, दरोडेखोरी आहे, त्याप्रमाणें रुपयाची नोट दाखवून तूप घेऊन जाणें ही हि दरोडेखोरी च आहे. पैसा हें तर राक्षसाचें यंत्र आहे. पण लक्ष्मी आहे देवता. लक्ष्मी भगवान् श्रीकृष्णाच्या आश्रयानें राहते.

"उद्योगिन पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी. ।"

उद्योगी पुरुषाला च लक्ष्मीचा लाभ होतो.

'कराग्रे वसते लक्ष्मी' लक्ष्मीचा वास आमच्या हातात आहे, आमच्या बोटात आहे. हीं जीं पाच आणि पाच दहा बोटे परमेश्वराने आम्हाला दिली आहेत त्यानीं श्रम केले तर लक्ष्मी लाभेल. म्हणून अपरिग्रही समाजात सर्वांत कमी कोणता जिन्नस असेल तर तो पैसा. पैशानें लोकामध्ये असा भ्रम निर्माण करुन दिला आहे कीं, खरोखरी जी व्यक्ति दरिद्री तिला च लक्ष्मीवान् समजायला लावलें आहे, आणि जी व्यक्ति खरोखरी लक्ष्मीवान् त्या व्यक्तीला दरिद्री समजायला लावलें आहे. ज्याच्याजवळ दहीं, दूध, भाजी, धान्य आहे त्याला दरिद्री म्हणतात आणि ज्याच्याजवळ यापैकीं काहीं नाहीं परंतु पैसा मात्र आहे त्याला म्हणतात धनवान्, त्याला म्हणतात श्रीमंत."

## (८४) ग्रामराज्य आणि रामराज्य

सर्वोदयाच्या आदर्शाप्रमाणें सघटित गावाला विनोबा 'ग्रामराज्य' म्हणतात गांधीजी 'रामराज्य' स्थापायच्या गोष्टी बोलत असत. या दोन्ही एक च वस्तु आहेत काय? असे समजा कीं, भूदान-यज्ञ आणि संपत्ति दान-यज्ञ यशस्वी होऊन जमिनीवरच्या मालकीची कल्पना दूर झाली. जो शेती करु इच्छितो त्याला जमीन मिळाली. प्रत्येक गावात जनशक्तीच्या बळावर जीवनावश्यक अशा सर्व वस्तु गावात च उत्पन्न केल्या जात आहेत प्रत्येक गाव स्वयंपूर्ण झाले आहे. गावात कोणता जिनस उत्पन्न करावा हे ठरविण्याचा आणि तें अमलात आणण्याचा अधिकार गावकऱ्यानीं मिळविला आहे. सरकारची सत्ता गावोगावीं विकेंद्रित झाली आहे. समाजात काहीं उच्चनीच भाव राहिला नाहीं. सगळ्या लोकाना आपला जीवन विकास करण्याची समान संधि मिळाली आहे वेगवेगळ्या कामाना विशेष कमीजास्त मजुरी नाहीं. सर्व कामाची किंमत सारखी च. याला च म्हणतात 'ग्रामराज्य' या ग्रामराज्यात जे ठराव किंवा निर्णय करण्यात येतील ते एकमतानें ठरतील. ग्रामराज्यात काहीं परिस्थितीमध्यें मतभेद किंवा विवाद उद्भवले तर ते सर्वांच्या संमतीनें च सोडविले जातील. परंतु 'रामराज्यां'त विवाद, विसंवाद किंवा मतभेद उत्पन्न च होणार नाहींत.

कारण ती पूर्णपणें शासनमुक्त स्थिति आहे. त्या ठिकाणीं प्रत्येक माणूस आपल्या विवेकबुद्धीला धरून च चालेल. अर्थात् विनोबांचें 'ग्रामराज्य' हे म. गांधींच्या 'रामराज्या'चें पहिले पाऊल आहे. त्यासबंधीं विनोबानीं एकदा म्हटलें आहे कीं, जेव्हा गावातले मतभेद गावात च सर्वांच्या समतीनें मिटविले जातात तें 'ग्रामराज्य' होईल आणि ज्या परिस्थितींत मतभेद किंवा विवाद उत्पन्न च होणार नाहींत त्या परिस्थितींत तें 'रामराज्य' होईल.

## ( ८५ ) भूदान-यज्ञाचे सात उद्देश

आतापर्यंत भूदानाच्या अनेक उद्देशांचें विवेचन करण्यात आलें आहे. विनोबानीं भूदान-यज्ञाचे उद्देश सागताना त्याचे सात प्रकार सागितले आहेत ते असे :

( १ ) दारिद्र्य-मोचन.

( २ ) जमिनीच्या मालकाच्या अंत:करणात प्रेमभावाचा विकास करून त्यामुळें देशात नैतिक हवा उत्पन्न करणें.

( ३ ) एका बाजूला मोठे जमिनीचे मालक आणि दुसऱ्या बाजूला जवळ कांहीं हि नसलेले भूमिहीन दरिद्री लोक. या दोघामध्यें जो वर्गद्वेष दुसऱ्या देशात दिसून येतो तो भूदान-यज्ञामुळें उत्पन्न होणार नाहीं, आणि एकमेकात प्रेमाचें आणि सद्भावनेचें बंधन दृढ होऊन त्याचा परिणाम समाज बलवान् होण्यात होईल.

( ४ ) यज्ञ, दान आणि तप या तीन्हींच्या अपूर्व दर्शनाच्या पायावर जी भारतीय संस्कृति उभारण्यात आली होती तिचें पुनरुज्जीवन आणि उन्नति साधली जाईल आणि माणसाची धर्मावरची श्रद्धा दृढ होईल.

( ५ ) देशात शातीची स्थापना होईल.

( ६ ) देशात शाति स्थापित झाली तर ती जगात शाति स्थापण्याला साहाय्यक होईल.

( ७ ) भूदान यज्ञामुळें वेगवेगळे राजकीय पक्ष एकमेकाजवळ येतील, एका च व्यासपीठावर उभे राहू शकतील आणि मिळून काम करण्याची संधि त्याना मिळेल. यामुळें देशाचें बळ वाढेल.

## (८६) एकदम दोन्ही पद्धतींचें अनुसरण

या चळवळीचें ध्येय साध्य करण्याकरिता दोन साधनमार्ग एकदम च अनुसरले जात आहेत. आध्यात्मिकतेचा विकास करण्याची खटपट करणें हा एक मार्ग आणि लोकजागृति हा दुसरा मार्ग. जमिनीवर सगळ्याचा समान हक्क. पैसा, धनउत्पत्ति केवळ व्यक्तीच्या भोगाकरिता नाहीं; ती समाजाची. मनुष्य हा त्या संपत्तीचा समाजाच्या वतीनें विश्वस्त मात्र. हें ज्ञान लोकांमध्यें जागृत झाले म्हणजे त्याच्या दडपणानें ज्याच्याजवळ अधिक आहे ते दिल्याशिवाय राहणार नाहींत. पण जर एवढी च जागृति करून थांबलों तर त्याचा परिणाम हिंसेकडे जाण्याची प्रवृत्ति निर्माण होण्यात होईल. म्हणून त्याबरोबर च लोकांमध्यें आध्यात्मिकतेचा हि विकास झाला पाहिजे. सर्व भूतांत एक च आत्मा आहे हें जाणून मनुष्य ज्या दृष्टीनें आपल्या स्वतःकडे पाहतो त्या च दृष्टीनें दुसऱ्याकडे हि त्यानें पहावें. सर्वांचा आत्मा समानभावें जागृत आणि विकसित होऊ शकतो. म्हणून श्रीमंताचें हृदयपरिवर्तन होऊ शकेल. शिवाय आध्यात्मिकता लोकांना सत्य आणि अहिंसेच्या मार्गाचें अनुसरण करण्याची दीक्षा देईल. म्हणून या दोन्हींचा प्रचार एकदम करीत राहिलें पाहिजे. नाहीं तर संकट उत्पन्न होण्याचा संभव आहे. म्हणून विनोबा हे दोन्ही मार्ग एकदम अनुसरीत आहेत. यासंबंधीं ते म्हणतात, "अंतःकरणातला परमेश्वर हा च प्रथमपासून माझा आधार आहे. लौकर होवो किंवा उशीरा होवो, तो अंतःकरणातला परमेश्वर जागा होईल च आणि मनुष्याला चांगल्या मार्गानें चालण्याची प्रेरणा देईल च. दुसरी गोष्ट, आम्ही जी परिस्थिति निर्माण करण्याची खटपट करीत आहों त्यामुळें लोकांत जागृति होईल आणि लोक दान दिल्याशिवाय राहणार नाहींत. याप्रमाणें दोन्ही प्रकारची जागृति आणण्याची मी खटपट करीत आहें. नैतिक जागृतीमुळें हृदयपरिवर्तन साधेल आणि लोकांच्या मनात चेतनेचा संचार होईल. लोकांच्या मनात फक्त चेतना उत्पन्न झाली आणि नैतिक जागृति झाली नाहीं तर तीमुळें हिंसाशक्ति प्रबळ होईल. दुसऱ्या पक्षीं जर केवळ नैतिक जागृति होईल तर उद्देश सिद्ध व्हायला फार काळ लागेल. ज्या-प्रमाणें आकाशात उडण्याकरिता पक्ष्याला दोन पंख लागतात त्याप्रमाणें च

सत्संकल्पाच्या सिद्धीकरिता हि अंतर्जागृति आणि बाह्य परिवर्तन ही दोन्ही हि आवश्यक आहेत."

## ( ८७ ) बुद्धि, श्रद्धा आणि निष्ठा

बुद्धि दिशा दाखविते आणि हृदय कर्म करण्याला प्रेरणा देतें. नावेचे सुकाणू कोणत्या दिशेला जावयाचें तें दाखविते, आणि वल्हें आपल्या शक्तीने नावेला चालना देतें. बुद्धि ही सुकाणू आहे आणि श्रद्धा वल्हें आहे. श्रद्धा Motor force असून बुद्धि Steering आहे. जीवनाचा एखादा मौलिक सिद्धान्त जेव्हा समोर उभा राहतो तेव्हा मनुष्य बुद्धीच्या द्वारा तो विचार समजावून घेतो. तेव्हा तो सिद्धान्त कोणत्या दिशेला जावयाचें आहे याचें दिग्दर्शन करतो. असें असलें तरी जर तो विचार त्याच्या हृदयाला स्पर्श करणार नाहीं तर त्याला कर्म करायला प्रेरणा मिळणार नाहीं. दुसऱ्या पक्षीं असें हि होऊं शकेल कीं, एखाद्याची बुद्धि तितकी प्रखर असणार नाहीं. बुद्धीच्या योगानें विचार चांगल्या तऱ्हेनें समजून घेणें त्याला शक्य होणार नाहीं. तरी हि जर सिद्धान्त त्याच्या अंतःकरणाला स्पर्श करून गेला, अर्थात् त्या सिद्धान्तावर त्याची श्रद्धा बसली, तर त्या सिद्धान्ताची विचारधारा चांगल्या प्रकारें समजली नाहीं तरी श्रद्धेच्या बळावर तो त्या कामाला मनापासून पडेल. श्रद्धा आणि विश्वास ही एक च वस्तु आहे. श्रद्धा असली कीं विश्वास हि बसतो च. अहिंसेच्या कामांत श्रद्धा किंवा विश्वास याचें च काम सर्वांत जास्त असतें. भूदान यज्ञाचे क्षेत्र हि तसें च आहे. जर विनोबा पोचमपल्ली गावाहून गाढ श्रद्धा आणि अनन्त विश्वास घेऊन या कामाला लागले नसते तर आजच्या अवस्थेपर्यंत पोंचणें समवनीय होतें का? अहिंसामूलक सिद्धान्ताची विचारधारा हळूहळू पूर्ण होत आहे. म्हणून तिच्या साधनेकरिता प्रथम श्रद्धा ठेवून च पुढें सरकलें पाहिजे. परंतु या आंदोलनाची आता तशी स्थिति नाहीं. भूदान यज्ञाची विचारधारा आज इतकी पुढें गेली आहे कीं, गंभीरपणें समजून घेण्याला आता पूर्ण अवकाश राहिला आहे. म्हणून ज्या ठिकाणीं शिथिलता आणि निष्क्रियता दिसून येईल त्या ठिकाणीं समजावें कीं श्रद्धा आणि विश्वास यांचा अभाव आहे. विनोबा म्हणतात, "जगात कांहीं कामें

बुद्धीच्या द्वारा करावीं लागतात आणि कांहीं कामे श्रद्धेच्या बळावर करावीं लागतात दोन्ही हि एकमेकाना पूरक आहेत. दोन्हींची हि जरुरी आहे. बुद्धि प्रमाणाशिवाय कोणचा हि विषय मान्य करीत नाहीं आणि श्रद्धा एखादा विषय मान्य करण्याकरिता प्रमाणाची अपेक्षा राखीत नाहीं अशा मी त्याच्या व्याख्या करितों. मूल आपल्या आईचें स्तनपान करताना त्यापूर्वी तिचें दूध ही चांगली वस्तु आहे कीं नाहीं, त्यातून आपल्याला पोषण मिळणार आहे कीं नाहीं, याचे आधीं प्रमाण मिळालें तर च तें स्तनपान करायला लागतें असं नाहीं. श्रद्धेनें च कोणत्या हि प्रमाणाशिवाय च तें स्तनपान करतें. म्हणून कांहीं कांहीं विषयात श्रद्धेनें च चाललें पाहिजे."

श्रद्धा ठेवून काम सुरु केल्यावर तें जसजसें यशस्वी होतें तसतशी निष्ठा हि उत्पन्न होते कामात जितकी निपुणता येते तितकी च निष्ठा हि दृढ होऊन जाते. श्रद्धा आणि निष्ठेचें स्वरूप वर्णन करताना विनोबा म्हणतात, "श्रद्धा ही भिंतीप्रमाणें आहे. ती सरळ गुण्यात उभी असेल तर उभी राहील, नाहीं तर पडून जाईल. ती असली तर नीट च उभी असणार आहे, नाहीं तर मुळीं असणार च नाहीं त्याप्रमाणें मनुष्य एक तर संपूर्ण जिवंत असेल किंवा संपूर्ण मृत. कोणी एखादा माणूस शेकडा चाळीस पन्नास टक्के जिवन्त आहे आणि चाळीस पन्नास टक्के मृत आहे असें असू शकत नाहीं, त्याप्रमाणें श्रद्धा केव्हा हि अर्धवट असू शकत नाहीं श्रद्धेशिवाय कोणतें हि महान् कार्य साध्य होत नाहीं. कर्म श्रद्धेचें अनुसरण करतें आणि मागून निष्ठा उत्पन्न होते. निष्ठा उत्पन्न होण्यापूर्वी मनुष्य श्रद्धेनें च काम करीत असतो. काम करताना तें करण्याची निपुणता मिळाली, तें यशस्वी होऊं लागलें, म्हणजे निष्ठेचा उदय होतो. मनुष्य कोणतें हि काम आरंभ करण्यापूर्वी त्या कामात त्याला श्रद्धा असणें जरूर आहे. आम्ही नैतिक शक्तीच्या बळावर च हा प्रश्न सोडवूं इच्छितों. तेव्हा या साधनावर आमची दृढ श्रद्धा असणें जरूर आहे."

## (८८) ज्ञान आणि विज्ञान

. विज्ञान हें शक्ति आणि गति देतें आणि ज्ञान मार्ग दाखवितें. ज्या ठिकाणीं आत्मज्ञान आणि अहिंसा असते तो मार्ग कल्याणमार्ग असतो. पण आत्म-ज्ञान आणि अहिंसा ज्याप्रमाणें मार्ग दाखवितात त्या च प्रमाणें अज्ञान आणि

हिंसा हि मार्ग दाखवू शकतात; परंतु ते मार्ग दाखवतात तो विनाशाचा व अकल्याणाचा असतो. विज्ञान हा मोटर फोर्स आहे आणि आत्मज्ञान व अहिंसा तसें च अज्ञान व हिंसा ही स्टिअरिंग आहे. विज्ञान हें नौकेचें वल्हें आहे आणि आत्मज्ञान व अहिंसा किंवा अज्ञान आणि हिंसा ही नावेचें सुकाणू आहे. म्हणून विज्ञानानें हिंसेचें साहाय्य केलें तर संपूर्ण नाश होतो. पूर्वकालीं विज्ञानाची उन्नति झाली नव्हती म्हणून युद्ध सुरू झालें तर हाताहातानीं च होत असे. जे युद्धांत भाग घेत त्यानें च तेवढें बरेंवाईट होई. दुसऱ्याला त्याची बाधा पोंचत नसे. आता विज्ञानाची पुष्कळ च प्रगति झाली आहे. त्यामुळें युद्ध सुरू झालें तर तें सर्व पृथ्वीला व्यापून टाकतें आणि त्यामुळे घडून येणाऱ्या नाशाला मर्यादा नाहीं. हिंसेबरोबर विज्ञान जोडलें गेलें, त्यातून ॲटम बाँब निर्माण झाला, त्याप्रमाणे च अहिंसा आणि आत्मज्ञान याला हि विज्ञानाचें साहाय्य मिळालें तर अहिंसेला सर्व जगात पसरण्याची संधि मिळेल. विज्ञानाला जर कल्याणदायी शक्तीचें रूप मिळेल तर त्याच्या योगानें त्याची आत्मज्ञान आणि अहिंसेशीं जोड होईल आणि अज्ञान व हिंसा याच्यापासून विज्ञान कायमचें दूर होईल, नाहीं तर जग द्रुतगतीनें विनाशाकडे जाईल.

## ( ८९ ) गांधी-दर्शनांतील तीन नीति

गांधींच्या तत्त्वज्ञानाचें ध्येय अहिंसक समाजरचना किंवा सर्वोदय-समाजाची स्थापना हें आहे. त्या ध्येयाला पोंचण्याकरिता म. गांधींनीं तीन सिद्धान्त सांगितले आहेत. गांधीजींच्या विचाराप्रमाणे समाजरचना करायची असेल तर व्यक्तिगत आणि सामाजिक जीवनात या तीन सिद्धान्ताची स्थापना करण्याशिवाय गत्यंतर नाहीं. अहिंसक समाजरचनेकरिता जे काहीं कार्यक्रम दिले गेले आणि दिले जात आहेत ते सर्व या तीन सिद्धान्तात अंतर्भूत आहेत. भूदान-यज्ञाचा कार्यक्रम हि या तीन सिद्धान्तावर च आधारलेला आहे. ते तीन सिद्धान्त असे : (१) वर्णव्यवस्था, (२) ट्रस्टीशिप व (३) विकेंद्रीकरण.

( १ ) **वर्णव्यवस्था** :—वर्णव्यवस्थेची गोष्ट ऐकून पुष्कळ लोक चमकून उठतील यात आश्चर्य नाहीं. कारण वर्णव्यवस्थेच्या मुळात पवित्र कल्पना असली तरी समाजानें ती जातिभेद, अस्पृश्यता, उच्चनीचभेद

आणि विषमता इत्यादि द्वारानीं विकृत करून टाकली आहे. म्हणून वर्णव्यवस्थेसंबंधीं लोकांच्या मनात समाजातल्या या सर्व वाईट गोष्टी उभ्या राहतात. परंतु गांधीजी अहिंसक समाजरचनेच्या क्षेत्रात ज्या अर्थानें वर्णव्यवस्था शब्दाचा उपयोग करीत असत त्याच्याशी या विकृत वर्णव्यवस्थेचा कांहीं हि संबंध नाहीं. पूर्वी च सांगितलें आहे कीं, समाजात जे कांहीं महान् शब्द परंपरागत चालत आलेले आहेत ते सर्व शब्द टाकून न देता समाजाच्या नवीन आवश्यकतेनुसार त्या शब्दात नवीन अर्थ भरून देऊन ते जुने शब्द च वापरणें ही एक अहिंसक प्रक्रिया आहे. याप्रमाणें वर्णव्यवस्थेला हि अहिंसक समाजरचनेचें एक अविभाज्य अंग म्हणून त्याला योग्य असा नवा अर्थ देऊन गांधीजींनीं त्याचा उपदेश केला आहे. म्हणून वर्णव्यवस्था या शब्दानें घाबरून जाण्याचें कारण नाहीं. शब्दाला महत्त्व असत नाहीं. कोणत्या अर्थानें त्याचा उपयोग केला जातो ही महत्त्वाची गोष्ट आहे.

अहिंसक समाजरचनेच्या क्षेत्रात वर्णव्यवस्था हा शब्द ज्या अर्थानें वापरला आहे त्याचें मूलभूत सार असें आहे : (क) सर्व प्रकारच्या कामाला समान वेतन आणि समान प्रतिष्ठा, (ख) चढाओढीचा अभाव, आणि (ग) शिक्षणव्यवस्थेमध्यें वंशपरंपरागत संस्कृतीचा उपयोग. अहिंसक समाजरचनेमध्यें या तीन गोष्टींची सर्वांत जास्त जरुरी आहे. जर गांधीजी दुसऱ्या देशात दुसऱ्या संस्कृतीमध्यें जन्माला आले असते तर यासंबंधीं वर्णव्यवस्था हा शब्द कदाचित् त्यांना सुचला नसता. वर सांगितलेल्या तीन गोष्टींचा द्योतक दुसरा कोणता तरी उपयोगी शब्द त्यांनीं वापरला असता.

श्री. किशोरलाल मश्रूवाला यानीं वर्णव्यवस्थेचें विवेचन करताना पुढील-प्रमाणें लिहिलें आहे, "साधारणतः लोक आपल्या वडिलांच्या धंद्यानें अवलंबन करितात त्यामुळें समाजजीवनात स्थिरता येते. मुलाला व्यवस्थित शिक्षण देण्याची चांगली सोय होते आणि त्या कामात शास्त्रीय उन्नति करण्यात हि साहाय्य मिळतें. जर सर्व कामाचें वेतन सारखें च किंवा साधारणतः समान असेल आणि त्यांना प्रतिष्ठा हि सारखी च असेल, तर

विशेष यांहीं कारण असल्याशिवाय दुसरा कांहीं धंदा पसंत करण्याचें लोकांना आकर्षण किंवा आग्रह उत्पन्न होणार नाहीं साधारणतः असें म्हणता येईल कीं, आईबापाच्या धंद्याबद्दल आवड आणि त्याचें कौशल्य मुलाच्या रक्तात च येत असतें हा विश्वास चुकीचा आहे असें समजलें तरी ह्या गोष्टीविषयीं कांहीं संशय नाहीं कीं, पिढ्यानुपिढ्या एक च धंदा अनुसरण करितांना शरीराच्या रचनेमध्यें असे स्थायी परिवर्तन होऊन जातें कीं, तें परिवर्तन मुलाकडे हि जाणें संभवनीय असतें शिवाय मूल आईबापाच्या धंद्याच्या वातावरणात च वाढत असतं. या दोन कारणांनीं मुलाला दुसरा कोणता पेशा पत्करण्यापेक्षा बापाच्या च धंद्याचें शिक्षण देणें आणि त्यात च त्यानें काम करणें ही गोष्ट सहजसाध्य होऊन जाते म्हणून सर्व जीवनाचा साधारण नियम असा असणें योग्य आहे कीं, प्रत्येकानें आपल्या उपजीविकेचा धंदा म्हणून आपल्या वडिलांचा च धंदा किंवा त्या धंद्याची एखादी शाखा किंवा त्या धंद्याचा विकास म्हणून च आणखी एखादा धंदा उत्पन्न झाला असेल तर तो अवलंबणें हा धर्म आहे असें मानलें पाहिजे अगदीं च वेगळा धंदा अवलंबणें चांगलें नाहीं जर ही गोष्ट एकदा निश्चितपणें स्थिर होऊन जाईल कीं, प्रत्येकानें आपल्या उपजीविकेकरिता आपल्या आई बापाचा च धंदा अवलंबन करावा, तर आज ज्याप्रमाणें एम् ए ची पदवी मिळविल्यानंतर हि कोणता उद्योग करावा हे लोक ठरवू शकत नाहींत असलें दु:खदायक दृश्य पहावें लागणार नाहीं. कारण एक निश्चित उद्देश पुढें ठेवून प्रथमपासून च प्रत्येकाला शिक्षण देण्याची व्यवस्था होईल."

खालीं दिलेल्या कांहीं विशेष क्षेत्रात वडिलांचा धंदा अवलंबन करण्याच्या नियमात बदल करिता येईल.

( १ ) जर पित्याचा धंदा नीतीला विरोधी असेल तर तो धंदा बदलून घेता येईल, आणि बदलणें योग्य आहे

( २ ) जर कोणामध्यें दुसऱ्या एखाद्या धंद्याला उपयोगी गुण विकसित झालेले दिसून येतील तरी हि तो उपजीविकेकरिता वडिलांचा च धंदा चालवील परंतु लोकसेवेकरिता कांहीं वेतन न घेता दुसरें काम करू शकेल. उदाहरण म्हणून असें सांगता येईल कीं, एखाद्या शेतकऱ्याच्या मुलाच्या

अंगात सेनिकाच्या गुणाचा विकास झालेला असेल तरी तो उपजीविके-करिता शेतीचे च काम करील आणि देशसेवेकरिता वेतन न घेतां सैनिकाचें काम करील.

( ३ ) समाजातल्या परंपरागत एखाद्या व्यवसायांत आमूलाग्र कांहीं हितकारी परिवर्तन करण्याच्या उद्देशानें जर नवीन दृष्टि असणारे कार्यकर्ते निर्माण करायची जरूरी असेल तर दुसऱ्या धंद्यातल्या माणसाला हि सेवे-करितां तें काम देता येईल त्याप्रमाणें आज नवीन समाजरचनेकरितां बुद्धिजीवी वर्गांतल्या कार्यकर्त्यांना शेती, गोपालन इत्यादि कामें करण्या-करिता आवाहन करण्यात आलें आहे.

आपल्या देशात जमीन कमी आहे म्हणून सर्वांना शेती करून उप-जीविका करण्याकरिता भरपूर प्रमाणात जमीन देणें शक्य नाहीं. याकरिता पूरक धंदा म्हणून शेतकऱ्यानें दुसरे गृहोद्योग चालविले पाहिजेत. शिवाय नवसमाजरचनेमध्ये मनुष्याच्या व्यक्तिविकासावर विशेष भर देण्यांत आला आहे. शेतकरी जर केवळ शेतकी च करीत राहील तर त्याच्या व्यक्तित्वाचा विकास होणार नाहीं. म्हणून अशी कल्पना करण्यात आली आहे कीं, शेतकऱ्याच्या घरीं दुसरे हि उद्योग चालतील. म्हणून बहुउद्योगी कुटुंबें ( Multi-craft Family ) निर्माण करणें अवश्य आहे. ही गोष्ट वर्ण-व्यवस्थेच्या आड येणारी नाहीं. आज समाजात उपजीविकेकरितां किंवा व्यक्तिविकासाकरिता बापाला जर एकापेक्षा ज्यास्त कामें करावीं लागत असलीं तर मुलगा हि आपल्या उपजीविकेकरिता तीं च कामें करील. मुख्यतः तो कोणतें हि काम का करीत असेना, पण थोडा वेळ तरी त्यानें शेतीचें काम करावें असें विनोबाचें सांगणें आहे. कारण शेती हा सर्वोत्तम शरीरश्रम आणि श्रेष्ठ उद्योग आहे. याप्रमाणें जे जे शेतीचें काम करतील ते ते आपल्या उपजीविकेचें अंग म्हणून किंवा सेवेकरिता म्हणून करीत असले तरी त्याचा मुख्य धंदा त्याच्या उपजीविकेला ज्यांतून जास्त मदत होते त्यावर अवलंबून राहील. जर त्याच्या मुख्य धंद्याचें उत्पन्न त्याला पुरेसें असेल तर तो सेवेकरिता च शेतकीचें काम करील. उदाहरणार्थ न्यायाधीश शेतात काम करील ते सेवेकरिता असेल. आपल्याला उत्पन्न कमी आहे, शेतीचें काम करून त्यातून जें मिळेल तें धरून आपल्या उपजीविकेकरिता

जरूर आहे, याकरिता काहीं न्यायाधीश शेती करणार नाहीं. परंतु विणकराला त्याच्या धंद्यातून पुरेसे मिळत नसेल तर शेती हा त्याचा पूरक धंदा होईल.

वर्णव्यवस्थेप्रमाणें सर्व कामाचें आर्थिक मूल्य जरी समान असेल आणि त्याची प्रतिष्ठा हि सारखी असेल तरी बुद्धिजीवी लोक आरोग्याकरिता आणि जीवनविकासाकरिता हळूहळू शेतीचें काम किंवा दुसरें कोणचे तरी शरीर-श्रमाचें काम करायला आकर्षित होतील.

(२) **ट्रस्टीशिप** :– वर्णव्यवस्थेप्रमाणे ट्रस्टी किंवा ट्रस्टीशिपची गोष्ट हि पुष्कळांना चांगली वाटत नाहीं. याचें कारण हे आहे कीं, कायद्याप्रमाणें नेमलेल्या ट्रस्टींमध्यें बऱ्या च क्षेत्रात सातत्याचा अभाव दिसून आला आहे. आणि त्यातल्या पुष्कळांनीं आपल्या सत्तेचा आणि अधिकाराचा दुरुपयोग केल्यामुळें लोकांना त्याबद्दल आदर वाटत नाहीं. म्हणून पुष्कळांना असा संशय येतो कीं, गांधीजींनीं राजे, जमीनदार, भांडवलवाले आणि दुसरे स्वार्थी लोक यांच्या संरक्षणाकरिता ट्रस्टीशिपची सुरुवात केली आहे. त्यांच्याकरता आणखी एक संरक्षणाचें कवच देऊन टाकलें आहे. या संशयाला कसला हि आधार नाहीं. व्यक्तिगतभावें कोणाजवळ थोडी हि संपत्ति रहावी ही गोष्ट गांधींना नको आहे. काहीं असो, कायद्यामध्यें ट्रस्टी शब्दाचा अर्थ आणि उद्देश अत्यंत पवित्र आहे. सत्याग्रही गांधींनीं त्या पवित्र अर्थानें च तो शब्द घेतला आहे. अपरिग्रह, समभाव इत्यादि गीतेंत सांगितलेली भावधारा च त्यांच्या हृदयात बद्धमूल झालेली होती. व्यावहारिक जीवनात ती कशी आचरणात आणावी याचें चिंतन करताना च त्यांनीं ट्रस्टी हा शब्द उपयोगी आहे म्हणून घेतला. कायद्यानें ट्रस्टी शब्दाचा जो अर्थ आहे तो सर्व गांधीजींच्या ट्रस्टीशिपमध्यें अंतर्भूत आहे च, शिवाय नैतिक दृष्टीनें हि जे जे अर्थ त्यात असणें आवश्यक आहे ते हि त्यांनीं त्यात अंतर्भूत केले आहेत. विनोबा ट्रस्टीशिप शब्दाऐवजीं 'विश्वस्त वृत्ति' या शब्दाचा उपयोग करतात. या ठिकाणीं गांधीजींच्या ट्रस्टीशिपच्या सिद्धान्ताच्या मागें कोणचा विचार आहे हें समजून घेणें योग्य होईल.

जगात जें काहीं आहे– स्थावर, जंगम, चेतन, अचेतन, स्थूल, सूक्ष्म, आंतील आणि बाहेरील, दृश्य आणि अदृश्य वगैरे– त्या सर्वांचा मालक

परमेश्वर आहे. मनुष्य पशाचा हि मालक नाहीं. शरीर, मन, बुद्धि, कार्यक्षमता, आणि कुशलता यांचा हि मनुष्य मालक नाहीं. मालकी परमेश्वराची. उदाहरणार्थ, गिरणीचा मालक, तिचा मॅनेजर, डायरेक्टर, भागीदार किंवा तेथें काम करणारे मजूर हि तिचे मालक नाहींत. तिचा मालक परमेश्वर आहे. ज्याच्या ताब्यात जमीन आहे तिचा मालक ती व्यक्ति नाहीं. जमिनीचा मालक भगवान्. केवळ एवढेंच नाहीं, मजुराच्या श्रमशक्तीचा मालक हि मजूर नाहीं. वकिलाच्या बुद्धि शक्तीचा मालक वकील नाहीं. राज्यकर्त्यांच्या राज्यशक्तीचा मालक तो नाहीं. पोलिसाच्या सत्तेचा मालक तो नाहीं. या सर्वांचा मालक ईश्वर आहे. कायद्यामध्यें ट्रस्टीशिपच्या कामात त्या संपत्तीचा मालक असावा लागतो. त्या ट्रस्ट संपत्तीच्या उत्पन्नाचा उपयोग घेणारा Beneficiary हिताधिकारी असावा लागतो. गांधीजींच्या कल्पनेच्या ट्रस्टीशिपमध्यें ट्रस्ट संपत्तीचा मालक असतो ईश्वर आणि त्याचे हिताधिकारी म्हणजे Beneficiary सर्व सृष्टि असते. कारखान्याशीं संबंधित असलेले मजूर, मॅनेजर, भाइंडरवाले वगैरे जे कोणी असतात ते च तेवढे त्या कारखान्याच्या फायद्याचा भोग घेणारे हक्कदार नाहींत. सर्व लोकांचा त्यावर हक्क आहे एवढें च काय, मनुष्येतर जीव हि त्यात भागीदार आहेत. मनुष्याचा त्यात पहिला हक्क आहे एवढें च. ज्याच्याजवळ जें आहे त्या वस्तूबद्दल त्यानें आपल्याला ट्रस्टी समजलें पाहिजे. त्यानें काळजीपूर्वक त्या वस्तूचें रक्षण केलें पाहिजे आणि काटकसरीनें कमींत कमी आपण भोगलें पाहिजे. आपण सेवक आहों असें समजून त्यानें शक्य तेवढें कमी घेऊन उरलेलें सर्व सेवेकरिता समर्पण केलें पाहिजे. आपलें शरीरसुद्धा स्वच्छंदपणानें वागून नष्ट करण्याचा अधिकार कोणाला हि नाहीं, तें हि सर्व सृष्टीच्या सेवेकरिता आहे म्हणून यत्नपूर्वक काळजी घेऊन शरीर सांभाळलें पाहिजे सेवेकरिता त्याचा उपयोग केला पाहिजे आणि सेवेंत च तें विसर्जन केलें पाहिजे. मनुष्याची शक्ति, बुद्धि, कुशलता, कार्यक्षमता, अधिकार वगैरे सर्वच हि ही च गोष्ट आहे. सर्व काहीं समग्र सृष्टीच्या सेवेकरिता आहे. गांधीजी व्यक्तिगत संपत्ति राखून ठेवू इच्छीत नव्हते. पण जोंपर्यंत संपत्तीच्या संग्रहाची प्रथा नाहींशी करण्यात आलेली नाहीं तोंपर्यंत व्यक्तिगत संपत्ति ज्याच्याजवळ राहिली आहे त्यानें तिच्याकडे कोणत्या दृष्टीनें

पद्यानें आणि तोंपर्यंत व्यक्तिगत संपत्ति त्याच्याजवळ कोणत्या भावनेनें रहावी एवढ्यापुरती च ट्रस्टीशिपची आवश्यकता आहे. त्यांनी ट्रस्टीशिपचें स्वरूप सांगितलें आहे. तसें च ट्रस्टींची मनोवृत्ति कशा तऱ्हेची असावी आणि कशाप्रमाणें त्यांनी आचरण करावें हें त्यांनी सांगितलें.

आणखी एक गोष्ट. समजा, ही व्यक्तिगत संपत्ति निघून गेली आहे अथवा ती इतकी कमी झाली आहे कीं, तिचें आता कांहीं महत्त्व उरलें नाहीं. तेव्हा ट्रस्टीशिपच्या सिद्धान्ताचा उपयोग करायला समाजात कांहीं अवकाश राहील कीं नाहीं? तसा राहणार नाहीं. शिक्षण वगैरेच्या योगानें क्रांतीच्या मार्गानें जाणाऱ्या समाजात माणसामाणसामध्यें शारीरिक, मानसिक आणि बौद्धिक शक्ति आणि योग्यता यातली विषमता कमी करिता येईल, परंतु पुष्कळ दिवसपर्यंत ती पूर्ण नाहींशी होणार नाहीं. अर्थात् मनुष्यानें पुष्कळ काळपर्यंत आपल्याला आपलें शरीर, मन आणि बुद्धि याचे ट्रस्टी समजून त्याप्रमाणें आचरण करावें आणि त्या सर्वांचा सेवेंत उपयोग करावा.

कायद्यामध्यें अज्ञानाची संपत्ति ट्रस्टीच्या हातात दिल्यावर जेव्हा तो सज्ञान वयात येतो तेव्हा ती संपत्ति त्याला परत देणें ट्रस्टीचें कर्तव्य असतें. जोंपर्यंत देशात लोकसंख्या कमी होती आणि जमीन पुष्कळ होती तोंपर्यंत जमिनीचा प्रश्न उत्पन्न झाला नाहीं. नंतर उत्तरोत्तर द्रुत वेगानें लोकसंख्या वाढून तिच्या दडपणामुळें कोट्यवधि भूमिहीन दरिद्री लोक निर्माण झाले. परंतु ते इतके दिवस असहाय होते, निद्रित होते. आता ते जागे झाले आहेत. कोट्यवधि भूमिहीन अज्ञान आज वयात आले आहेत, ते सज्ञान झाले आहेत. म्हणून आता भूमिवान् ट्रस्टी लोकाचें कर्तव्य आहे कीं, हिताधिकारी ( Beneficiary ) भूमिहीन गरीब लोक आहेत त्याना जमीन परत द्या हें च भूदान यज्ञाचें मागणें आहे.

कोणी कोणी गांधीजींच्या ट्रस्टीशिप शब्दाचा अर्थ चुकीचा करतात म्हणून विनोबांनी ट्रस्टीशिप सिद्धान्ताच्या अर्थावर नवीन प्रकाश टाकला आहे. ते म्हणतात, " मी असें सांगू इच्छितों कीं, कित्येक लोक गांधीजींच्या ट्रस्टीशिप शब्दाचा चुकीचा अर्थ करतात. ट्रस्टीशिपचा पहिला सिद्धान्त

असा आहे कीं, ट्रस्टी आपणाला बापाचे ठिकाणीं मानील. बाप आपल्या स्वतःपेक्षा मुलाच्या भरणपोषणाची आणि संरक्षणाची जास्त चांगली व्यवस्था करतो. कुणी च बाप असें म्हणत नाहीं कीं, मी स्वतःची जेवढी व्यवस्था केली आहे तितकी च मुलाची करीन. उलट बाप म्हणतो कीं, स्वतःपेक्षा मुलाची च काळजी मला अधिक केली पाहिजे. असा ट्रस्टी आपल्याला पित्याप्रमाणें च समजेल. परन्तु एवढ्यानें च केवळ ट्रस्टीशिपचा उद्देश पूर्ण होत नाहीं. ट्रस्टीशिपचा दुसरा सिद्धान्त असा आहे कीं, मुलगा लवकरात लवकर आपल्याबरोबरीचा व्हावा, आपल्याबरोबरीची योग्यता त्याला मिळावी आणि त्यानें आपल्या पायावर उभें रहायला शिकावें असें च बापाला वाटेल. ह्याप्रमाणें गांधीजींचा सिद्धान्त अत्यन्त गंभीर आहे. म्हणून समाजाचें थोडेंफार परिवर्तन करून काहीं थोडी सुधारणा करून ट्रस्टीशिपचा उद्देश पूर्ण होणार नाहीं. मालक आणि मजूर हे वर्ग कायम राखण्याकरितां मजुरांची मजुरी वाढविली जाईल, मालक मालक च राहील आणि मजुराला मजूर च राखण्यात येईल. अशा स्थितींत ट्रस्टीशिप हि असणार नाहीं आणि सर्वोदय हि होणार नाहीं.

( ३ ) विकेंद्रीकरणः—विकेंद्रीकरणासंबंधीं दुसऱ्या ठिकाणीं विवेचन आलें आहे. या ठिकाणीं एक दोन विषयांचा मात्र उल्लेख करण्याची जरूरी आहे.

( क ) यंत्रयुगाचा उदय होण्यापूर्वी देशाची अर्थव्यवस्था तसें च उद्योग विकेंद्रित होते. हल्लीं ही जी विकेंद्रीकरणाची गोष्ट बोलली जाते तिच्यामध्यें कोणता नवीनपणा तो काय असणार आहे? या शंकेचें निरसन करणें जरूर आहे. यंत्रयुग येण्यापूर्वी सर्व काहीं विकेंद्रित होतें खरें परंतु विकेंद्रित व्यवस्था होती असें नाहीं. त्या काळीं उद्योग पसरलेले मात्र होते. त्याच्यामागें काहीं नीट योजिलेली व्यवस्था नव्हती किंवा काहीं संघटना हि नव्हती. म्हणून यंत्रयुगाच्या पहिल्या आघातानें च सर्व उद्योग चूर्ण झाले, मोडून पडले. नवीन समाजरचनेमध्यें नीट योजिलेली विकेंद्रीकरणाची व्यवस्था राहील. यंत्रयुगानें आणि विज्ञानाने जे नवीन शोध केले आहेत ते सर्व कामात आणले जातील आणि शक्तिसंचय करण्यासारखें जें काहीं त्याच्यात आहे तें सर्व घेऊन ही व्यवस्था अधिक बलशाली होईल. यंत्रयुग किंवा विज्ञान यांनीं

घेतलेले नवीन शोध घेताना कोणत्या हि तऱ्हेची बेकारी, आळस किंवा बुद्धीची जडता निर्माण होणार नाहीं याच्याकडे मात्र लक्ष दिलें जाईल. याप्रमाणें यंत्रयुगात घेण्यासारखे जे असेल तें सर्व विकेंद्रित व्यवस्थेत हि घेतलें जाईल. पूर्वकालीं जे विकेंद्रित उद्योग होते त्याच्यामध्ये ही शक्ति नव्हती. समग्र दृष्टि ठेवून त्याच्यांसमोर कसली व्यापक योजना हि नव्हती. नवीन विकेंद्रीकरण व्यवस्था यंत्रयुगात जें कांहीं चागलें आहे ते पचवून टाकील व शेवटीं यंत्रयुगाला खाऊन टाकील. पूर्वकालीन विकेंद्रित उद्योग आणि नवीन विकेंद्रीकरणाची योजना यामध्यें हा मोठा फरक आहे.

( ख ) विकेंद्रीकरणाचा अर्थ फक्त उद्योगाचें विकेंद्रीकरण एवढा च नाहीं. राज्यशक्तीचें विकेंद्रीकरण हि त्यात अंतर्भूत आहे. शिवाय समाजाचीं जीं कांहीं क्षेत्रें आहेत, ज्या क्षेत्रात सत्ता केंद्रीभूत झाली आहे, तिचें हि विकेंद्रीकरण करणें त्यात अंतर्भूत आहे.

## ( ९० ) सूतांजलि

महात्मा गांधींचा पहिला श्राद्धदिवस १९४९ सालच्या १२ फेब्रुवारी या दिवशीं देशात सर्व ठिकाणीं पाळण्यात आला. महात्मा गांधींच्या देहावसानानंतर त्याचें कार्य चागल्या प्रकारें चालविण्याकरिता काय व्यवस्था केली जावी यासंबंधीं विचार करण्याकरिता १९४८ सालच्या मार्च महिन्यात सेवाग्राम येथें विधायक कार्यकर्त्यांचें एक संमेलन भरलें होतें. या संमेलनात गांधीजींची विचारधारा ज्याना मान्य आहे त्याचा एक 'भाईचारा' ( Brotherhood ) किंवा 'भ्रातृसमाज' स्थापन करण्यात आला. त्याचें नाव सर्वोदयसमाज. सर्वोदय समाजाच्या सिद्धान्तानुसार सर्वोदय कल्पनेचा व्यापक प्रचार करण्याकरिता दरवर्षी १२ फेब्रुवारी या तारखेला देशामध्यें ठिकठिकाणीं मेळे भरत असतात. सूतांजलि समर्पण करणें हा या मेळ्यामध्यें प्रधान कार्यक्रम असतो. गांधीजींच्या पुण्यस्मृतीवर ज्याची श्रद्धा आहे आणि ज्याना शरीरश्रमाचें ध्येय मान्य आहे त्या प्रत्येकानें स्वतः कातलेलें एक गुंडी सूत सर्वसेवासंघाला अर्पण करावयाचें.

सूतांजलीचा कार्यक्रम हा स्वावलंबी ग्रामरचना करणें आणि शासनमुक्त समाजाची स्थापना करणें याकरिता एक अपरिहार्य

कार्यक्रम आहे. कारण ( १ ) सूताजलीचा प्रचार जर सर्व देशात झाला तर एक धर्ममय उपासना चालू होईल. त्यामुळें सामान्य लोकांना आध्यात्मिक दृष्टीचा लाभ होईल. ( २ ) सर्वोदय स्थापन करण्याकरिता शरीरश्रमाचा आदर्श अनुसरण करणें अपरिहार्य आहे. सूत कातणें हें द्रोहरहित उत्पादक श्रमाचें प्रतीक आहे. म्हणून सूतगुंडी ही च श्रमयज्ञाला योग्य आहुति आहे. ( ३ ) स्वतः कातलेलें सूत समर्पण करणें हें स्वयंपूर्ण ग्रामराज्य आणि सर्वोदय याच्या बाजूनें व्होट म्हणजे मत देण्यासारखें आहे. एक च गुंडी द्यावयाची आहे, त्यापेक्षा जास्त नाहीं. कारण, त्यावरून समजून येईल की, जितक्या गुंड्या मिळाल्या तितक्या लोकांनीं सर्वोदयाचें समर्थन केलें आहे आणि त्याच्या बाजूनें मत दिलें आहे. सूताजलीच्या रूपानें पैसा जमविण्याचा उद्देश जर त्यामध्यें असता तर एकाकडून एकापेक्षा जास्त गुंड्या घेण्याला निषेध करण्यात आला नसता. सूताजलिसमर्पणामध्यें जी विराट् शक्ति सुप्त आहे ती अजून हि लोकांच्या ध्यानात आलेली नाहीं. प्रत्येक मेळ्यामध्यें सुताचे डोंगर जमा होत आहेत अशी कल्पना करा. तसें होईल तर मनामध्यें कसलें चित्र उभें राहील ? विनोबा म्हणतात, " या योगानें मनात येईल कीं, हनुमान जणूं द्रोणागिरी पर्वत च घेऊन येत आहे. "

सर्वोदयाचें रूप ग्रामोद्योगप्रधान असेल. खादी ही ग्रामोद्योगाचें केंद्र आहे. महात्मा गांधींनीं खादीला ग्रामोद्योगाच्या सूर्यमंडळातील सूर्य असें नाव दिलें आहे. स्वातंत्र्यचळवळीच्या वेळीं खादीला स्वातंत्र्याचा गणवेश ( Livery of Freedom ) म्हटलें जात असे. विनोबा म्हणतात, आता खादी ही साम्ययोगाचें संकेतचिन्ह होऊं शकेल. म्हणून सूताजलि सर्वोदय साध्य करण्याच्या कार्यक्रमात हळूहळू मुख्य स्थान घेईल यात संशय नाहीं. ज्या भूमिहीन गरिबांना जमीन दिली जात आहे किंवा पुढें दिली जाईल ते जेव्हा विचार समजून घेऊन श्रद्धापूर्वक नियमितपणें गुंडी अर्पण करीत राहतील तेव्हा च भूमिवितरणाचा उद्देश सार्थ झाला असें म्हणता येईल.

## (९१) समन्वय

बुद्धगया सर्वोदय संमेलनाची एक मोठी देणगी म्हणजे विनोबांनीं बुद्धगया येथें केलेली समन्वय आश्रमाची स्थापना. विनोबांना बुद्धगया येथें समन्वय आश्रम नावाचा आश्रम स्थापण्याची इच्छा होती. वेदान्ताचें सत्य आणि बौद्धांची अहिंसा यांचा समन्वय करणें हें त्याचें ध्येय होतें. म्हणून विनोबांना वाटलें, बुद्धगयेच्या जगद्विख्यात बौद्धमंदिराजवळ आश्रमाकरिता थोडी जमीन मिळेल तर चांगलें होईल. त्या ठिकाणीं सहज जमीन मिळण्यासारखी नव्हती. परंतु परमेश्वराची लीला अशी कीं, विनोबांना पाहिजे होती त्या च ठिकाणी पांच बिघे जमीन मिळाली. ही जमीन स्थानिक शांकर संप्रदायाच्या मठाकडून हा आश्रम स्थापन करण्याकरिता मोठ्या आनंदानें देण्यात आली. जमीन बुद्धगया मंदिराच्या अगदीं जवळ होती. शिवाय तेथून शांकरमठाशीं संबंध ठेवणें हि सुलभ होतें. संमेलनाच्या प्रारंभीं च काकासाहेब कालेलकर यांनीं समन्वयाचें विवेचन करणारें एक महत्त्वाचें भाषण केलें. विनोबांच्या प्रेरणेनें संमेलनाकरिता आलेल्या प्रतिनिधींनीं आणि कार्यकर्त्यांनीं २० एप्रिल १९५४ या दिवशीं दिवसरात्र श्रम करून त्या जमिनींत एक निर्धार म्हणून देऊन सदर आश्रमाचा पाया घातला. संमेलनाकरिता ज्या झोपड्या बांधलेल्या होत्या त्या काढून त्यांचे बांबू, गवत वगैरे सामान घेऊन २२ एप्रिल रोजीं एका रात्रींत त्या जमिनीवर विनोबांकरिता एक झोपडी बांधून दिली. २३ एप्रिल रोजीं पहाटे विनोबा संमेलनाच्या स्थानाहून निघाले आणि त्या झोपडींत तीन दिवस राहून आश्रम स्थापन करण्याच्या शुभकार्याला त्यांनीं सुरुवात केली. हें तर झालें, पण खरी स्थिति काय होती? हा आश्रम स्थापन करण्याची कल्पना कोणाची? याचें मूळ काय आहे? शिवाय विनोबांचा सध्याच्या कार्यक्रमाशीं त्याचा कांहीं संबंध आहे का? दहा वर्षांपूर्वी विनोबा जेव्हा शिवणी जेलमध्यें होते तेव्हा त्यांनीं तेथें गीतेंतल्या स्थितप्रज्ञाच्या श्लोकांवर व्याख्यानें दिलीं, तीं 'स्थितप्रज्ञदर्शन' म्हणून पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालीं आहेत. या व्याख्यानांच्या वेळीं बौद्धांचा 'निर्वाण' आणि वेदान्ताचा 'ब्रह्मनिर्वाण' या शब्दांचा समन्वय करण्याची आवश्यकता त्यांनीं सांगितली होती. आणि त्या व्याख्यानांत त्यांनीं तिचा

समन्वय करुन दाखविला होता. या समन्वयासंबंधीं ' स्थितप्रज्ञदर्शन ' या पुस्तकात खालीलप्रमाणें दिलें आहे : " वस्तुतः हीं दोन्ही एक च आहेत. बौद्धाना ' निर्वाण ' हा निषेधक शब्द आवडला आणि गीतेने ' ब्रह्म-निर्वाण ' हा विधायक शब्द वापरला. सूक्ष्म पाहिलें असता ' ब्रह्मनिर्वाण ' शब्द केवळ विधायक नाहीं. तो निषेधक अर्थाला पोटात गुंडाळून निषेधक आहे. तो उभय अर्थांचा संग्राहक अशा कल्पनेनें च गीतेनें योजला आहे. ब्रह्मनिर्वाण म्हटल्यानंतर ' मी ' गेला. ब्रह्म उरलें त्यात भिण्यासारखें काहीं च नाहीं. जेथें शब्द च खुटले तेथे शब्दाकरिता वाद काय घालायचा ? गीतेच्या भाषेंत मी तर असें म्हणेन, ' एकं ब्रह्म च शून्यं च यः पश्यति स पश्यति ' जो ब्रह्म आणि शून्य एक पाहतो तो च पाहतो. म्हणून ब्रह्मनिर्वाण शब्दानें सर्व वाद संपविला आहे."

बिहारमध्यें भूदान यज्ञ यशस्वी करण्याच्या मुळाशीं पुष्कळ लोकाची श्रद्धा, तपश्चर्या आणि एकाग्रनिष्ठा होती हें खरें, परंतु विनोबाना वाटलें कीं, या सगळ्याचें मूळ भगवान् बुद्धाच्या पुण्यस्मृतीची प्रेरणा ही च आहे. या कारणामुळें आपणाला बुद्धगया येथें समन्वयाश्रम स्थापन करण्याची प्रेरणा मिळाली असें त्याना वाटतें. भूदान यज्ञाचा कार्यक्रम ज्या परमध्येयाकडे बोट दाखवीत आहे त्यावरुन समन्वयाश्रम स्थापण्याची प्रेरणा मिळाली हें खालील विवेचनावरुन क्रमशः स्पष्ट होईल.

एकमात्र ईश्वर आहे. दुसरें काहीं नाहीं हें परम सत्य आहे. वेदान्त प्रतिपादन करीत आहे कीं, हें सारें ईश्वरमय आहे. हें सत्य प्राप्त झालें तर जीवनात अहिंसेची स्थापना झाल्याशिवाय राहत नाहीं. कारण, जर हिंसा केली तर ती हिंसा आपला च नाश करील. सर्व ठिकाणीं एक च आत्मा आणि एक च ईश्वर आहे. समन्वयाची गोष्ट समजावून देताना विनोबानीं त्याचें फार सुंदर विवेचन केलें आहे. " वेदान्त आणि अहिंसा या दोन्ही गोष्टी एकमेकाच्या अविरोधी आहेत. त्या एकमेकाचें कार्यकारण आहेत. वेदान्तापासून च स्थूलपणें अहिंसेचें प्रतिबिंब उमटत असतें आणि अहिंसा ग्रहण केल्याशिवाय वेदान्ताला कोणता हि मजबूत पाया असत नाहीं. दुसऱ्यापक्षीं वेदान्ताचा आधार सोडल्यास अहिंसा दृढ होऊ शकणार नाहीं. ही समग्र प्रक्रिया गीतेच्या एका श्लोकात थोडक्यात सांगितली आहे.

समान सर्व भूतांत राहिला परमेश्वर ।
आत्म्याची न करी हिंसा, गति उत्तम मेळवी ॥ ”

माणूस सर्व ठिकाणीं परमेश्वराचें अस्तित्व समान रूपानें पाहतो हा झाला वेदान्त. आणि त्याचा परिणाम म्हणून तो कोणत्या हि तऱ्हेची हिंसा करीत नाहीं. कारण हिंसा करण्याकरितां जो तलवार उचलतो तो आपल्यावर च आघात करण्याकरितां उचलीत आहे असें त्याला वाटेल म्हणून जो याप्रमाणें आत्महिंसा करणार नाहीं त्याला उत्तम गति मिळेल. मूळ पाया हा आहे कीं, परमेश्वराचें समानदर्शन अर्थात् वेदान्त. त्याच्यापासून च जीवननिष्ठा म्हणून अहिंसा मनात वाणते आणि तिचा शेवटचा परिणाम परमगति हा असतो. याप्रमाणें गीतेच्या या एका अद्भुत श्लोकानें सर्व विश्वाचा आवश्यक समन्वय आदिपासून अंतापर्यंत, पायापासून शिखरापर्यंत, वर्णिला आहे. हें समन्वयाचें तत्त्व सांगतांना विनोबा आणखी म्हणतात, “ सर्वांगीण समग्र सत्य दर्शन आणि त्याच्याबरोबर च अहिंसा याला वेदान्त म्हणतात. आपण जीवनात आणि तत्त्वज्ञानात या दोन तत्त्वांचा समन्वय साधला पाहिजे. जीवनात आणि तत्त्वज्ञानात जे प्रयत्न करण्यात आले त्यांतून एक बाजू च मात्र दिसली आहे, परिपूर्णता मिळाली नाहीं. परिपूर्णतेला आपण कदाचित् कधीं च पोहोंचणार नाहीं. काहीं असो, परमेश्वरानें आज आपल्याला एक महान् कार्यक्रम आखून दिला आहे. भूदान यज्ञ आपल्याला त्या दिशेनें कोठपर्यंत घेऊन जाईल याचें अनुमान करणें शक्य नाहीं. परंतु आपण एकामागून एक पाऊल टाकीत चाललें पाहिजे. यासंबधीं एक सांस्कृतिक केंद्र स्थापन करण्याची कल्पना माझ्या मनात आहे. त्याचें नांव ‘ समन्वय आश्रम ’ किंवा ‘ समन्वय मंदिर ’ असें काहीं असावें.

“ एक ईश्वर च आहे, बाकी सर्व शून्य. आम्ही हि शून्य. ईश्वराच्या पोटात आणि त्याच्या लीलेमुळें आपल्याला हीं सर्व रूपें मिळालीं आहेत. शून्याला हि रूप असतें. त्याला हि एक आकार दिसून येतो. तें निराकार नाहीं. त्याप्रमाणें च आम्हाला हि आकार मिळाला आहे. म्हणून आपण शून्य होऊन गेलें पाहिजे.”

आपल्याला सर्वोदयाच्या रचनेंतून सामुदायिक अहिंसा स्थापन करायची आहे. *आत्म्याचें एकत्वदर्शन हा सामुदायिक अहिंसेचा पाया आहे. सर्व*

जितका विकास झाला आहे तितका आणखी कोठे हि नाहीं. कदाचित् सुफी लोकांमध्यें असा विकास झालेला असावा. परंतु ह्या ध्यानयोगाच्या साधनेंत एक कमीपणा राहून गेला आहे. श्रमविमुख आणि कर्मविमुख होऊन– श्रम आणि कर्म करायचें सोडून– एकान्तात ही साधना केली जात असे. याचा अर्थ असा नाहीं कीं, हे सर्व साधक आळशी होते. ते श्रम तर करीत च. त्यांची जीवनयात्रा अत्यंत कठोर होती. परंतु ते उत्पादक परिश्रम करीत नव्हते. अशी समजूत होती कीं, ध्यानयोगाकरिता कर्मांचा त्याग करणें आवश्यक आहे. म्हणून साधक वर्ग श्रमविमुख होऊन गेला. समाजात उत्पादनश्रमाची प्रतिष्ठा कमी झाली. समाजानें या सर्व साधकांच्या भरणपोषणाचा भार घेतला. या क्षणीं माझी अशी इच्छा आहे कीं, असे साधक निर्माण करायचे कीं, जे आपल्या भरणपोषणाचा भार समाजावर टाकणार नाहींत. आपण च उत्पादक श्रम करतील ह्या उत्पादक शरीर-श्रमाला मी ' ब्रह्मकर्म ' म्हणतो. साधक काम करीत आहेत असें बाह्य दृष्टीनें म्हणजे बघून बघून दिसेल, परंतु त्या कर्मांचा भार त्यांच्या मनावर पडलेला असणार नाहीं. आपण श्वास घेत असलेले दिसतों; परंतु श्वास घेताना आपल्याला कोणते हि कष्ट असत नाहींत. त्याप्रमाणें साधक ' ब्रह्मकर्म ' करीत राहील खरा परंतु अंतःकरणात अखंडपणें ध्यानमग्न राहील त्याप्रमाणें श्वास घेत आहों याची आपणाला जाणीव च असत नाहीं त्याप्रमाणें अविरत कर्म करीत असून हि साधकाला त्याची जाणीव हि असणार नाहीं. कर्मामुळें त्याच्या समाधीचा भंग होणार नाहीं.

" संन्यास घेतल्यानंतर अखंडपणें भ्रमण करीत फिरणें याप्रमाणें ज्ञानाचा प्रसार करणाऱ्या सेवकांची समाजाला नेहमीं आवश्यकता राहिली आहे. हिंदु संन्यासी, बौद्ध भिक्षुगण, जैनांचे मुनि, तसे च दुसरे साधुसंत यांनीं भारतात ही परिव्राजक धर्माची परंपरा अखंड राखली आहे; या परि-व्राजकांच्या तपश्चर्येमुळें आपली संस्कृति इतकी विविध, समृद्ध आणि प्राणवान् झाली आहे. तिला किती तरी आघात सहन करावे लागले आहेत तरी ती जिवन्त राहिली आहे. अनासक्त वृत्तीनें गावोगावीं ज्ञानाचा प्रसार करीत फिरणाऱ्या सेवकांची खूप च आवश्यकता आहे. या कामीं समन्वय आश्रम

साहाय्य देऊ शकेल. आजपर्यंत हा परिव्राजकवर्ग भिक्षावृत्तीनें आपली जीवनयात्रा चालवीत असे. ज्यानीं समाजात भिक्षावृत्तीचा आरंभ केला ते रवत. उच कोटीचे साधक होते. भिक्षावृत्तीनें जीवनयात्रा केली तर साधकाची उन्नति तर होते च. जनसंपर्क आणि जनताजनार्दनाचा दर्शनलाभ करण्याचा तो निःसंशय उपाय आहे. मी या भिक्षावृत्तीबरोबर शरीर-श्रमाच्या मताला जोडून देऊ इच्छितो. परिव्राजक जेथे जाईल तेथें कांहीं ना कांहीं उत्पादक परिश्रम अवश्य करील.

"ह्या श्रमानंतर जें कांहीं उत्पन्न होईल त्याच्यावर आपला अधिकार आहे असें तो समजणार नाहीं. हें उत्पादन तो समाजाला अर्पण करून टाकील आणि जीवनधारणाकरिता जेवढ्याची जरुरी असेल तेवढें च नम्रपणें ग्रहण करील. जर याप्रमाणें भिक्षावृत्तीबरोबर श्रमकर्म जोडून दिलें जाईल आणि ध्यानयोग आणि कर्मयोग यांची अभिन्नता साधण्याकरिता प्रयत्न केले जातील तर जीवनात एक नवीन प्रकाश येईल.

"अशा क्षेत्रात साधकाची साधना सामूहिक साधनेंत परिणत होईल. साधकाला हें ज्ञान होईल कीं, समाजाशीं त्याचा अभेद्य संबंध आहे आणि तो समाजरूपी Living Organism चा एक अविभाज्य भाग आहे. पाण्याच्या थेंबाचें जीवन ज्याप्रमाणें समुद्राशीं समरस होऊन जातें त्याप्रमाणें मनुष्याचें जीवन हि समाजात समरस होऊन जाणें शक्य आहे. दोन परिस्थितीत मनुष्याचें जीवन समाजाहून वेगळें होऊ शकतें. एक अवस्था आहे मृत्यु आणि दुसरी अवस्था आहे मुक्ति. समाजापासून वेगळें राहून जिवंत राहणें शक्य नाहीं."

## (९२) विनोबांची प्रज्ञा स्वतंत्र आहे

भूदान यज्ञाचें मूळ गांधींच्या च विचारात आहे. ह्या गोष्टीचा आम्हीं अनेकवार उल्लेख केलेला आहे, परंतु विनोबानीं ज्या प्रकारें तो देशापुढें ठेवला आहे तो मौलिक आहे. त्याचें विवेचन करण्याची त्याची स्वतःची एक विशेष तऱ्हा आहे. ज्या गंभीर आध्यात्मिकतेच्या दृष्टिकोनातून भूदान-यज्ञाचा वेगवेगळ्या बाजूनीं त्यानीं तो विचार मांडला आहे त्यात त्यांची

विशेषता आहे. विनोबा गांधींचें अपुरें कार्य करीत आहेत खरें परंतु विनोबाच्या त्या कार्याच्या सूक्ष्म भागावर हि मौलिक छाप पडलेला आहे. ते गांधींचें अनुकरण करीत नाहींत. त्यांचा मार्ग मौलिक आहे, स्वतंत्र आहे. गांधीतत्त्वज्ञानावर त्यांनीं एक नवीन प्रकाश टाकून आमच्यासमोर तें तत्त्वज्ञान ठेवले आहे. विनोबांना समजून घ्यायचें असेल तर ही गोष्ट लक्ष्यांत ठेवली पाहिजे. त्यांनीं जेथून कोठून जे मिळालें तें सर्व आपलेंसें करून टाकलें आणि तें जेव्हा त्यांच्या मुखांतून येतें तेव्हा वाटतें कीं, कांहीं अभिनव गोष्ट च आपण ऐकत आहों. हें च विनोबांचें वैशिष्ट्य आहे. विनोबांनीं गांधींच्याजवळून पुष्कळ मिळवलें तसें च दुसऱ्या ठिकाणाहून हि पुष्कळ मिळवलें. याप्रमाणे एका प्रश्नाच्या उत्तरांत त्यांनीं १९४८ सालीं जें सांगितलें त्यावरून विनोबांचें मौलिकत्व विशेष स्पष्ट होतें. ते म्हणतात, " गांधीजींजवळून मला तर पुष्कळ च मिळालें, परंतु त्याच्याशिवाय दुसऱ्याजवळून हि पुष्कळ च मिळालें आहे. त्यांच्याजवळून जें मिळालें तें मीं माझें करून घेतलें आहे. आतां तें सर्व माझें च भाववल झालेलें आहे त्यामध्यें गांधींनीं दिलेलें किती आणि दुसऱ्यांनीं दिलेलें किती याचा वेगळा हिशोब मजजवळ नाहीं. जे विचार मीं ऐकले आणि जे मला चांगले वाटले आणि जे मीं पचवून टाकले ते आतां माझे होऊन गेले आहेत. ते आतां वेगळे कसे करायला येतील? मीं केळें खाल्लें तें मीं पचवून टाकलें त्याचें मांस माझ्या शरीरावर चढून गेलें. आतां तें केळें पुन्हा कोठून मिळेल? त्याचें तर माझ्या शरिराचें रक्तमांस होऊन गेलें आहे. त्याप्रमाणें जे विचार मीं ग्रहण केले आहेत ते माझे च झाले आहेत."

## ( ९२ ) आंदोलनाचें भावी स्वरूप

एक ध्येय स्थिर करून घोषणा केली गेली आहे कीं, १९५७ सालअखेरपर्यंत अहिंसात्मक उपायांनीं देशांतील जमिनीचा प्रश्न सुटला पाहिजे. अर्थात् जमिनीची सध्याची विषमता दूर केली पाहिजे ही गोष्ट पूर्वीं च सांगितली आहे. ज्या मूलभूत विचाराच्या पायावर जमीनवाटपातील विषमता दूर करायची तो असा कीं, जमिनीवर कोणाची व्यक्तिगत मालकी राहणार नाहीं. गांवच्या जमिनीचा मालक गांव च राहील. जी व्यक्ति आपल्या हातानें च

साहाय्य देऊ शकेल. आजपर्यंत हा परिव्राजकवर्ग भिक्षावृत्तीनें आपली जीवनयात्रा चालवीत असे. त्यांनीं समाजात भिक्षावृत्तीचा आरंभ केला ते स्वत उच्च कोटीचे साधक होते. भिक्षावृत्तीनें जीवनयात्रा केली तर साधकाची उन्नति तर होते च. जनसंपर्क आणि जनताजनार्दनाचा दर्शनलाभ करण्याचा तो निःसंशय उपाय आहे. मी या भिक्षावृत्तीबरोबर शरीर-श्रमाच्या मताला जोडून देऊ इच्छितो. परिव्राजक जेथें जाईल तेथें कांहीं ना कांहीं उत्पादक परिश्रम अवश्य करील.

"ह्या श्रमातून जें कांहीं उत्पन्न होईल त्याच्यावर आपला अधिकार आहे असें तो समजणार नाहीं हें उत्पादन तो समाजाला अर्पण करून टाकाल आणि जीवनधारणाकरिता जेवढ्याची जरूरी असेल तेवढें च नम्रपणे ग्रहण करील जर याप्रमाणें भिक्षावृत्तीबरोबर यज्ञकर्म जोडून दिलें जाईल आणि ध्यानयोग आणि कर्मयोग याची अभिन्नता साधण्याकरिता प्रयत्न केले जातील तर जीवनात एक नवीन प्रकाश येईल

"अशा क्षेत्रात साधकाची साधना सामूहिक साधनेंत परिणत होईल. साधकाला हें ज्ञान होईल कीं, समाजाशीं त्याचा अभेद्य संबंध आहे आणि तो समाजरूपी Living Organism चा एक अविभाज्य भाग आहे. पाण्याच्या थेंबाचें जीवन ज्याप्रमाणें समुद्राशीं समरस होऊन जातें त्याप्रमाणें मनुष्याचें जीवन हि समाजात समरस होउन जाणें शक्य आहे. दोन परिस्थितींत मनुष्याचे जीवन समाजाहून वेगळें होऊ शकतें एक अवस्था आहे मृत्यु आणि दुसरा अवस्था आहे मुक्ति. समाजापासून वेगळें राहून जिवंत राहणें शक्य नाहीं"

## (९२) विनोबांची प्रज्ञा स्वतंत्र आहे

भूदान यज्ञाचें मूळ गांधींच्या च विचारात आहे. ह्या गोष्टीचा आम्हीं अनेकवार उल्लेख केलेला आहे, परंतु विनोबांनीं ज्या प्रकारें तो देशापुढें ठेवला आहे तो मौलिक आहे. त्याचें विवेचन करण्याची त्यांची स्वत ची एक विशेष तऱ्हा आहे ज्या गंभीर आध्यात्मिकतेच्या दृष्टिकोनातून भूदान यज्ञाचा वेगवेगळ्या बाजूंनीं त्यांनीं तो विचार मांडला आहे त्यात त्यांची

विशेषता आहे. विनोबा गांधींचें अपुरें कार्य करीत आहेत खरें परंतु विनोबाचा त्या कार्याच्या सूक्ष्म भागावर हि मौलिक छाप पडलेला आहे. ते गांधींचें अनुकरण करीत नाहींत. त्यांचा मार्ग मौलिक आहे, स्वतंत्र आहे. गांधीतत्त्वज्ञानावर त्यांनीं एक नवीन प्रकाश टाकून आमच्यासमोर तें तत्त्वज्ञान ठेवलें आहे. विनोबांना समजून घ्यायचें असेल तर ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. त्यांनीं जेथून कोठून जें मिळालें तें सर्व आपलेंसें करून टाकलें आणि तें जेव्हां त्यांच्या मुखांतून येतें तेव्हां वाटतें कीं, कांहीं अभिनव गोष्ट च आपण ऐकत आहों. हें च विनोबांचें वैशिष्ट्य आहे. विनोबांनीं गांधींच्याजवळून पुष्कळ मिळवलें तसें च दुसऱ्या ठिकाणाहून हि पुष्कळ मिळवलें. याप्रमाणें एका प्रश्नाच्या उत्तरांत त्यांनीं १९४८ सालीं जें सांगितलें त्यावरून विनोबांचें मौलिकत्व विशेष स्पष्ट होतें. ते म्हणतात, "गांधीजींजवळून मला तर पुष्कळ च मिळालें, परंतु त्यांच्याशिवाय दुसऱ्याजवळून हि पुष्कळ च मिळालें आहे. ज्यांच्याजवळून जें मिळालें तें मीं माझें करून घेतलें आहे. आतां तें सर्व माझें च भाडवल झालेलें आहे. त्यामध्यें गांधींनीं दिलेलें किती आणि दुसऱ्यांनीं दिलेलें किती यांचा वेगळा हिशोब मजजवळ नाहीं. जे विचार मीं ऐकले आणि जे मला चांगले वाटले आणि जे मीं पचवून टाकले ते आतां माझे होऊन गेले आहेत. ते आतां वेगळे कसे करायला येतील? मीं केळें खाल्लें तें मीं पचवून टाकलें. त्याचें मांस माझ्या शरिरावर चढून गेलें. आतां तें केळें पुन्हा कोठून मिळेल? त्याचें तर माझ्या शरिराचें रक्तमांस होऊन गेलें आहे. त्याप्रमाणें जे विचार मीं ग्रहण केले आहेत ते माझे च झाले आहेत."

## (९३) आंदोलनाचें भावी स्वरूप

एक ध्येय स्थिर करून घोषणा केली गेली आहे कीं, १९५७ सालअखेरपर्यंत अहिंसात्मक उपायांनीं देशांतील जमिनीचा प्रश्न सुटला पाहिजे. अर्थात् जमिनीची सध्याची विषमता दूर केली पाहिजे ही गोष्ट पूर्वीं च सांगितली आहे. त्या मूलभूत विचाराच्या पायावर जमीनराष्ट्रांतील विषमता दूर करायची तो अशा रीं, जमिनीवर कोणाची व्यक्तिगत मालकी राहणार नाहीं. गांवच्या जमिनीचा मालक गांव च राहील. जी व्यक्ति आपल्या हातानें च

शेती करू इच्छील त्या व्यक्तीला जमीन मिळेल. हा एक महान् क्रांतिकारक विचार आहे. हा अमलात आणण्याचें कार्य हि एक महान् क्रांतीचें कार्य आहे. जनमनात आमूलाग्र परिवर्तन होईल तेव्हा च क्रांति होणें शक्य आहे. सर्व-सेवासंघ भूदान यज्ञ आंदोलनाचें चालकत्व आणि त्याची सर्व व्यवस्था करीत आहे. परंतु विनोबाना वाटतें कीं, एखाद्या संस्थेच्या सीमेंत बांधून ठेवून क्रांति करणें शक्य नाहीं. म्हणून त्यांची इच्छा आहे कीं, आंदोलनाची जबाबदारी लोकांवर च सोंपवावी. त्यामुळें आंदोलन व्यापक होईल आणि क्रांति हि सहज घडून जाईल. आज गांधीस्मारकनिधीकडून पैसा घेऊन आंदोलनाचा खर्च भागविला जातो. आंदोलनाला संस्थानिरपेक्ष करायचें असेल तर अशा केंद्रित संस्थेकडून अर्थसाहाय्य घेणें ही गोष्ट बंद करणें जरूर आहे. आंदोलनाची जबाबदारी सामान्य लोकांनीं घेतली तर पैशाची विशेष जरूरी लागणार नाहीं. तरी हि सर्व समय देणाऱ्या कार्यकर्त्यांची आर्थिक व्यवस्था न करून चालणार नाहीं. संपत्तिदान यज्ञात मिळालेल्या पैशाचा कांहीं भाग या कामीं खर्च करता येईल. संपत्तिदानातला पैसा क्या उद्देशाकरिता खर्च करावा त्याचे नियम केले आहेत. त्यामध्यें एक उद्देश असा आहे कीं, त्यागी, गरीब कार्यकर्त्यांचा कमींतकमी निर्वाहाचा खर्च संपत्तिदानातून केला जावा म्हणून विनोबांची इच्छा आहे कीं, संपत्तिदान यज्ञाची चळवळ आता अत्यंत व्यापकपणें चालवली जावी. १९५५ सालच्या सप्टेंबर महिन्याच्या अखेरीस विनोबाच्या ओडिसातल्या पदयात्रेचें शेवटचें ठिकाण कुजेंद्री येथें सर्वसेवासंघाच्या प्रबंधसमितीचे कांहीं सदस्य त्यांना भेटायला गेले होते. त्याच्याबरोबर भूदान यज्ञ आंदोलनाच्या भावी स्वरूपाविषयीं विवेचन करताना त्यांनीं वरीलप्रमाणें आपलें मनोगत प्रकट केलें. त्यावरून आंदोलनाच्या भावी स्वरूपाविषयीं स्पष्ट कल्पना देईल. सर्वसेवासंघानें विनोबांचे हे विचार मान्य केले आहेत आणि आंदोलनाला त्याप्रमाणें रूप देण्याकरिता जरूर ती व्यवस्था केली आहे. आंदोलनाच्या भावी रूपाविषयीं विनोबांच्या वरील विवेचनाचें हें सार आहे —

" आंदोलनाला एखाद्या संस्थेच्या सीमेंत किंवा नियमात बांधून ठेवून क्रांति करता येणार नाहीं. सर्वसेवासंघ ही एक संस्था आहे. संस्थेकडून मदत मिळेल. परंतु क्रांति करायची असेल तर ती जनमानसात परिवर्तन

होऊन च होईल. माझी इच्छा आहे कीं, १९५७ सालापूर्वी क्रांति व्हावी. अर्थात् गावागावानीं स्वतः च उठावें आणि आम्ही म्हणतों त्याप्रमाणें भूमीचें वाटप करून घ्यावें. तो दिवस यायला वर्षें लागोत, परतु शेवटचें क्रांतीचें कार्य एक दिवशीं च झालें पाहिजे. एक तारीख ठरवून त्या दिवशीं सर्व भारतात जमिनीचें वाटप केलें पाहिजे. असें जनमनास तयार करण्याकरिता जें काहीं करणें आवश्यक आहे तें केलें जावें. आमची पदयात्रा चालेल, काहीं विधायक कार्य चालू राहील आणि राजकीय पक्षाची सहानुभूति हि मिळविली जाईल. हें सर्व तर होईल च परतु शेवटचें ध्येय जनशक्तीकडून च गाठलें जाईल.

"आम्ही गाधीनिधि वगैरेकडून जो पैसा सध्या घेत आहोंत तो बंद करून टाकला पाहिजे असें मी जेव्हा म्हणतों तेव्हा त्याचा अर्थ क्रांतीचें काम सर्व भारतातील जनता च करील. आम्हाला या कामाकरिता कोणाकडून पैसा घ्यावा लागणार नाहीं. देशाला फक्त वीस पचवीस ठिकाणीं कचेऱ्या ठेवण्यात येतील. त्या ठिकाणीं दानपत्र वगैरे जमा राहतील. या कामाकरिता एखादा लक्ष रुपयाची जरुरी लागेल. तेवढी गाधी-निधीकडून घेतली जाईल हें खरें परतु आदोलनाची जबाबदारी जनतेवर च सोडून दिली पाहिजे. ही गोष्ट खरी आहे कीं, पैशाची व्यवस्था केल्याखेरीज सर्व समय देणारे कार्यकर्ते ( Whole time workers ) मिळू शकणार नाहींत. याकरिता केंद्रीय व्यवस्था बद करून सपत्ति दानावर जोर दिला पाहिजे आणि सपत्तिदानात मिळालेल्या त्या पैशातून कार्यकर्त्यांची व्यवस्था केली पाहिजे. याप्रमाणें सर्व व्यवस्था जनशक्तीकडून च होईल. हें मान्य करून एक दिवस निश्चित करून टाकला पाहिजे आणि देवाचें नाव घेऊन करून मिळणारी पैशाची मदत घेणें बद करून टाकलें पाहिजे. लोकानीं म्हटलें पाहिजे कीं, हें काम केवळ तुमचें नाहीं, आमचें हि आहे. म्हणून आम्ही असा व्यर्थ अहंकार का राखावा कीं आम्हीं च तेवढे काम करीत आहोंत. आम्हीं जर सस्थेमार्फत काम बद करून दिलें तर काम करण्याची जबाबदारी जनतेवर च पडेल. विधायक कार्यांची गोष्ट वेगळी आहे. आणि माझी इच्छा आहे कीं, कोरापूट जिल्ह्यात विधायक कार्य चालावें. याखेरीज जी सर्व जमीन मिळालेली आहे त्या सर्व जमिनीचें वितरण करून लोकासमोर वितरण

करण्याचा एक नुमुना हि ठेवला जावा. बाकीचें कार्य जनता च करील. वितरण करण्यासंबधीं आम्हीं जे नियम केले आहेत ते मोठ्या अक्षरात छापून प्रत्येक गावीं लावण्यात यावे. म्हणजे या नियमाना अनुसरून कोणी हि हें वाटपाचें काम करून घेऊं शकतील. याप्रमाणें आंदोलनाला तत्रयुक्त करण्याकरिता जें काहीं करणें जरूर आहे तें आपण करावें."

## (९४) उपसंहार

प्रेमाची शक्ति शातपणें आणि अदृश्यपणें क्रिया करीत असते आणि नतर कोण्या एखाद्या शुभ प्रसगीं विराट् आकारानें प्रकट होते तेव्हा तिला पाहून लोक स्तभित होऊन जातात म. गाधींनीं भारताच्या भूमीमध्यें सामुदायिक प्रेमानें बीज पेरलें. तें अकुरित होण्याकरिता मातीखालीं अदृश्य रूपानें क्रियाशील होतें आणि केव्हा केव्हा लोकाच्या डोळ्याना तो अकुर फुटू लागला आहे असें दिसे. आज आणखी एका सत्पुरुषानें त्यावर शातीचें जल सिंचन केल्यामुळें त्या रूहान रोपाची जल्दीनें वाढ होत आहे. त्या झाडाची वाढण्याची गति पाहून लोक आश्चर्यचकित झाले आहेत. हें कार्य म. गाधींच्या कार्यतत्रात अतर्भूत होतें. त्यासबधीं विनोबा म्हणतात, " आज जें काम मीं तुमच्यापुढें ठेवलें आहे तें आपण अत करणपूर्वक समजून घ्यावें. तें तुम्हाला समजावून देण्यात मला विशेष काहीं कष्ट होत नाहींत याचा अर्थ काय? महापुरुषाची शक्ति जेव्हा त्याच्या देहात च बद्ध असते तेव्हा ती सीमाबद्ध असते, परतु जेव्हा महापुरुष देहाचा त्याग करून जातो तेव्हा त्याची शक्ति अधिक तेजस्वीपणानें काम करू लागते. जर आपल्या मनाची भूमिका योग्य प्रकारें घडलेली असेल तर आपल्याला आपल्या अत करणात असा अनुभव येऊ शकेल कीं, आज गाधीजी जिवत आहेत, निघून गेलेले नाहींत. आणि आज जी अनेक लोकाना प्रेरणा मिळत आहे ती त्याची च शक्ति आहे. परमेश्वर आपलें कार्य अनेक प्रकारानीं साध्य करून घेतो समुद्रात अनेक लाटा उठत असतात. परमेश्वर-रूपी समुद्रात सत्पुरुषरूपी लाटा उठत असतात आणि त्या लाटाचा जेव्हा आम्हाला स्पर्श होतो तेव्हा आपल्याला हि त्यापासून प्रेरणा आणि नवजीवन मिळतें जें कार्य मीं आज देशाच्यापुढें ठेवलें आहे तें गाधीजींचें च आदर्श

कार्य होतें. आपल्याला असा विश्वास वाटला पाहिजे कीं, आपल्याला हे कार्य म्हणजे त्याचा आशीर्वाद च मिळाला आहे."

आता हें काम ईश्वराच्या प्रेरणेनें आणि इच्छेनें साध्य होत आहे, नाहीं तर एक किंवा अनेक व्यक्तींच्या प्रयत्नानें तें इतकें साध्य होणें संभवनीय नव्हतें. या आंदोलनाची आशातीत झालेली प्रगति पाहून मन विस्मयचकित होऊन जातें. याचें कारण काय? कारण भूदान यज्ञ हें एक सामान्य आंदोलन नाहीं. भूमिदान घेणें हा याचा आरंभ आहे खरा, परंतु त्याच्या मुळाशीं एक गंभीर तत्त्व आहे. तें एक धार्मिक आंदोलन आहे. तें या युगाची मागणी आहे. तो युगधर्म आहे. धर्मप्रवाहाचा आरंभ अगदीं लहानसा च असतो. हळूहळू त्याचा विस्तार होत जातो आणि शेवटीं तो प्रवाह सर्व भूभागावर पसरून जातो. विचार प्रथम झाडाच्या लहानशा बीजाच्या आकारात प्रकट होतो, परंतु क्रमानें वाढत वाढत त्याचा महान् वृक्ष होतो. यासंबंधीं विनोबा म्हणतात, "साधारणत वटवृक्षाशीं धर्मांची तुलना करता येईल. जो चैतन्यमय जिवन्त धर्म असतो त्याचा वटवृक्षासारखा विस्तार होत जातो. त्याच्यापासून त्या शाखा फुटत असतात त्यांतून पारंब्या सुटतात आणि क्रमानें त्या पारंब्याचें मूळ होतें आणि त्यांतून नवीन वृक्ष जन्मत असतो. धर्मविचाराच्या क्षेत्रात हि असें होत असतें. वटवृक्षाचें बीज अत्यंत क्षुद्र असतें. म्हणून च धर्माला वटवृक्षाची उपमा देण्यात येते. आम्याचें झाड मोठें असतें खरें, पण त्याची कोय अगदीं लहान असत नाहीं. परंतु वडाचें बीज अत्यंत लहान असतें. या अगदीं लहानशा बीजामध्यें त्या वटाची सर्व शक्ति अंतर्भूत असते. त्या प्रमाणें च भूदान यज्ञाच्या नावानें ज्या आंदोलनाचा आरंभ झाला आहे त्याचें बीज हि इतकें सूक्ष्म होतें कीं त्यानें तें येरलें त्याला हि असें वाटलें नव्हतें कीं, त्याला एवढें व्यापक रूप येईल आणि त्याच्या शाखेपासून नवीन वृक्षांची उत्पत्ति होईल. त्याच्यामध्यें नवसमाजरचनेचें बीज अंतर्भूत होतें. एवढें च नाहीं तर जगातल्या सर्वांत अत्यंत जरूरीच्या प्रश्नाचें समाधान करण्याचा बीज हि त्यामध्यें होतें. जर भारतानें हें आंदोलन पूर्णपणें यशस्वी केलें तर केवळ सर्वोदयसमाजाची स्थापना त्यामुळें होईल एवढें च नाहीं,

तर सर्व जगाला तें शांतीचा मार्ग दाखवील, सर्व विश्वाला अभयमंत्र देण्याला समर्थ होईल.

महाकवि शेक्स्पिअरच्या शब्दांत म्हणता येईल कीं, 'There is a tide in the affairs of man' मनुष्याच्या जीवनात उन्नतीचा एक शुभ क्षण येत असतो. जसा व्यक्तिगत जीवनात तसा देशाच्या आणि राष्ट्राच्या जीवनात हि येत असतो. जर आम्ही तो शुभ क्षण ओळखून घेऊ आणि वेळ गेली नाहीं तोंपर्यंत अनन्यपणें त्याचा योग्य उपयोग करून घेऊ तर शीघ्र आणि विनाश्रम देशाला इच्छित लाभ होईल. आपल्या देशाच्या दृष्टीनें तो शुभ क्षण आज आलेला आहे.

या गंभीर प्रसंगीं गीतेच्या शेवटच्या श्लोकाचे स्मरण होतें.

" योगेश्वर जिथें कृष्ण जिथें पार्थ धनुर्धर ।
तिथें मी पाहतों नित्य धर्म श्री जय वैभव ॥ "

म. गांधींनीं या श्लोकाचें खालीलप्रमाणें विवरण केलें आहे : " या ठिकाणीं श्रीकृष्णाला योगेश्वर असें विशेषण देण्यात आलें आहे म्हणून त्याचा अर्थ अनुभवसिद्ध शुद्ध ज्ञान असा होतो. आणि धनुर्धारी पार्थ या शब्दानें अनुभवसिद्ध ज्ञानाला अनुसरणारी क्रिया सूचित होते." ज्या ठिकाणीं अनुभवसिद्ध ज्ञान आणि त्याला अनुसरणारी क्रिया या दोन्हींचा संयोग होतो त्या ठिकाणीं धर्म, श्री, विजय आणि वैभव सर्व लाभतें.

आज भारताला पूर्ण विकसित आत्मज्ञान आणि त्याला अनुसरणारी क्रिया या दोन्हींची आवश्यकता आहे. जर हीं दोन्ही मिळून आपल्याला लाभतील तेव्हा च आपल्याला श्री, विजय, वैभव इत्यादि मिळेल. परमेश्वर आम्हाला तशी शक्ति देवो

---